श्रीमद्भगवद्गीता

# तत्त्वार्थदीपिका

लेखक
केशव महादेव बेडेकर
बी. ए.

मूल्य चार रुपये

# प्रस्तावना

श्रीमद्भगवद्गीता हा ग्रंथ आकाराने लहान, म्हणजे १८ अध्यायांत विभागिलेल्या अवघ्या सातशे श्लोकांचा; पण गुणानें फार मोठा आहे. त्यांतील परमार्थाची भूमिका सनातन व अनुभवसिद्ध असून तात्त्विक विवेचन समन्वयात्मक दृष्टीने व बुद्धीला पटेल अशा प्रकारे केले आहे. त्यांतील नैतिक उपदेश संदेह व मोह यांचा निरास करून कोणाहि व्यक्तीला अडचणीच्या प्रसंगी अगर भांबावून टाकणाऱ्या परिस्थितीत आपले कर्तव्य कोणते हें ठरविण्याचे कामीं योग्य मार्गदर्शन करणारा आहे. अनुभवसिद्ध परमार्थ, समन्वयात्मक तत्त्वज्ञान व स्फूर्तिदायक नीत्युपदेश यांच्या त्रिवेणी संगमामुळे भगवद्गीता हा ग्रंथ भारतीयानाच नव्हे तर अन्यदेशीय विचारवंतानाहि अत्यंत पवित्र व आदरणीय वाटतो. यामुळे त्याला जागतिक धर्मग्रंथात असाधारण महत्त्वाचें असें स्थान लाभलें आहे.

भारतीय तत्त्वज्ञानाला ललामभूत झालेल्या वेदान्तदर्शनाची इमारत ज्या प्रमाणभूत ग्रंथांच्या पायावर उभारलेली आहे, त्यांत म्हणजे प्रस्थानत्रयीत उपनिषदे व ब्रह्मसूत्रें यांजबरोबर भगवद्गीतेचा अंतर्भाव होतो. जगांतील बहुतेक प्रमुख भाषांतून भगवद्गीतेचीं भाषांतरें झालीं आहेत. अनेक पौरस्त्य व पाश्चात्य आचार्यांनी व पंडितांनी भाष्यें व टीकाग्रंथ लिहून व काही निस्वार्थी कार्यकर्त्या तत्त्वचिंतकांनी व महात्म्यानी प्रबंध रचून भगवद्गीतेतील प्रमेयांचें यथार्थ स्वरूप आपापल्या दृष्टीने व भूमिकेवरून विशद करून सांगितले आहे. काही थोड्या आत्मज्ञानी भगवद्भक्तांनीही स्वानुभवाच्या आधारे भगवद्गीतेच्या अन्तरंगात प्रवेश करून तेथें पाहिलेल्या चिद्रत्नांच्या स्वरूपाची जिज्ञासु निष्ठावन्त साधकाना ओळख पटावी व त्यांचा "सोलीव सुख" अनुभविण्याचा मार्ग प्रकाशित व्हावा म्हणून हृदयंगम वाङ्मय निर्माण केले आहे. या बाबतीत भारतीय ग्रंथकारांचा उदाहरणार्थ म्हणून, श्रीमदाद्यशंकराचार्य, संतशिरोमणि श्रीज्ञानेश्वर, श्री. अरविंद घोष, लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, डॉ. राधाकृष्णन् व प्राध्यापक रा. द. रानडे यांचा नामनिर्देश करतां येईल. अद्यापीहि गीतावाङ्मयामध्यें नवीन भर टाकण्याचे कमी अधिक यशस्वी प्रयत्न होतच

आहेत, व त्यांतील विविध गुणविशेषांमुळें त्यांचें स्वागत करणें आवश्यक आहे.

अशाच प्रकारचा एक स्वागतार्ह प्रयत्न आमचे स्नेही श्री. केशव महादेव बेडेकर यांनी "तत्त्वार्थदीपिका" या नांवाचा भगवद्गीतेचा तात्पर्यार्थ स्पष्ट करून दाखविणारा आटोपशीर ग्रंथ लिहून केला आहे. मूळ गीता कोणती व प्रक्षिप्त भाग कोणता हें विश्लेषणपूर्वक निश्चित ठरवावें अगर अनेक विद्वानांनीं प्रतिपादिलेल्या विविध मतांचा आढावा घेऊन त्यांचें चिकित्सापूर्वक परीक्षण करावें, अगर एखाद्या विशिष्ट सांप्रदायिक अथवा ऐकान्तिक मताचा आग्रहानें पुरस्कार करावा या हेतूनें हा ग्रंथ लिहिलेला नाहीं. प्रस्तुत ग्रंथांत लेखकाला भगवद्गीतेचा मुळांतून पूर्व ग्रह न बाळगितां स्वतंत्र बुद्धीनें अभ्यास करून जो तात्पर्यार्थ पटला तोच त्यानें मूळ श्लोक व त्यांचें भाषांतर देऊन व त्याखालीं अवश्य तेथे अर्थ विवरणात्मक टीपा जोडून सर्वसाधारण वाचकांनाही समजेल अशा सुबोध, सरळ भाषेंत सांगितला आहे. गीतेंतून केवळ कर्ममार्गाचा, केवळ भक्तिमार्गाचा किंवा केवळ अद्वैत सिद्धीचा अर्थ काढण्याचे प्रयत्न निष्फल होत. गीतोपदेशांत एकांगीपणा व ऐकान्तिक मताचा आग्रह नसून त्यांत अनेक मतांचा व साधनांचा समन्वय साधला आहे. गीतेमध्यें मुख्यतः अद्वैतमताचा स्वीकार केला असला तरी इतर म्हणजे सांख्य योग, भागवत इत्यादि मतांचा चिकित्सापूर्वक समावेश करून घेतला आहे. गीतेची ही समन्वयात्मक दृष्टि नीट समजून घेतली तर अभ्यासू वाचकांना मधून मधून आढळणाऱ्या विवाद्य स्थळांची व कूट प्रश्नांची (ज्ञान–भक्ति, निवृत्ति–प्रवृत्ति, निर्गुण–सगुण, माया–चिद्विलास, मत्स्थानि भूतानि–नच मत्स्थानि भूतानि, दैव–ईश्वरीकृपा इत्यादि प्रमेयाची) समाधानकारक उत्तरें मिळूं शकतात हें दाखविण्याचा लेखकानें प्रशंसनीय प्रयत्न केला आहे. कर्म, ज्ञान, ध्यान, भक्ति ही साधनें परस्परव्यवच्छेदक नसून परस्पर पूरकच आहेत व यामुळें आत्मलाभ, ब्रह्मसंस्पर्श अगर मोक्षप्राप्ति होते हे श्री. बेडेकर यानीं विशद करून दाखविण्याचा प्रशंसनीय प्रयत्न केला आहे.

श्री. बेडेकर यांनीं आपल्या 'तत्त्वार्थदीपिके'नें श्रीमद्भगवद्गीतेच्या अंतरंगांत प्रवेश करण्याच्या मार्गावर प्रकाश टाकण्याचें कामीं हातभार

लाविला आहे, या जाणीवेनें वाचकवर्ग त्यांचे मनःपूर्वक आभार मानील यांत संशय नाहीं. श्री. बेडेकर यांनीं श्रीभगवान् कृष्णाला अर्पण केलेली ही वाङ्मयसेवा त्याचे चरणीं रुजू होवो अशी इच्छा व्यक्त करून हे प्रास्ताविक चार शब्द पुरे करतों.

‘ सूर्योदय ’
पुणें ४

**प्रा. न. ग. दामले**

# पुरस्कार

श्री. केशव महादेव बेडेकर यांनी श्री भगवद्गीतेवर ‘ तत्त्वार्थदीपिका ’ लिहिली असून ती लवकरच प्रकाशित होईल. श्री. बेडेकर हे स्वतंत्र विचाराचे असून स्वतःला पटलेले विचार स्पष्टपणें निर्भयतेनें मांडतात. श्रीशंकराचार्यांनीं ज्याप्रमाणें समन्वयपद्धतीचा अवलंब केला व भाष्यें लिहिलीं, त्याच पद्धतीचा अवलंब आधुनिकांना समजेल व पटेल अशा रीतीनें तत्त्वार्थदीपिकेत केलेला आढळतो. लेखकाची गीतातत्त्वज्ञानावर दृढ निष्ठा आहे; व गीतेचें तत्त्वज्ञान पूर्णपणें परोक्ष झाल्यावर आधुनिक कालांत जगाला भेडसावणारे प्रश्न उत्पन्न झाले तरी निर्भयपणें त्यांना सहज तोंड देतां येते अशी श्रद्धा हें पुस्तक वाचून कोणाच्याहि अंतःकरणांत उत्पन्न होईल. पण ग्रंथकार एवढ्यावर संतुष्ट होत नसून गीतेचें तत्त्वज्ञान हें केवळ अभ्यसनीय नसून त्याचें साक्षात् अपरोक्ष झाल्यावांचून मानवाला निर्मेळ सुखप्राप्ति मिळणें शक्य नाही, असें एकंदर सार आहे.

श्रीगीतेचा उपदेश युद्धापुरता, किंवा केवळ अर्जुनापुरता नाहीं. अर्जुन हा केवळ निमित्त मात्र आहे. अर्जुनाच्या भूमिकेला अनुसरून ‘ तस्मात् युध्यस्व ’ असें प्रसंगोपात् सांगितलें आहे. ससारी जीवाला मार्गदर्शन करणें आणि कैवल्यसाधनाचा मार्ग दाखविणें यासाठीं श्रीगीतेचा अवतार आहे ( पान ९ पहा ). गीतेकडे पाहण्याची जी निर्दोष दृष्टि आचार्यांनीं दाखविली तिचाच अवलंब प्रस्तुत लेखकानें केला आहे.

२६०।२ सदाशिव पेठ
पुणें २

**—द. वा. जोग**
उपनिषत्तीर्थ

# परिचय

## योऽर्थज्ञ इत्सकलभद्रमश्नुते—यास्काचार्याः

आस्तिक आणि श्रद्धाळु व विद्यावंत आणि सुसंस्कृत अशा आर्यांस अलौकिक अर्थ समजण्याचें अचुक साधन म्हणून एक वेदाकडेच बोट दाखवावें लागतें. तो निरपेक्ष व निःश्रेयस साधण्याचें एकमेव सर्वसंमत असें साधन असल्याचें विचारवंतांनीं मान्य केलें आहे. " वेदस्य हि निरपेक्षं स्वार्थे प्रामाण्यं रवेरिव रूपविषये " असा आचार्यांचा आदेश आहे. वेदानुसारिणी वाणीच निर्दोष द्रष्टयांनी मानव्याच्या हिताचे धडे देण्यास प्रकट केली; तीस स्मृति म्हणतात. " श्रुतेरिवार्थं स्मृतिरन्वगच्छत् " हें वचन सर्वांस श्रुतच आहे. धर्मरूप शरीराचे " स्मृति तेचि अवयव देखा " असें संत सांगतात. अध्यात्मविषयक वाङ्मयांत व्यासांची वेदांतसूत्रें अग्रगण्य मानलीं जातात. " वेदांतु तो महारसु मोदकु मिरवे " असें त्याचें माहात्म्य माहात्म्यांनी मान्य केलें आहे. हीं वेदांतसूत्रें ज्या स्मृतीस प्रामाण्याची पदवी देऊन गौरवितात त्या भगवद्गीतेचा अध्यात्मज्ञानाचा प्रदीप म्हणून अग्रहक्क असल्याचे समंजसांत संमत झालेलें आहे. भगवद्गीतेचा आधार घेऊन वेदान्तसूत्रांनी आपली प्रतिपादित प्रमेयें प्रतिष्ठित पायावर उभारलीं असल्याचें पटवून दिलें आहे. उदा. ब्रह्मसूत्र १–३–२३ पहा.—" अपि च स्मर्यते " अशी अनेक आहेत. या श्रीकृष्णार्जुन संवादाला ईश्वरस्मृति या आदरयुक्त संज्ञेनें संबोधिलें आहे. " वृष्णीनां वासुदेवोऽस्मि ' म्हणणाऱ्या भगवानांनीं आपलें ज्ञान सर्वस्व यांत समाविष्ट करून तें विश्वास दिलें. समग्र ऐश्वर्य आणि संपूर्ण ज्ञानाचे ते आगर होत. ह्या दृष्टीनें त्यांच्या ह्या कृतीकडे तज्ज्ञ पाहतात. त्यांची प्रतिज्ञाच तशी आहे. " तैसे सर्वज्ञेंहि मिया। सर्वहि निर्धारूनिया । निके होय तें धनंजया । सांगितलें तुज " ॥ ज्ञा. १८–१३३१. एवढा या ग्रंथाचा असामान्य अधिकार आहे.

ज्ञानवैराग्यादि षड्गुणैश्वर्यानीं संपन्न असलेल्या या महान् आत्म्याचे हे उद्गार विश्वकल्याणाच्या कळकळीनें अवतरले आहेत. " गीतेचे हें दुभतें । वत्स करूनि पार्थाते । दुभिन्नली जगापुरतें । श्रीकृष्ण गाय ॥ "

ज्ञा. १८–१६८९. या अमृताचा लाभ सर्वांनीं यथाशक्ति साधावा अशी कृतकार्य शुकाचार्यांची शिफारस आहे. " पिबत शास्त्रमिदं रसमालयं। मुहुरहो रसिका भुवि भावुकाः ॥ " अर्जुनाचा मोह मारण्याच्या कामीं याच अस्त्राचा भगवानानी उपयोग केला आहे. " गीता हे सप्तशती । मंत्र प्रतिपाद्य भगवती । मोहमहिषा मुक्ति । आनंदलीसे॥" ज्ञा. १८–१६६७. या उपदेशाचे घुटके प्रथमतः पार्थास पाजले गेले. ती गोष्टी गद्यांत गोवून गायली, असा संत समय आहे. " कृष्णार्जुनी मोकळी । गोठी चावळली जे निराळी ॥ " ज्ञा. १८–१६९६. ती व्यासांनी पद्याच्या पेहरावांत पुण्यपुरुषांपुढे वाढली आहे. या प्रबंधाचा प्रायः छंद अनुष्टुभ ठेविला आहे. त्यामुळें यातील रसग्रहणास सर्वसामान्य जिज्ञासूस सुरेख सोय झाली आहे. " तैमें शब्दे जें न लभे । तें घडुनिया अनुष्टुभें । स्त्रीशूद्रादि प्रतिभे । सामाविले ॥ " ज्ञा. १८–१६९९. असा हा मुक्तद्वाराचा लाभ यामुळें जोडत आहे म्हणून हा मेवा सर्वांस हवा असाच आलेला आहे.

या प्रबंधाची संख्या सात शतें असल्याचें सर्व सांगतात. " तं धर्मं भगवता यथोपदिष्टं वेदव्यासः सर्वज्ञो भगवान् गीताख्यैः सप्तभिः श्लोकशतैरुपानिबबंध " असे श्रीमदाचार्य गीतेच्या संक्षिप्त विवरणाच्या आपल्या उपोद्घातांत सांगतात. " श्लोक शतें सात । अध्याय अठराचे लेख । जे देवो बोलिले एक । दुजें नाही ॥ " याचा अर्थ यांत आद्यंतांत एकच विषय श्रीनी हाताळलेला आहे. तो कोणता हे ते स्वतःच सांगतात. " ज्ञान प्रधान हे शास्त्र । " ज्ञा. १८-१४३६. श्रीकृष्ण आपला हाच अभिप्राय असल्याचें अनुगीतेंत सांगतात. " स हि धर्मः सुपर्याप्तो ब्रह्मणः पदवेदने। ". या काव्यांतील मुख्य रसावरून हेच मर्म ठरतें. यांत शांतरसाची श्रीनी आपणा सर्वांस मेजवानी दिली आहे. " वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथु ।" ज्ञा.१८-१७६१."निर्वेदस्थायि भावोऽस्ति शान्तोऽपि नवमो रसः" का. प्र. ४ या सवैराग्यज्ञानाच्या दानासाठींच हा या शास्त्राचा विस्तार झाला आहे. " यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति । तदा गंतासि निर्वेदम् " असें श्रीकृष्णच त्याचा निर्णय देतात. यांत मुख्य मान शांताचा, बाकीचे पंक्तीचे पठाण. ते योग्यतेनुरूप पूजिले आहेत " येरां हि रसा पांतिकरा । जाहला मानु." ज्ञा. ११-२. त्यामुळें ही मेजवानी चमचमीत

झाली आहे. मात्र या भोजनाचें निमंत्रण फक्त निष्कामांसच आहे. " हें प्रतिपत्ति मिया केली। निष्कामासी ॥ " ज्ञा. ६—२२. निष्कामकाम हेच येथें अधिकारी !

या प्रबंधाच्या प्रमेयाप्रमाणें याच्या संख्येविषयींहि ऐकमत्य नाही. ज्ञानेश्वर ७०० श्लोक म्हणतात तर ते ७०१ क्यावर ओवी लिहितील कशी ? असा प्रा. दांडेकरांचा सवाल आहे. ज्ञा. प्र. पा. २७. 'सप्तशती' या शब्दाला यौगिक अगर रूढार्थानें घ्यावें की कसें यावर हा निर्णय राहतो. नवचडी पाठांतील सप्तशतीची ग्रंथसंख्या गणण्याचा प्रकार स्वतंत्रच दिसतो. समस्ता उवाच मंत्राः ५७; अर्धश्लोकाः ४२; श्लोकाः ५३५ च अवदानानि ६६ इतिसप्तशतानि. अशी सातशांची भरती करतात. तसाच प्रकार या गीताग्रंथाच्या मोजणीत संख्यावेत्ते मानीत आले आहेत. त्यांचे ग्रंथ मोजण्याचें मान-पद्य संख्या सोडून-अक्षर संख्येवर आधारलेलें आहे. बत्तीस अक्षरांच्या समूहास एक, याप्रमाणें ही गणती होते. पहा, आपटे कोश पृ. ४७१. गीतेत विविधवृत्तें, मर्यादित स्थलीं का होईना, पण दीर्घ लांबणीचीं आलेली आहेत. त्यांचा विचार व्हावा हेंहि येथें उचित आहे व काश्मीरी-शारदा मातृकांतील-प्रती पाहतां, त्यांची पद्यसंख्या ७४५ पर्यंत जाते; तरी ही सर्वपद्यें ते घेपकच समजतात. गीतामान गीता प्रशस्ति देते तीः—षट्शतानि सविंशानिः-श्लोकानां प्राह केशवः । अर्जुनः सप्तपंचाशत् सप्तषष्ठीच संजयः ॥ धृतराष्ट्रः श्लोकमेक गीताया मानमुच्यते ॥ त्यांच्या ७४५ श्लोकसंख्येचा हा आधार ते देतात. ग्रंथसंख्या मोजण्याच्या पद्धतीतील फरकामुळे हा विसंवाद झाला आहे. त्यावरून क्षेपक वा घेपक ठरविणें धोक्याचें झालें आहे. ग्रंथसंख्या गीतासारावर अवलंबून असल्यानें प्रस्तुत पद्यसंख्येवर चालतें केलें जातें. " शतें सात श्लाका " ज्ञा. १८-१६७७. ही परंपरा शिष्टसंमत सबब महाराष्ट्रांत तीच मानीत आले आहेत, तेंच योग्य होय.

संख्येसबंधीं जो प्रकार तोच पाठाविषयींचा. त्याबरोबर हा प्रश्नहि पुढें उभा राहतो. " प्रतिजानीहि " ९—३१, "पुरुषं प्रपद्ये" १५-४ सारखे पाठ ओघांत खटकतातच. शांकर पाठाहून भिन्न असे सव्वाशेवर पाठ ज्ञानेशींत आदरिलेले आढळतात. "उत्सृज्य सशरं चापं रथोपस्थमुपाविशत्"

१–४७ या सारख्या भिन्न क्रमांत आलेल्या संहितेनें अर्थातहि उलथापालथ होते. तरी " येथें अर्थे तेंचि पाठें। जोडें येवढेनि घटें।" ज्ञा. १८-१६८३. अशी पद्मपुराणाची पुष्टि लाभल्यानें गीता ही " वाङ्मयी। श्रीमूर्ति प्रभूची।" ज्ञा. १८–१६८४ या शासनानें ती कोणत्याहि स्वरूपांत सांपडली तरी फलांत फरक पडत नसल्यानें पूज्यत्वानें पदरांत घेण्यास पात्र आहे.

गीताशास्त्र हें आत्मा अवरविते मंत्राचे माहेर आहे. त्या मंत्रसाधनाचे प्रकार फार. निष्कामकर्मांच्या प्रवृत्तिपर आचारानेच साध्य साधतें असें रहस्य सांगणारा एक संप्रदाय आहे, तर दुसरा " ज्ञानसमुच्चितेन विहितेन कर्मणा निःश्रेयसप्राप्तिः " असा अभिनवांचा. " गीताशास्त्रे ईषन्मात्रेणापि श्रौतेन स्मार्तेन वा कर्मणा आत्मज्ञानस्य समुच्चयो न केनचिद्दर्शयितु शक्यः" (शां. भा.) असा मुरारेस्तृतीयः पन्था प्राप्त होत आहे. शिवाय, "भगवद्भक्तियुक्तस्य तत्प्रसादात्मबोधतः। सुख स्वानंदसयुक्तिरिति गीतार्थसंग्रहः ॥" असें सांगणारा आणखी एक पंथ उभा राहतोच. क्रमयोगाचा प्रकार पांचवे ज्ञाननाथ नोंदतातच. पांचांमुखी परमेश्वर पडला ! अधिकारानुरूप योग्य तें आदरून आत्मकल्याण करावयाचें हें खरें, परंतु या प्रामाणिक मतभेदामुळें याच आधारावर अनेक मतवाद्यांचा गलबला उभा राहिला. येवढे सर्व प्रपंच मनांत धरून देव बोलले हे निश्चितार्थाच्या वक्त्यावर लादता येत नाहीं. पूर्णप्रज्ञांचे द्वैत, श्रीसंप्रदायाचें विशिष्टाद्वैत, वल्लभांचे शुद्धाद्वैत, आचार्यांचे केवलाद्वैत व प्राचार्यांचें पूर्णाद्वैत हे वादी आपल्या मतास गीतेंत स्थान दाखवितात. गीताशास्त्रांत सांख्य योगादिकांचा समन्वय आहे. पतित परावर्तनार्थ भक्तीचा राजमार्ग त्यांत खुला झाला आहे. त्यामुळें हा प्रबंध सर्वमान्य झाला आहे. तो आपली ही लोकप्रियता निरंतर टिकविणार आहे. याच्या रुचकर शिकवणीनें ह्याचे सुधारलेल्या सर्व भाषांतून उलथे प्रसिद्धिले आहेत, व श्रीरमणापावेतों त्याचा आस्वाद देशविदेशाच्या आबालवृद्धांस महात्मे सरसहा सेवन करवीत आहेत. यामुळें " विश्वाचिया कृपा। करोनि महानंद सोपा। अर्जुन व्याजे रूपा। आणिला देवें॥ ज्ञा १८-१६८६. असा हा विश्वशांतीचा महामंत्र विश्ववंद्य झाला आहे असें संत सांगतात तें सत्य आहे.

या ग्रंथांतून आपल्या मतास साधक असा निष्कर्ष सर्वच काढतात. फार काय परंतु बायबलाशीहि याचें नातें लावण्याचा प्रयत्न झाला आहे. ह्या योगानें त्यांच्या महतीपेक्षां या ग्रथाचेंच महत्त्व मनांत चांगलें बिंबतें. " अन्यैः स्वपक्षनिक्षिप्तदृष्टिभिः स्वाभिप्रायो भगवद्गीतार्थत्वेनारोप्योक्तः। अह तु गीतार्थमेव वक्ष्यामि " अशी प्रतिज्ञा करणारे वीरहि याच भोवऱ्यांत सापडलेले दिसतात. संस्कृत, प्राकृत, पैशाची इत्यादि देशी, व ग्रीक, लॅटिन, फ्रेंच, जर्मन् व इंगजी वगैरे विदेशी गद्यपद्य पेहरावांनी हिला अनेकांनी अनेक प्रकारें नटविले आहे. व " इये मराठीचिये नगरी। ब्रह्मविद्येचा सुकाळु करी।" असा या गीता ग्रंथाचा सर्वत्र बोलबोला होत आहे. यक्षदेवी, दीपिका तों मंजिरीपर्यंतचे विजेचे अनेक दिवे हिच्या अतरंगावर प्रकाश पाडावा म्हणून प्रज्वाळिले आहेत. तरी " निरे कोणापाशी होय एक रज। तरी द्या रे मज दुर्बळासी " ॥ अशी तुकारामादि जिज्ञासूंची जिव्हाळ्याची मागणी ताजीची ताजीच खडी आहे. पांडित्यप्रचुराचा परामर्श सामान्य प्रज्ञावानाच्या आवांक्याबाहेर राहतो. त्यांत संसारश्रांतांस श्रीकृष्णाच्या आशयाशीं समरस होऊन त्याचा सारांश स्वभाषेत सोप्या शब्दानें सांगणाऱ्याची तहान लागलेली आहे. त्याप्रकारचे प्रयत्न अनेक अधिकारी सभाग्य संत करीत आहेत. प्रस्तुतचा प्रयत्न त्याच पंथी आहे. " राजहंसाचें चालणें। भूतळीं जालिया शहाणें। इतर कायी कोणे। चालावेचि ना ? " असा ज्ञानेशांचा अशा प्रयत्नास पाठिंबा आहे. त्या तंतूवरच नेट धरून या सज्जनसंदेश देणाऱ्याने सर्व समाजास निःश्रेयसाचें सुलभ मार्गदर्शन व्हावें म्हणून आपली स्वतत्र तत्त्वार्थदीपिका उजळली आहे. चक्षुष्मंतांनी तिचा मनसोक्त उपयोग करून घेतल्यास त्यांचेंच स्वहित साधल्याचें श्रेय त्यांस लाभणार आहे.

प्रस्तुतचा प्रयत्न अनेक दृष्टींनीं स्वागतार्ह ठरतो. यांतील अतरंगाची चौकस पाहणी केल्यावर ह्याच निर्णयावर कोणीहि येईल. सामान्यतः शांकर साप्रदायिकांच्या आधाराने यातील विवरणाचें धोरण ठेवलेले असलें तरी त्यास सोडून ओघास जुळणारा असा अन्य अर्थ आला तर तोहि येथें आदरलेला दिसेल. 'अपर्याप्तं तदस्माकम्' १–१० चें स्पष्टीकरण पहा. 'यावानर्थ उदपाने' २–४६, याहि पद्याच्या अर्थात निराळें धोरण दिसतें. " स्वधर्मे निधनं श्रेयः " ३–३५, याचा अभिप्राय मूळच्या ओघास जमेल

असा उघड उघडा केला आहे. " यो बुद्धेः परतस्तु सः " ३–४२, ये-उपनिषदांचा मान राखून बाजू सावरली आहे. लोकसंग्रहांची स्पष्टता समाज-धारणा वगैरे प्रतिशब्दांमीं मनोहरपणे सजविली आहे. बुद्धियोग या शब्द-वटीकेंत श्रीकृष्णांनीं किती अर्थ सांठविला तो सर्व झाडा देऊन उघडा केला, हें कर्त्यास कौतुकास्पद आहे. विश् ( पृ. २११ ) म्हणजे सर्व साधारण जनता यांत नाविन्य आहे.

या तत्त्वार्थदीपिकेचे तत्त्वकथन त्यांच्याच शब्दांत सांगणे सोयीचें म्हणून तें येथें उद्धृत करतों. जीव हा परमात्म्याचा अंश आहे. स्वभावज कर्म कर्तव्यबुद्धीनें केल्यास पाप लागत नाहीं. ' मुक्तसंग ' अशानें ' तदर्थ ' कर्म करावयाचें हा बुद्धियोग. यानें सद्गति लाभते. केवल संन्यास ( ज्ञान ) मार्ग किंवा केवल कर्म अगर भक्ति एकांडी येथें सांगितली नाही. सर्व मार्ग अधिकारानुरूप यथायोग्य तसे क्रमानें आक्रमिल्यास ते साध्यास पोहचवितात. अर्जुन हा क्षात्रवृत्तीचा म्हणून जनकाचा निर्देश झाला तो कर्मसंन्यासासाठीं. कर्म, योग, ज्ञान, कर्मसंन्यास, अनन्य भक्ति नतर कैवल्य असा क्रम येथें दिला आहे. गीतावक्ते परमज्ञानी योगीश्वर या दृष्टीने हा उपदेश झाला. पुनर्जन्माचें सुंदर तत्त्व गळीं उतरविलें आहे. जीव मर्त्यदेहांतून बाहेर पडतांना मनादिकांसह निघतो. ईश्वर समष्टीरूप आहे. तो परतंत्र नाहीं. तो वशी आहे. ईश्वराची माया अचिंत्य घटना करणारी त्याची शक्ति आहे. संसाराचे सातत्य आणि साधुभाव साधतो तो धर्म समजावा, व त्याच्या विघटनेस अधर्म समजावे. ईश्वराचे निःश्वास समाजस्वास्थ्यास आवश्यक आहेत. वर्णव्यवस्था ईशनिर्मित आहे. अपरोक्षज्ञानानें जन्ममरणापासून सुटका होते. जीवन्मुक्ति हे खरें वैभव. कर्म व भक्तीस देव व आपण असे दोघे हवेत. विश्व हेंच विश्वेश्वराचें व्यक्तरूप होय. त्याचे शरणागत मायाशक्तितून तरतात. तन्मयता ही उपासना होय. तन्मयतेनें कैवल्य. विश्वेश्वर अव्यक्त तर विश्व व्यक्त. आकाश आणि वायु-सारखी ही समजोडी आहे. ते दोन्ही पूर्ण आहेत. जीव–जगत् नव्यानें होत नाहींत. स्व आणि स्वभाव असा हा ईश्वर–जगताचा संबंध आहे. विश्व हें त्या विश्वेश्वर विश्वंभराचा प्रभाव आहे. एकत्व, बहुत्व आणि सर्वत्व या प्रकारानें ईश्वर प्रतीत होतो. या सर्वत्वांत एकत्व पाहणें हें

ज्ञान. जाति गौण, भक्ति श्रेष्ठ. जाति जन्मानें, तर वर्ण गुणानें. स्वभाव बदलला तरी जन्मजात बीज नाहींसें होत नाहीं. शुद्ध भाव केवलात्म्याचे व विकृत भाव जीवत्म्याचे होत. ही सृष्टि ईश्वरेच्छेनें झाली. अनाद्यनंत विश्व हें परमात्म्याचें दृश्य रूप होय. विश्वांत विश्वेश्वर आत्मभावानें पाहणें हाच योग. सर्व कर्माची समाप्ति ज्ञानांत, तशी ज्ञानाची परिपूर्तता भक्तींत होते. ज्या योगें जग प्रतीत होतें ती अविद्या. ज्ञानाच्या विषयाचें विषयत्व गेल्याशिवाय प्रत्यय नाही. तें ज्ञान असें की, तेथें त्रिपुटी एकरूप होते. सूर्य आणि प्रकाश तशी ईश्वर आणि माया ही होत. प्रकाश दिसत नाही प्रकाशांत वस्तु दिसतात. तशी माया दिसत नाही, तिचा पसारा मात्र दिसतो. सच्छास्त्र डोळे उघडविते, व दृष्टीला सत्यापर्यंत नेऊन भिडविते. पुढे बुद्धीस योग्य दिसेल तसें जावयाचें. मग मानव स्वचरित निर्माण करूं शकतो. कर्तव्यबुद्धीनें, लोभ किंवा द्रोह मनांत न ठेवितां ईश्वरार्पणबुद्धीनें स्वकर्माचरण करीत राहिल्यास येथें संसारांत सुख, शांति, समाधान आणि अंतीं सद्गति लाभते. हा असा सामान्य मानवास श्रीमद्भगवद्गीतेचा अत्यंत कळकळीचा आणि प्रेमाचा संदेश आहे. तो साधणें हें मानवीजन्माचें कर्तव्य आहे.

यासाठी गीता सुगीता कर्तव्या असा प्रभु श्रीकृष्ण भगवंताचा आदेश आहे. तो महाराष्ट्रीयांच्या मायबोलींत भगवानाच्या आशयाशी समरस होऊन येथें सोपा करून सांगितला. तो आदरानें घेईल त्यास महालाभ होऊन जन्माचें साफल्य मिळेल व तसा प्रयत्न साधतां यावा म्हणून तत्त्वार्थदीपिकेचा हा यथायोग्य प्रयत्न प्रकाशिला आहे. याची भाषा अर्थवती, सुलभ, सोपी अशी साधली आहे. विश्रांतीचा वेळ लेखकानें वाचकवर्गास सात्विक व सततची विश्रांति कशी लाभेल तो मार्ग सहज समजाविण्यांत नियोजिला हें कौतुकास्पद आहे. हाच त्यांचा खरा लोकसंग्रह त्यानीं सक्रिय साधला. त्याचें सर्वांनी सौहार्दानें स्वागत करावें अशी सदिच्छा बाळगतों. श्री. केशवराव बेडेकरांचा हा यत्न " ममत्वेतां वाणीं गुणकथनपुण्येन भवतः पुनामीत्यर्थेऽस्मिन् पुरमथनबुद्धिर्व्यवसिता " या हेतूनें प्रेरित होऊन झाला तरी तो " सर्वेऽत्र सुखिनः सन्तु । " याच आशीर्वादाची अपेक्षा करणार. तें स्तुत्य आहे.

श्रीक्षेत्र आळंदी—देवाची —पं. पांडुरंग शर्मा

# निवेदन

मानवी जीवनाची सर्वोच्च प्रेरणा कोणती ? अंतिम साध्य काय ? तें सिद्ध होण्यासाठीं साधना कशी हवी ? त्याला अधिकारी कोण ? सर्वांनाच शक्य अशी कांहीं सुलभ साधना आहे काय ? अशा प्रकारचे अनेक प्रश्न विचारवताच्या मनांत उभे राहतात. या सर्वांची उत्तरें श्रीमद्भगवद्गीतेंत मिळतात असा विश्वास भारतीयाच्या मनात शतकानुशतकें दृढमूल झालेला आहे. श्रीमद्व्यासांनी प्रज्वालित केलेल्या या गीतारूपी ज्ञानमय प्रदीपाच्या प्रकाशांत भारतांतील लहान-थोर, विद्वान्-अविद्वान्, प्राचीन-आधुनिक, अशा अगणित व्यक्तींनी आपापलें जीवन घडाविण्याचा प्रयत्न आजपावेतों केला आहे.

श्रीमत् शंकराचार्यादि अनेक ज्ञानवंतांनीं आणि श्री ज्ञानेश्वर महाराजां-सारख्या संतांनी गीतोपदेशाचाच आधार घेऊन सामान्य जनांना आणि मुमुक्षूंना अध्यात्मज्ञानाचे आणि नीतीचे पाठ दिले आहेत. आधुनिक काळांतहि लोकमान्य टिळकांनी कर्मयोग, आणि महात्मा गांधीजींनीं अनासक्तियोग, याच परंपरेचा आधार घेऊन सांगितलेला आहे. यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, भारतीय लोकमनाची परपरा आणि घडण लक्षांत घेतां गीतोपदेश हा सर्वकाळीं, सर्वांसाठी उपयुक्त मानला गेला आहे. गीतोपदेशांत ऐकांतिकतेनें केवळ कर्मयोगाचा, केवळ ज्ञानमार्गाचा, किंवा केवळ भक्तिमार्गाचाच अर्थ काढण्याचे प्रयत्न झाले आहेत, आणि असे प्रयत्न पुढेंहि होत राहतीलच. परतु श्रीगीतेला जी सर्वमान्यता पूर्वापार लाभत आली आहे ती पाहतां गीतोपदेश एकदेशीय किंवा एकमताग्रही नाही हें सहज मान्य होण्याजोगें आहे. वास्तविक पाहता अनेक भारतीय मतांचा, साधनाचा, आणि विचारांचा समन्वय या गीतोपदेशांत साधलेला आहे. आणि म्हणूनच तो अनेक मतांच्या आणि विचारांच्या संसर्गानें सहिष्णु आणि संग्राहक बनलेल्या भारतीय मनाला आदरणीय झालेला आहे.

गीतोपदेशाच्या या समन्वयात्मक आणि सर्वसमावेशक स्वरूपाविषयी गीतेचा एक अभ्यासक म्हणून माझे कांहीं विचार मी वाचकांपुढें नम्रपणें

मांडीत आहे. यांत पारंपरिक समजुतींना न जुळणारें असें कांहीं दिसल्यास त्याचा सहृदय वाचकांनीं योग्य परामर्श घ्यावा अशी विनंति आहे.

ईश्वरार्पणबुद्धीने, अनासक्त चित्ताने, आणि समत्वदृष्टीने स्वकर्माचरण करीत राहून, नितांत भक्तीने आपले सर्वस्व परमात्म्यास समर्पण करणें हाच निःश्रेयसप्राप्तीचा मार्ग गीतेत उपदेशिला आहे.

सर्वच काहीं तो परमात्मा-वासुदेवः सर्वम—असे तादात्म्य झाल्यावर मग कशाचेच बंधन नाही. प्रवृत्तीत निवृत्तिबुद्धि, आणि निवृतीत प्रवृत्ति—कर्मण्य-कर्म आणि अकर्मणि कर्म—ही बुद्धियोगाची शिकवण सामान्य जनांसाठी आहे. ज्यानें त्याने सत्तत्त्व नीट समजावून घेऊन आपला मार्ग आपणच निश्चित करावयाचा आहे. उच्चनीच भाव, किंवा आचाराचे निष्ठुरशासन कोणावरहि नाही.

हें विश्व विश्वेशाचें व्यक्तरूप आहे, आणि तें सत्य, पूर्ण, सनातन आहे. तें केवळ भ्रमरूप किंवा स्वप्नवत् नाहीं. जीवहि सत्य, नित्य, सनातन ईश्वरांश आहे. जगत् परिर्वतनशील आहे, परंतु तें मिथ्या म्हणजे खोटे, किंवा केवळ आभासरूप अथवा नास्तिरूप नाही. तें नितांत सत्य आहे. विश्वेश विश्वापासून वेगळा नाही हेच विश्वरूप दर्शनाचें रहस्य आहे. जीव, विश्व, विश्वेश, सर्व काही एकच एक सनातन तत्त्व आहे. ही गीतेची शिकवण, आणि यावरच आधारलेला अभ्युदय—निःश्रेयसाचा मार्ग गीतेंत उपदेशिला आहे.

योगेश्वर श्रीकृष्णांनी प्रियशिष्य अर्जुनाला, म्हणजे नारायणानी नराला, अर्थात् परमात्म्याने जीवाला, गीता उपदेशिली आहे. ही तात्विक भूमिका नीट ध्यानीं घेऊन गीतेचा अभ्यास केल्यास सर्वच श्लोकाचा सुसंगत अर्थ लागेल, आणि कोणताहि कूट प्रश्न उपस्थित होणार नाही.

गीता हें मोक्षशास्त्र आहे, परंतु सामान्य जनांसाठींहि यांत मार्ग दाखविला आहे. म्हणजेच आध्यात्मिक मोक्षशास्त्रावरील हा काव्यमय प्रबंध सामाजिक मोक्षशास्त्रावरील एक मार्गदर्शक उपदेश-ग्रंथहि आहे, याची प्रचीति साक्षेपी अभ्यासकाना येईल. आज मानवजातीच्या आधिभौतिक अभ्युदयासाठी विज्ञानाची प्रचंड शक्ति उपलब्ध झालेली आहे; सामान्य जनतेमध्यें आपल्या

उद्धाराची प्रबळ आकांक्षा व त्यासाठीं कर्मप्रवृत्त होण्याची दुर्दम्य ईर्ष्या उत्पन्न झाली आहे, व सुजाण व सुसंस्कृत नागरिकामध्ये मानवजातीच्या आदर्श जीवनाबद्दल एक सात्त्विक श्रद्धा दृढ झाली आहे. या विज्ञानाचें, कर्माचें व श्रद्धेचें बळ एकवटलें तर आजचे सारे सामाजिक प्रश्न सुटूं शकतील असा आशावाद भारतीयांच्याच नव्हे, तर सर्व राष्ट्रांतील सुज्ञाच्या हृदयात स्फुरत आहे. मानवी ज्ञान, कर्म व श्रद्धा यांच्या समन्वयाची ही आजची नवी गरज पाहता गीतोपदेशातील अशा समन्वयाचे तत्त्व मार्गदर्शक का ठरूं नये ?

आज जगांतील महत्त्वाचे प्रश्न युद्धाऐवजी शांततेनें सुटावेत अशी तीव्र आकांक्षा भयाकुल मानवजातीच्या हृदयांत दृढतर होत चालली आहे. राष्ट्राराष्ट्रांतील, वर्गावर्गांतील, किंवा व्यक्तिव्यक्तींमधील प्रश्न नैतिकतेचा आधार घेऊनच सोडवावयाचे, का पाशवी बळाचा अवलंब करून सर्वनाश करून घ्यावयाचा, हाच मोठा प्रश्न आज मानवजातीपुढें आहे. अशा वेळीं साक्षात् परमात्म्यानें जीवाला–अर्जुनरूपी मानवजातीला–जो उपदेश केला त्यांतील रहस्य काय हे समजावून घेणें अवश्य आहे. गीतोपदेशाच्या 'युध्यस्व भारत' ह्या मंत्रात चिरकाल टिकणारा शांततेचा आणि परमसुखाचा मार्गच मानवजातीला श्रीकृष्णांनीं उपदेशिला आहे यांत संशय नाही.

'इंदीवर' जंगलीमहाराज रस्ता
कार्तिक शुद्ध प्रतिपदा, शके १८७७

**केशव महादेव बेडेकर**

# ॥ अथ श्रीगीताऽनुशासनम् ॥

नमामि विश्वेशमनन्तमव्ययम् । सर्वान्तरस्थं करुणाकरं समम् ।
जडेषु जीवेषु ततं परात्परम् । भूताधिवासं पुरुषोत्तमं हरिम् ॥ १ ॥
नमस्ते विश्वरूपाय साक्षिणे परमात्मने । सर्वभूतनिवासाय सर्वेषामन्तरात्मने ॥ २ ॥
क्षराक्षरावलम्बाय पुरुषायामितात्मने । योगेश्वराय कृष्णाय गोविंदाय नतोऽस्म्यहम् ॥३॥
वासुदेवमुखाम्भोजाद्गीता भगवती सरित् । गङ्गेव शिरसः शार्वाल्लोकोद्धाराय निःसृता ॥४॥
आश्वासनाय दीनानामार्तानां चित्तशांतये । अज्ञानामवबोधाय प्राप्तेयं भगवत्कृपा ॥ ५ ॥
वासनापङ्कलिप्तानां शुद्धये बुद्धये सताम् । उदितस्तरणिर्ज्ञानोन्मेषणाय विचेतसाम् ॥ ६ ॥
सांत्वनाय प्रपन्नानां श्रांतानामुपशान्तये । सत्यमार्गप्रदीपोऽयं कल्याणपथगामिनाम् ॥ ७ ॥
आहवस्य मिषेनैव विधेयमुपदेशिता । हृषीकेशेन पार्थाय जीवाय परमात्मना ॥ ८ ॥
महायोगेश्वरः कृष्णो धर्मसंमूढमर्जुनम् । धर्मे नारायणः साक्षात् शास्तीह प्रणतं नरम् ॥९॥
प्रियाप्रियैर्नु संबंधैर्मानवस्याहवोऽसकृत् । भृशमुत्पद्यते ह्यस्य कर्तव्येषु मतिभ्रमः ॥ १० ॥
कुर्यामिदं नवेत्येवं क्वचिद्दोलायते मनः । पुण्यं किमेतत्पापं वाऽहितं वाहितमेव वा ॥११॥
कस्य विप्रतिपन्नेभ्योऽधिकारो मार्गदर्शने । सर्वज्ञेन विना को वा निर्णयं दातुमर्हति ॥१२॥
आदेशयति पन्थानं गीतायां भगवान् स्वयम् । उद्धाराय प्रपन्नानां ज्ञानिनां मोक्षसिद्धये॥१३॥
उपदेशो यतो ह्येष जीवाय परमात्मनः । अहंशब्देन गीतायां परमात्मैव सूचितः ॥१४॥
अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः । वाक्यैरेवंविधैश्चान्यैराशयोऽयं प्रतिष्ठितः ॥१५॥
दिव्यदृष्टिप्रबोधेन विश्वरूपस्य दर्शनं । अर्जुनस्याभवच्छक्यं प्रसादात्परमात्मनः ॥ १६ ॥
विश्वे विश्वात्मनः साक्षाद्दर्शनं सत्यमद्भुतं । भवति श्रद्दधानानां भक्तानामेव केवलम् ॥१७॥
विश्वेश्वराश्रितं विश्वं सत्यं पूर्णं सनातनम् । तद्धि विश्वात्मनो व्यक्तं रूपमव्यक्तरूपिणः॥१८॥
अत्र प्रवहशीलं यन्नामरूपविभावितम् । जगत्तल्लीलयेशस्य सातत्येन विवर्तते ॥१९॥
जीवो जगति संसारमात्मनः परिकल्पते । इच्छाद्वेषसमुत्पन्नैः संबंधैरनुभावजैः ॥२०॥
सृष्टो जीवेन संसार ईश्वरेण जगन्महत् । विश्वं विश्वात्मनो रूपं ब्रह्म सच्चित्सुखं परम् ॥२१॥
एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखः । अव्ययः परमात्माऽयं भक्तियुक्तैरुपास्यते ॥२२॥
सगुणो निर्गुणो वाऽपि ध्यायते परमेश्वरः । भक्तैरात्मानुगुण्येन यथा येषां प्ररोचते ॥२३॥
आश्रितः सगुणो भक्तैः प्रियो माता पितेति सः । ओमित्येकाक्षरं ब्रह्म प्रणवोपासकैःश्रितम्॥२४॥
देहिनां दुर्लभं साक्षाद्विश्वरूपस्य दर्शनम् । सगुणेनैव रूपेण तस्माद्धरिरुपास्यते ॥२५॥
विधाय सहजं कर्म विश्वेशं हृदि भावयन् । समबुद्धिरनासक्तो नरः प्राप्नोति सद्गतिम् ॥२६॥
एष सत्यः समो धर्मः सर्वेषामुपकारकः । अविभेदेन भक्तानां भूतये प्रतिपादितः ॥२७॥
समन्वयेन सर्वेषां दर्शनानां समासतः । गीताशास्त्रमनन्येभ्यो भक्तेभ्य उपदेशितम् ॥२८॥

केचित् पश्यन्ति गीतायां ज्ञानं केचिदुपासनां। अन्यैर्निर्धार्यते कर्म संन्यासो वाऽत्र केवलः॥२९॥
स्वमताभिनिवेशेन सेर्ष्यं विवदमानयोः । विवादश्रवणान्नूनं तत्त्वार्थावगमः कुतः ॥३०॥
गङ्गायमुनयोर्वेणी ख्याता दृष्टिमनोहरा । तस्यां सरस्वती गूढा विद्वद्भिरनुभाविता ॥३१॥
यथा सरस्वती नासौ दृश्यते साऽनुमीयते। तत्त्वं नु दीव्यति स्वान्ते संवादश्रवणात्तथा ॥३२॥
विश्वविश्वेशयोस्तत्त्वं बुद्ध्यैव न निगम्यते । महावाक्यानुसंधानात्तत्तु स्वान्ते प्रतीयते ॥३३॥
बुद्धेः पारं परं तत्त्वं तत्र तर्को न मूर्च्छति । तर्को बुद्धेः पदं यावत्तावदेव नयत्यमूम् ॥३४॥
अशक्यमल्पबुद्धीनां तत्त्वज्ञानार्थदर्शनम् । शाखेन्दुन्यायानिर्दिष्टं तत्त्वं तत्पूर्वदर्शिभिः ॥३५॥
यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसासह । भक्तिश्रद्धानुभाव्यं तद्वेदवाक्यैर्निदर्शितम् ॥३६॥
सच्चिदादान्दरूपो यो वेदान्तेषु प्रकीर्तितः। निर्गुणोऽपि स सद्भक्तैः सगुणः परिकल्पितः ३७
यत्प्रसादान्नरः शान्तिं प्राप्नोत्यंते परां गतिम्। परमात्मा स हृद्देशे सर्वेषामेव संस्थितः ॥३८॥
सत्यं ज्ञानमनन्तं यद् ब्रह्म वेदोपलक्षितम् । तत्साक्षादपरोक्षेण ज्ञानेनैवोपगम्यते ॥३९॥
श्रद्धावान् योगसंसिद्धो जितात्मा भक्तिसंयुतः। अन्तःस्फूर्त्या परं ज्ञानं स्वयमेवानुविन्दति ४०
ईश्वरांशो जगत्यस्मिन् जीवभूतः सनातनः । साक्षित्वेनैव भूतानि संप्रेरयति कर्मसु ॥४१॥
जीवः स्वं मनुते बद्धं कामात्माऽऽसक्तमानसः । वस्तुतस्त्वीश्वरांशत्वात्स स्वतंत्रश्च निर्मलः४२
सततं परमात्मानं ध्यात्वा कृत्वाऽऽत्मकर्म च । समबुद्धिरनासक्त आत्मनाऽऽत्मानमुद्धरेत्४३
उद्धाराय प्रपन्नानां ज्ञानिनां मोक्षसिद्धये । भक्तानुकम्पया ज्ञानमध्यात्मं प्रतिपादितम् ४४
सञ्जयः श्रुतवानेनम् संवादं पार्थकृष्णयोः। योगं ज्ञानं च भक्तिं च साक्षाद्भगवतो मुखात ४५
हरेर्वचांसि गीतायामुत व्यासकृतान्यहो । कैश्चिदुत्थाप्यते व्यर्थो वादोऽयं शब्दपण्डितैः ४६
परमार्थोपदेशोऽयं जीवाय परमात्मनः । व्यासप्रतिभया नूनं तत्त्वतः संप्रसाधितः ॥४७॥
वैय्यासिके प्रबंधेऽस्मिन् श्रीकृष्णवचनामृतं। संभृतं करुणापूर्ण वाग्विवादो निरर्थकः ॥४८॥
वचनानि हरेरेव गीतयां कोऽत्र संशयः । दृश्यते करुणा तेषु न किं भक्तार्तिहारिणी ॥४९॥
परमं शब्दमाहात्म्यं श्रद्धा शब्देषु निष्ठिता । प्राकृतानां कुतर्कैस्तु मनांसि विचलन्त्युत॥५०
अनर्थकोऽधविश्वासस्तत्त्वज्ञानापकारकः । सावधाना हिताय स्याच्छ्रद्धा ज्ञानोपबृंहिता ५१
नाश्रद्धस्य स्थिरा बुद्धिर्ज्ञानं भक्तिः कुतः खलु। श्रद्धावाननसूयस्तु लभते गतिमुत्तमाम् ५२
संन्यासः कर्मयोगश्च ज्ञानं भाक्तिःपरात्मनि। श्रेयस्कराणि सर्वाणीत्येषा गीताप्रघोषणा ॥५३॥
प्रवृत्तिश्च निवृत्तिश्च धर्मो द्विविधलक्षणः । उभाभ्यामपि कल्याणमधिकारानुसारतः ॥५४॥
मानवानां समो धर्मो विश्वेषामुपकारकः । देशकालानपेक्षश्च गीतायामुपदेशितः ॥५५॥
स्वर्गे वाऽस्तु पृथिव्यां वा भक्तकामद ईश्वरः । यत्सत्यं सोऽस्ति सर्वेषां हृद्देशे परमेश्वरः ५६
आग्रहो नास्ति गीतायां विशिष्टः सांप्रदायिकः। आत्मोद्धाराय सर्वेषामधिकारः प्रतिश्रुतः ५७

सर्वसाक्षीश्वरो न्यायी दयालुर्भक्तवत्सलः । ददात्यभ्यार्थितं भक्तैर्निर्व्याजेनान्तरात्मना ॥५८॥
भक्तेभ्यः प्रतिशुश्राव भगवान् गतिमुत्तमाम् । अनन्येभ्यस्त्वनासक्त्या निरतेभ्यः स्वकर्मसु ५९
तमेव शरणं गच्छेदिति गीतानुशासनम् । तत्प्रसादान्नरः शान्तिं प्राप्नोत्यंते च सद्गतिम् ६०

जीवस्य भेदप्रतिपत्तिपूर्वकम् । अहंत्वबुद्ध्या सुखदुःखभावनम् ॥
ज्ञानं तदात्मस्फुरणं स्वभावजं । अज्ञानमित्यात्मविदाऽभिधीयते ॥६१॥
एतन्नु जीवस्य विकासकारणम् । मनोभवः काम इतः प्रजायते ॥
संसार हेतुस्त्वयमेव केवलः । जीवं निबध्नाति जगत्ययं किल ॥६२॥
ज्ञानं त्विदं जीवनिबंधकारणात् । संमोहकं चाप्ययथार्थकं मतम् ॥
मोक्षे हि धीर्ज्ञानमिति प्रधारितम् । येनात्मतत्त्वं कृतिभिर्विभाव्यते ॥६३॥
ज्ञानं सविज्ञानमथानुचिन्तनम् । तत्त्वस्य चात्मप्रतिपत्तिपूर्वकम् ॥
स्वात्मावभूतिश्च समाधिसाधना । ज्ञानाभियुक्तस्य भवन्ति योगिनः ॥६४॥
कर्मार्पयित्वा परमेश्वराय । कर्तव्यमेवेति समत्वबुद्ध्या ॥
कृतं त्वनासक्तधिया नरेण । भवेत्तदेवात्मविमोक्षणाय ॥६५॥
निष्ठा ज्ञाने कर्मयोगे प्रतिष्ठा । सिध्येते वै ध्यानयोगेन भक्त्या ॥
वैराग्येण ब्रह्मणि प्रश्रयेण । तादात्म्येन श्रद्धया चेश्वरेण ॥६६॥
विश्वं नित्यं रूपमेवेश्वरस्य । जीवो नित्यो हीश्वरांशोऽव्ययश्च ॥
एकः सत्यश्चेश्वरो ब्रह्म साक्षात् । लोकाध्यक्षः सच्चिदानंदमूर्तिः ॥६७॥
अन्विष्यंस्तं विचलितमनाः कामदं भोगबुद्ध्या ।
सत्यान्मार्गाच्चलति परमात्मानमुत्सृज्य मोहात् ॥
ज्ञात्वांऽतःस्थं पथमनुसरेज्ज्ञानिभिः संप्रदिष्टम् ।
युक्तः शान्तिं भजति परमां चित्प्रसादात्प्रबुद्धः ॥६८॥
मुक्तिर्भक्तिप्रवणमानसामीश्वरेऽनन्यभावः ।
ब्रह्मण्येव प्रणिहिताधियां ब्रह्मनिर्वाणसिद्धिः ॥
कैवल्यं तु प्रयतमनसां ज्ञानिनां ब्रह्मभूयम् ।
सामान्यानां विमलमनसां सद्गतिः साम्यबुद्ध्या ॥ ६९ ॥
कार्यं कर्म प्रकृतिनियतं तच्च कर्तव्यबुद्ध्या ।
हेयाऽहंता विषयममताऽऽसङ्गबुद्धिः फलाशा ॥
ज्ञानावाप्तिप्रवणमनसा योगबुद्ध्या यतात्मा ।
भक्त्याऽऽत्मानं नतमुपनयेद् हृन्निविष्टाय तस्मै ॥ ७० ॥

ॐ तत्सत्

बेडेकरोपाह्वः केशवः

ॐ नमो भगवते वासुदेवाय

# अध्याय पहिला

## अर्जुन विषाद

धृतराष्ट्र उवाच–धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।
मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत सञ्जय ॥१॥

राजा धृतराष्ट्र म्ह.––कुरुक्षेत्राच्या धर्मभूमीवर जमलेल्या युद्धोत्सुक माझ्या कौरवांनीं आणि पांडवांनीं पुढें काय केलें ?

संजय उवाच– दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।
आचार्यमुपसङ्गम्य राजा वचनमब्रवीत् ॥२॥
पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।
व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥३॥
अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।
युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥४॥
धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।
पुरुजित् कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥५॥
युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् ।
सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥६॥
अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।
नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान् ब्रवीमि ते ॥७॥
भवान् भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।
अश्वत्थामा विकर्णश्च सोमदत्तिस्तथैव च ॥८॥

**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।**
**नाना शस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥९॥**
**अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।**
**पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥१०॥**
**अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।**
**भीष्ममेवाभिरक्षंतु भवंतः सर्व एव हि ॥११॥**

संजय म्ह०——व्यूहरचना केलेलें पांडवदल पाहून राजा दुर्योधन द्रोणाचार्यांसमीप जाऊन म्हणाला. २ आचार्य ! पहा ही आपल्या बुद्धिवान् शिष्यानें, द्रुपदपुत्र धृष्टद्युम्नानें, व्यूहरचनेनें उभी केलेली पांडवांची अफाट सेना. ३ या सेनेंत पराक्रमी महाधन्वी, युद्धकर्मांत भीमार्जुनासारखे, सात्यकी, विराट, आणि महारथी द्रुपद आहेत. ४ धृष्टकेतु, चेकितान, पराक्रमी काशिराज, पुरुजित्, कुंतिभोज, नरश्रेष्ठ शैब्य ५ पराक्रमी उत्तमौजा, शूर युधामन्यु, अभिमन्यु ( सौभद्र ), द्रौपदीचे पुत्र, असे सर्वच महारथी आहेत. ६ हे द्विजोत्तमा ! आतां आमच्या सैन्याचे अग्रणी जे मुख्य मुख्य आहेत ते सांगतों ऐक. ७ आपण स्वतः, भीष्म पितामह, कर्ण, समरजेते कृपाचार्य, अश्वत्थामा, विकर्ण, सोमदत्तपुत्र ( भूरिश्रवा ), ८ तसेच दुसरेहि अनेक शूर योद्धे माझ्या कार्यासाठीं प्राणार्पण करण्यास तयार असलेले, अनेक प्रकारच्या शस्त्रास्त्रांत निपुण, आणि सर्वच युद्धकलेंत प्रवीण असे आहेत. ( परंतु ) भीष्माचार्यांच्या सेनापतित्वाखालीं असलेलें आपलें सैन्य ( शत्रूला तोंड देण्यास ) असमर्थ असें दिसतें; उलट, हें पांडवांचें सैन्य भीमाच्या सेनापतित्वाखालीं अधिक सामर्थ्यवान् दिसतें. १० आपण सर्वांनीं आपापल्या सैन्यप्रवेशमार्गावर नेमलेल्या ठिकाणीं सज्ज राहून भीष्माचेंच रक्षण करणें योग्य आहे.

**तस्य संजनयन् हर्षं कुरुवृद्धः पितामहः ।**
**सिंहनादं विनद्योच्चैः शङ्खं दध्मौ प्रतापवान् ॥१२॥**
**ततः शङ्खाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।**
**सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥१३॥**

**ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ ।**
**माधवः पांडवश्चैव दिव्यौ शङ्खौ प्रदध्मतुः ॥१४॥**

**पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।**
**पौंड्रं दध्मौ महाशङ्खं भीमकर्मा वृकोदरः ॥१५॥**

**अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।**
**नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥१६॥**

**काश्यश्च परमेश्वासः शिखंडी च महारथः ।**
**धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥१७॥**

**द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।**
**सौभद्रश्च महाबाहुः शङ्खान् दध्मुः पृथक् पृथक् ॥१८॥**

**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।**
**नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥१९॥**

११ कुरुवंशांतील वडील प्रतापी भीष्मपितामहांनीं दुर्योधनाला हर्ष (आणि उत्साह ) वाटावा, असा प्रचड सिंहनाद करून आपला शख फुंकला. १२ त्याबरोबर, लगेच, अनेक शंख, नौबदी, ढोल, नगारे, मृदंगादि वाद्यें वाजूं लागलीं, आणि त्यांचा प्रचड निनाद झाला. १३ त्यानंतर पांढरे घोडे जोडलेल्या भव्य रथांत बसलेल्या श्रीकृष्णांनीं आणि अर्जुनानें, आपले दिव्य शंख फुंकले. १४ श्रीकृष्णांनीं पांचजन्य, अर्जुनानें देवदत्त, आणि सर्वांच्या हृदयांत धडकी भरणाऱ्या भीमसेनानें आपला मोठा पौंड्र शंख फुंकला. १५ राजा कुंतीपुत्र युधिष्ठिरानें अनंतविजय, नकुलसहदेवांनीं आपापले सुघोष आणि मणिपुष्पक शंख फुंकले. १६ हे राजा धृतराष्ट्रा! महाधन्वी काशिराजा, महारथी शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट, अजिंक्य सात्यकी, १७ द्रुपदराजा, द्रौपदीचे पुत्र, पराक्रमी अभिमन्यु, या सर्वांनीं आपापले शंख फुंकले. १८ या शंखांच्या आकाश आणि पृथ्वी दणाणून सोडणाऱ्या प्रचंड निनादानें कौरवांचीं हृदयें हादरून सोडलीं.

**अथ व्यवस्थितान् दृष्ट्वा धार्तराष्ट्रान् कपिध्वजः ।**
**प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥२०॥**
**हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।**

१९ हे राजा धृतराष्ट्रा ! त्यानंतर युद्धार्थ जमलेल्या कौरवावर दृष्टि टाकून, आतां शस्त्रांचा खणखणाट सुरू होणार एवढयांत, कपिध्वज अर्जुन धनुष्य सज्ज करून, २० श्रीकृष्णाला म्हणाला,

अर्जुन उवाच–**सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥२१॥**
**यावदेतान्निरीक्ष्येऽहं योध्दुकामानवस्थितान् ।**
**कैर्मया सह योद्धव्यं अस्मिन् रणसमुद्यमे ॥२२॥**
**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः**
**धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥२३॥**

अर्जुन म्ह०—हे अच्युता ! दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं माझा रथ उभा कर. २१ मला नीट पाहूं तर दे, हे युद्धाला कोणकोण आले आहेत, ह्या युद्धांत मला कोणकोणाशीं झुंजावयाचें आहे. २२ युद्ध करून दुष्ट दुर्योधनाचे हित करूं पाहणारे कोणकोण जमले आहेत, तें पाहूं या तर. २३.

युद्ध करूं नये, त्यांत कोणाचेंच कल्याण नाहीं, सामोपचारानें तंटा मिटवावा, अशी इच्छा मनापासून अर्जुनाची, आणि श्रीकृष्णांचीहि पण होती. सर्व उपाय थकल्यावर नाइलाज म्हणूनच, पांडव युद्धास तयार झाले होते. कौरवांचे बाजूनें मात्र कुटिलता, आणि दुष्टता एकसारखी दाखविली जात होती. त्यांच्या मनांत युद्धांत पांडवांचा समूळ नायनाट करावयाचा होता.

सञ्जय उवाच–**एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।**
**सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥२४॥**
**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।**
**उवाच पार्थ पश्यैतान् समवेतान् कुरूनिति ॥२५॥**

**तत्रापश्यत् स्थितान् पार्थः पितॄनथ पितामहान् ।**
**आचार्यान् मातुलान् भ्रातॄन् पुत्रान् पौत्रान् सखींस्तथा॥**
**श्वशुरान् सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।**
**तान् समीक्ष्य स कौंतेय सर्वान् बंधूनवस्थितान् ॥२७॥**
**कृपया परयाऽऽविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।**

संजय म्ह०—हे धृतराष्ट्रा ! अर्जुन श्रीकृष्णास असें म्हणाला, म्हणून श्रीकृष्ण, तो उत्तम रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं उभा करून, २४ भीष्म पितामह, द्रोणाचार्य, आणि सर्व राजमंडळाच्या सन्मुख होऊन म्हणाले, "पहा हे सर्व युद्धार्थ जमलेले कौरव." २५ त्या ठिकाणीं अर्जुनाला चुलते, आजे, गुरू, मामा, बंधू, त्यांचे पुत्रपौत्र, मित्र, २६ श्वशुर, आणि जिवलग दोन्ही सैन्यांत दिसले. त्या सर्व जमलेल्या बांधवांना नीट न्याहाळून पाहून, २७ अत्यंत अनुकंपित होऊन दुःखानें (अर्जुन) असें म्हणाला.

युद्ध टाळून स्वजनांचा संहार टाळावा, अशीच अर्जुनाची मनीषा. तो पराक्रमी खरा, पण खऱ्या शूराप्रमाणें तो कनवाळू अंतःकरणाचा होता. दुष्टता, क्रूरता, हिंसकता हे खऱ्या शूराचे गुण नाहींत. खरा शूर निडर, आपल्या प्राणाचीहि परवा न करणारा आणि सत्याचा पाठीराखा असतो. नाईलाजास्तव त्याला शस्त्र हातीं धरावें लागलें, तरी त्याच्या मनांत अनुकंपा, आणि हिंसेच्या कल्पनेनें उद्भवणारें दुःख प्रकट होणारच.

अर्जुन उवाच—**दृष्ट्वेमान् स्वजनान् कृष्ण युयुत्सून् समुपस्थितान् ॥**
**सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।**
**वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥२९॥**
**गाण्डीवं स्रंसते हस्तात् त्वक्चैव परिदह्यते ।**
**न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥३०॥**
**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव**
**न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥३१॥**

न काङ्क्षे विजयं कृष्ण राज्यं भोगाः सुखानि च ।
किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥३२॥
येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।
त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥३३॥
आचार्याः पितरः पुत्राः तथैव च पितामहाः ।
मातुलाः श्वशुराः पौत्राः शालाः संबंधिनस्तथा ॥३४॥
एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।
अपि त्रैलोक्यराजस्य हेतोः किं नु महीकृते ॥३५॥
निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।
पापमेवाश्रयेदस्मान् हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥
तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान् स्वबांधवान् ।
स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥३७॥
यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥३८॥
कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥३९॥
कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।
धर्मे नष्टे कुलं कृत्स्नं अधर्मोभिभवत्युत ॥४०॥
अधर्माभिभवात् कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥४१॥
संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च
पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥४२॥
दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।
उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥४३॥

**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।**
**नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥४४॥**
**अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम्**
**यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः ॥४५॥**
**यदि मामप्रतीकारं अशस्त्रं शस्त्रपाणयः**
**धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥४६॥**

हे श्रीकृष्णा ! ह्या स्वजनांना ( आणि बांधवांना ) युद्धार्थ सज्ज झालेलें पाहून, २८ माझे तर हातपाय गळाले, आणि तोंडास कोरड पडत आहे, अंगावर कांटा उभा राहिला आहे, २९ गांडीव धनुष्य हातांतून गळून पडत आहे, आणि अंगाची आग होऊं लागली आहे. येथें माझ्यानें उभेंहि राहवत नाहीं, काय करावें कळत नाहीं. ३०.

हे केशवा ! मला अशुभ शकुन होऊं लागले आहेत. युद्धांत स्वजनांचा वध करून माझें कल्याण होणार नाहीं. ३१ हे श्रीकृष्णा ! नको हा विजय, नको हें राज्य, नकोत हे भोग. हे गोविंदा ! राज्य, भोग किंवा जिणें तरी आतां कशाला ? ३२ ज्यांच्यासाठीं हें राज्य, हे भोग, आणि हीं सुखें, तेच येथें आपले प्राण आणि आपलें सर्वस्व पणास लावून युद्धार्थ उभे आहेत. ३३ हे गुरु, हे पितृव्य, हे पुत्र, हे पितामह, हे मामा, हे श्वशुर, हे पौत्र, हे शालक आणि हे संबंधी, ३४ हे माझा वध करावयास तयार असले तरी, यांचा वध करण्यास मी तयार नाहीं. तिन्ही लोकांचें राज्य मिळविण्यासाठींहि मी हें दुष्कृत्य करावयास तयार नाहीं; मग एवढ्याशा पृथ्वीच्या राज्यासाठीं तर नाहींच नाहीं. ३५ हे जनार्दना ! ह्या धृतराष्ट्र पुत्रांचा वध करून आम्हांस काय संतोष वाटणार ? हे आततायी आहेत खरे, पण ह्यांना मारून आम्ही पापाचेच धनी होऊं. ३६ म्हणून या दुर्योधनादि आपल्याच बांधवांना मारणें आपणास योग्य नाहीं. स्वजनांचाच वध करून, हे माधवा ! आम्ही सुखी कसे होणार ? ३७ हे लोभानें झपाटले आहेत, म्हणून यांना जरी कुलक्षयापासून होणारें महत्पाप, आणि मित्रांच्या घातापासून होणारे महान् दोष दिसत नाहींत,

३८ तरी आपणाला कुलक्षयापासून होणारे हे दोष दिसत असतां, आपणांस या दोषापासून परावृत्त होण्याचें कां कळूं नये ? ३९ कुलक्षयच झाल्यावर पूर्वापार चालत आलेले कुलधर्महि नष्ट होणारच, आणि कुलधर्म नष्ट झाले म्हणजे सर्व कुलांत अधर्म बोकाळणारच. ४० अधर्म माजल्यावर स्त्रियांना उपसर्ग पोहोंचेल, आणि हे श्रीकृष्णा, स्त्रियांच निंदित झाल्यावर वर्णधर्मात गोंधळ माजणारच. ४१ वर्णधर्माच्या नाशानें कुलाचा संहार करणारांचें, आणि त्या कुलांचें, नरकांत पतन अनिवार्यच आहे. त्या कुलांतल्या पितरांना पिंडोदकाच्या अभावीं पतन हें स्वाभाविकच आहे. ४२ अशा प्रकारें कुलांचा संहार करणारांच्या, वर्णधर्माचा नाश करणाऱ्या, ह्या पापांनीं सनातन जातिधर्म आणि कुलधर्म पार उखडून जातात. ४३ हे श्रीकृष्णा ! ज्या मनुष्यांचे कुलधर्म नष्ट झाले त्यांना नरकाशिवाय दुसरी गतीच नाहीं, हें प्रसिद्धच आहे. ४४ शिव शिव ! आपण राज्याच्या आणि सुखाच्या लालसेनें स्वजनांचा वध करण्यास तयार झालों, हें फार घोर पातक करण्यास आपण उद्युक्त झालों आहोंत. ४५ हे दुर्योधनादि सशस्त्र कौरव, निशस्त्र आणि प्रतिकारास तयार नसलेल्याचा माझा निकाल लावतील तर त्यांतच माझें अधिक कल्याण आहे. ४६

ह्या अर्जुनाच्या भाषणाचा आशय असा कीं, त्याचें मन हें घोर स्वजनहिंसात्मक कर्म करण्यास तयार नव्हतें. त्याला कुलाची ( क्षत्रिय कुलाची ) प्रतिष्ठाच या युद्धांत नष्ट होईल अशी भीति वाटत होती. सर्वच क्षत्रिय असे एकमेकांस नष्ट करण्यास उद्युक्त झाल्यावर क्षत्रियांचें नांवच नष्ट होणार. राष्ट्राचें रक्षण करणारा वर्णच नष्ट झाल्यास, सर्वच अराजक माजेल, हें त्याला स्पष्ट दिसत होतें. कुरुकुलच नष्ट झाल्यावर कुरूंच्या स्वर्गस्थ पितरांना पिंडोदक कसे मिळणार ? पितरांचे नरकांत पतनाला आपणच कारण होणार......इत्यादि गोंधळलेले विचार अर्जुनाच्या मनांत उभे राहिले. तो शूर पण विचारी होता. आततायी आणि लोभाविष्ट नव्हता. पराक्रमी होता, पण दुष्ट आणि क्रूर नव्हता. ही भयंकर संहाराची तयारी पाहून त्याचें हृदय कळवळलें. आणि येथेंच विवेकानें वैराग्याचा पाया घातला. साधकाला आवश्यक भूमिका येथेंच तयार झाली, आणि अशा प्रकारें अर्जुन ब्रह्मज्ञानाच्या उपदेशाला अधिकारी झाला.

सञ्जय उवाच—

**एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।**
**विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥४७॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायाम्**
**योगशास्त्रे श्रीकृष्णर्जुन संवादे**
**अर्जुनविषादो नाम प्रथमोध्यायः ।**

संजय म्ह०—असें बोलून अर्जुन त्या युद्धभूमीवर, रथाच्या साठींत धनुष्य बाण खालीं टाकून, शोकाकुल होऊन खालीं बसला. ४७

या प्रस्तावनेच्या अध्यायांत श्रीगीताशास्त्रोपदेशाला योग्य अशी काव्यमय भूमिका मांडली आहे. युद्धाची पार्श्वभूमी आत्म्याचें अमरत्व, आणि परमात्म्याचें सर्वव्यापित्व मांडण्यासाठीं तयार केली आहे. काठकोपानिषदांत "न जायते म्रियते वा," "अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्य हन्यमाने शरीरे," "हन्ता चेन्मन्यते हन्तुं हतश्चेन्मन्यते हतम्। उभौ तौ न विजानीतो नाऽयं हन्ति न हन्यते" असें आत्म्याचें अमरत्व प्रतिपादिलें आहे. त्याचप्रमाणे येथेंहि युद्धाच्या भूमिकेवरून तेंच प्रतिपादिलें आहे. विवेक, आणि त्यापासून वैराग्य, मनांत बाणल्यावरच ज्ञानग्रहणाची मानासिक तयारी होते. कांहींतरी जोराचा आघात मनावर झाल्याशिवाय विवेकाला चालना मिळत नाहीं, आणि विवेकाशिवाय वैराग्य नाहीं. ज्ञानाची शुश्रूषा वैराग्यानेंच उत्पन्न होते.

श्रीगीतेचा उपदेश युद्धापुरता, किंवा केवळ अर्जुनापुरता नाहीं. "पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत्" असें हें सर्वोपकारी गीताशास्त्र आहे. अर्जुनास केवळ या महान् ब्रह्मज्ञानोपदेशास निमित्तमात्र केला आहे. त्याच्य. भूमिकेच्या अनुषंगानें, अधिकारपरत्वें, ठिकठिकाणीं "तस्मात् युद्धयस्व" असें प्रसंगोपात् सांगितलें आहे. असें ठिकठिकाणीं सांगण्याचा उद्देश, अर्जुन ह्या महान् ज्ञानोपदेशाला कारणीभूत आहे, एवढें सुचविण्याकरतां आहे. संसारी जीवाला मार्गदर्शन करणें, आणि कैवल्यसाधनाचा मार्ग दाखविणें यासाठीं श्रीगीतेचा अवतार आहे.



# अध्याय दुसरा

## सांख्य आणि बुद्धियोग

सञ्जय उवाच—

**तं तथा कृपयाऽऽविष्टम् अश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।**
**विषीदन्तमिदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥१॥**

संजय म्ह०—अशा प्रकारें अनुकंपेनें कळवळून गेलेल्या अश्रुपूर्ण विव्हललोचन अशा, उत्साहभंग झालेल्या त्या अर्जुनास श्रीकृष्ण ( मधुसूदन ) म्हणाले. १.

श्रीभगवान् उवाच—

**कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।**
**अनार्यजुष्टमस्वर्ग्यम् अकीर्तिकरमर्जुन ॥२॥**
**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।**
**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥३॥**

श्रीभगवान् म्ह०—अर्जुना ! या बिकट प्रसंगीं असा हा आर्यपुरुषास न शोभणारा, स्वर्ग आणि कीर्ति दोहोंपासून वंचित करणारा कुविचार तुझ्या मनांत कसा उद्भवला ? २ पार्था ! असा पाबळा होऊं नकोस, हें तुला शोभत नाहीं. हा मनाचा निंद्य दुबळेपणा झाडून टाक, आणि वीरा ! उठून ( युद्धाला ) उभा रहा. ३

अर्जुन उवाच—

**कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।**
**इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥४॥**

**गुरूनहत्वा हि महानुभावान् श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।**
**हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुंजीय लोकान् रुधिरप्रदिग्धान् ॥५॥**
**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।**
**यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥६॥**
**कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।**
**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥७॥**
**न हि प्रपश्यामि ममापनुद्यात् यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणाम् ।**
**अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥८॥**

अर्जुन म्ह०—हे मधुसूदना ! ह्या अत्यंत पूजनीय भीष्मपितामहावर आणि गुरुद्रोणावर या युद्धांत, हे दैत्यकंदना ! मी उलट बाण कसे टाकूं ? ४ मला तर या परमतेजस्वी गुरूंच्या हत्त्येचें पाप करण्यापेक्षां जगांत केवळ भिक्षा मागूनहि राहिलेलें पत्करेल. आपल्या केवळ ध्येयपूर्तीची इच्छा करणाऱ्या या पूज्य वडिलांची हत्या केल्यास, केवळ हत्याऱ्याचे जिणेंच जगावें लागेल. ५. अशा ह्या ( अडचणीच्या ) प्रसंगीं युद्ध करून जय मिळवावा, का ( मागें फिरून ) यांनाच विजयी होऊं द्यावें, यांपैकीं अधिक श्रेयस्कर कोणतें, हेंच मला कळेनासें झालें आहे. ज्यांचा वध केल्यास आपणाला आपलें जिणेंच नकोसें होईल, असे हे ( पितामह आणि गुरु ) कौरवांच्या बाजूनें माझ्यासमोर उभे आहेत. ६ माझ्या ह्या मनोदौर्बल्यामुळें माझी वृत्तीच डळमळून गेली आहे, आणि मनांत धर्माधर्माविषयीं गोंधळ उत्पन्न झाला आहे. म्हणून आतां तुलाच विचारतों, माझें खरें कल्याण कशांत आहे, तें निश्चित सांग. मी शिष्य भावानें तुला शरण आलों आहें, मला योग्य मार्ग दाखीव. ७ या लोकीं निष्कंटक आणि समृद्ध राज्य, किंवा ( परलोकीं ) देवांचें आधिपत्य मिळालें तरीहि, हें इंद्रियांना जाळून टाकणारें मनाचें वैक्लव्य शांत होईल असें मला दिसत नाहीं. ८

अर्थकाम म्हणजे धनलुब्ध असा सर्वसाधारण अर्थ केला जातो. पण अर्थ म्हणजे धन किंवा द्रव्य असाच अर्थ नाहीं. आपलें वचन, प्रतिज्ञा, प्रतिष्ठा, हीं देखील अर्थ होऊं शकतात. भीष्मद्रोणासंबंधीं तरी अर्थ म्हणजे द्रव्य म्हणणें बरोबर नाहीं. त्यांना युद्धांत कौरवांच्याच बाजूस राहण्यास, यापेक्षां अधिक श्रेष्ठ आणि गूढ कारणे होतीं. दोघेहि पूर्वींपासून कौरव पक्षाचे, त्यांनीं प्रसंगीं त्यांचा पक्ष सोडून जाणें कसें योग्य झालें असतें ? युद्ध दोघांनाहि नको होतें, पण पक्षच घ्यावयाचा तर कौरवांचाच पक्ष घेणें अपरिहार्य होतें.

सञ्जय उवाच—

**एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतपः ।**
**न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूर्णीं बभूव ह ॥९॥**
**तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।**
**सेनयोरुभयोर्मध्ये विषीदन्तमिदं वचः ॥१०॥**

संजय म्ह०—असें बोलून तो पराक्रमी अर्जुन (गुडाकेश) हृषीकेशाला म्हणाला, मी आतां युद्ध करणार नाहीं, आणि गप्प झाला. ९ (त्यावर) त्याला, दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं विषण्ण होऊन बसलेल्याला, हृषीकेश किंचित् हंसल्यासारखें करून म्हणाले, १०

श्रीभगवानुवाच—

**अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।**
**गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पंडिताः ॥११॥**
**न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।**
**न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥१२॥**
**देहिनोऽस्मिन् यथा देहे कौमारं यौवनं जरा ।**
**तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥१३॥**

श्रीभगवान् म्ह०—अरे ! तूं ज्यांच्यासंबंधीं व्यथित होणें योग्य नाहीं त्यांच्याचविषयीं तुझ्या चित्तांत वैक्लव्य उत्पन्न होत आहे, आणि वर

मोठ्या शहाणपणाच्या गोष्टी बोलत आहेस. खरे परमार्थज्ञ जसे मृताविषयीं शोक करीत नाहींत, तसेच ते विद्यमान सत्वासंबंधींहि व्यथित होत नाहींत. ११. मी आणि तूं नव्हतों, किंवा हे (युद्धास उभे राहिलेले) राजे पूर्वीं (या जन्मापूर्वीं ) नव्हते असे नाहीं, आणि यानंतर ( या जन्मानंतर ) आपणां सर्वांस पुनः जन्म येणार नाहीं असेंही नाहीं. १२ ज्याप्रमाणें एकाच मानव जन्मांत, देहांत बालपण, तारुण्य, वार्धक्य हे बदल होतात, तद्वतच मानवाला दुसरा देहहि प्राप्त होतो. शहाणा मनुष्य यानें घाबरत नाहीं. १३

शोक गतासंबंधीं होतो, आणि जिवंत आहे तो जाईल या भीतीनें चित्त व्यथित होतें. तो गेल्यावर जें दुःख होईल, त्याच्या कल्पनेनें मन उद्विग्न होतें. पण जे केव्हांतरी जाणारच आहेत, त्यांचेसंबंधीं दुःख करीत बसणें शाहण्याला शोभत नाहीं. गेले म्हणून, किंवा जाणार म्हणून दुःख करणें, आणि अशा अपरिहार्य घटनेसंबंधीं व्यथित होणें, योग्य नाहीं. देह अनित्य आहेत, जीव आणि आत्मा हे नित्य आहेत, हें ज्याला यथार्थानें समजलें, तो केवळ देहाच्या नाशानें दुःखित होणार नाहीं.

**मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः ।**
**आगमापायिनोऽनित्यांस्तान् तितिक्षस्व भारत ॥१४॥**
**यं हि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ ।**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥१५॥**

हे कौंतेया, शीत–उष्ण, सुख–दुःख ज्यांपासून उद्भवतात, ते विषयेंद्रिय संनिकर्ष सारखे घडत आणि मोडत असतात, त्यांना, हे भारता ! विवेकानें सहन केलेंच पाहिजे. १४ हे पुरुषश्रेष्ठा ! सुखें आणि दुःखें समत्त्वानें मानणाऱ्या ज्या विवेकी पुरुषाला हे संबंध विचलित करीत नाहींत, तोच अमृतत्वाचा अधिकारी होऊं शकतो. १५

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।**
**उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥१६॥**

**अविनाशी तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।**
**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित् कर्तुमर्हति ॥१७॥**

जें परमार्थतः " नाहींच " त्याचें अस्तित्व सिद्ध होत नाहीं, आणि जें " आहेच " त्याचा कधींहि अभाव होत नाहीं. असा हा दोहों-संबंधीं तत्त्ववेत्त्यांनीं सिद्धांत निर्णीत केला आहे. १६ (तो असा कीं) जें एक महत्तत्त्व या विश्वांत ओतप्रोत (भरून) आहे, तें अविनाशि (नित्य) आहे, कोणालाहि या अव्यय (अविनाशी) तत्त्वाचा नाश करितां येणार नाहीं. १७

देह अनित्य आहे, देही नित्य आहे. ज्या परमात्मतत्त्वानें हें सर्व विश्व व्यापलें आहे, तें नित्य आहे. सर्व चराचर विश्वाला व्यापून तो परमात्मा " अत्यतिष्टत् दशाङ्गुलम् " असें म्हटलें आहे. मरण देहाला आहे, आत्म्याला नाहीं. देहाचा नाश करणें शक्य आहे, त्या देहीचा नाश होत नाहीं.

**अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।**
**अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥१८॥**

कधींहि नाश न पावणारा, आणि अनाकलनीयस्वरूप नित्य (अविनाशी), जो शरीरी (देही, जीवात्मा) त्याचे हे (दृश्य) देह नाशवंत आहेत, म्हणून भारता ! तूं युद्धापासून माघार घेऊं नकोस. १८

युद्धांत देहांचा नाश होऊं शकेल, परंतु तूं ज्यांना पूज्य किंवा प्रिय मानतोस ते कांहीं केवळ गुरुजनांचे किंवा स्वजनांचे देह नाहींत. ते तत्त्वतः तर देहापासून वेगळे आहेत, आणि अविनाशी आहेत, मग नाश त्यांचा कसा होणार ? भलत्याच कल्पना मनांत आणून आपलें कर्तव्य, आणि आपला धर्म कां सोडतोस ?

**य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम् ।**
**उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥१९॥**

वास्तविक जो कोणी हाच (शरीरीच) मारणारा आहे असें मानतो,

किंवा जो कोणी हाच (शरीरी) मारला जातो असें मानतो, त्या दोघांनाहि (खरें) तत्त्व कळलें नाहीं; हा मारीतहि नाहीं, आणि मरतहि नाहीं. १९

काठकोपनिषत् १।२।१९ "हंता चेन्मन्यते हन्तु हतश्चेन्मन्यते हतम् उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥" हेंच वचन येथें गीतेंत घेतलें आहे. वर श्लोक १८ मध्यें "तस्माद्युध्यस्व भारत" हें वचन केवळ आनुषंगिक आहे. मुख्यतः काठकोपनिषदांत दिलेल्या वचनांचाच येथें विचार आणि विस्तार आहे.

**न जायते म्रियते वा कदाचित् नायं भूत्वा भविता वा न भूयः**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥२०॥**

ह्या देहीला केव्हांहि जन्म नाहीं, मरणहि नाहीं; आतां आहे तसा तो पुनः (मरणानंतर) राहणार नाहीं असेंहि नाहीं. ह्याला जन्म नाहीं, मरणहि नाहीं (हा नित्य आहे). हा अव्यय अनादि आहे. शरीराला मरण आलें तरी याला (देहीला) मरण येत नाहीं. २०

जन्म आणि मरण देहाला; जीवाला मरण नाहीं, जन्महि नाहीं. त्याला केवळ वाहनपालट आहे. हाच श्लोक असाच जवळजवळ काठकोपनिषदांत १।२।१८ आहे. जड शरीराला हालचाल प्राणाची, परंतु प्रेरणा जीवाची. हा जीव आत्माच, पण उपाहित. शुद्ध आत्मा अज, नित्य, शाश्वत, पुराण आहे. तो केवळ वासनेनें जीव आणि देही होतो, परंतु त्याचे मूळ धर्म तसेच राहतात. देह मरतो, जीव मरत नाहीं.

**वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।**
**कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम् ॥२१॥**

ज्याला हा (देही) अविनाशी, नित्य, अजन्मा, अव्यय आहे असें कळलें, तो पुरुष, हे पार्था ! कसें आणि कोणास मारवूं शकेल, किंवा स्वतः तरी कोणाला (आणि कसें) मारील ? २१

**वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरो पराणि ।**
**तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥२२॥**

वस्त्रें जीर्ण झालीं म्हणजे मनुष्य ती टाकून दुसरीं नवीं जशीं धारण करतो, तसेंच जीर्ण शरीरें टाकून देऊन, तो देही दुसऱ्या नव्या देहांत प्रवेश करतो. २२

**नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।**
**न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥२३॥**
**अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।**
**नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥२४॥**
**अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।**
**तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥२५॥**

या देहीला शस्त्रें तोडूं शकत नाहींत, अग्नि जाळूं शकत नाहीं, पाणी भिजवूं शकत नाहीं, किंवा वायु सुकवूं शकत नाहीं. २३ याचें छेदन, दाहन, प्लावन किंवा शोषण कांहींहि शक्य नाहीं. (कारण) हा नित्य, सर्वव्यापी, स्थिर, अढळ आणि शाश्वत असा आहे. २४ हा इंद्रियांना अगोचर, मनाला अकल्प्य, आणि कधींहि विकृती न पावणारा आहे, असा सिद्धांत आहे; म्हणून असें याचें स्वरूप तत्वतः समजल्यावर, याचा ( नाश होईल असें मानून ) शोक करणें तुला योग्य नाहीं. २५

**अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।**
**तथापि त्वं महाबाहो नैनं शोचितुमर्हसि ॥२६॥**
**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।**
**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥२७॥**
**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।**
**अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥२८॥**

आतां, हा देहीच पुनः पुनः जन्म घेतो आणि मरतो, असें मानीत असशील, तरी देखील त्यासंबंधीं एवढें दुःख करणें योग्य नाहीं. २६ जो जन्मला त्याला मरण ठरलेलेंच, आणि मेलेल्यालाहि पुनर्जन्म अटळच, तेव्हां ह्या अपरिहार्य गोष्टीसंबंधीं दुःख करणें बरोबर नाहीं २७ हे सृष्ट प्राणी पूर्वी ( या जन्मापूर्वी ), कोठें आणि काय होते सांगतां येत नाहीं; आतांचा हा त्यांचा मधला जन्म तेवढा आपणांस माहीत आहे. हे मेल्यावर कोठें जातील ( त्यांचें काय होईल ) हेंहि माहीत नाहीं, तर मग यासंबंधीं एवढें दुःख कां करावे? २८

**आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनम् आश्चर्यवद्वदति तथैव चान्यः।**
**आश्चर्यवच्चैवमन्यः शृणोति श्रुत्वाऽप्यैनं वेद न चैव कश्चित् ॥२९॥**

कोणी तर आश्चर्यानेंच या देहीकडे पाहत राहतात, कोणी याच्यासंबंधीं आश्चर्यानें बोलतात, कोणी याची आश्चर्ययुक्त वर्णनें ऐकतात, पण हीं वर्णनें ऐकूनहि कोणालाच याचें खरें ज्ञान होत नाहीं. २९

वरील चार श्लोकांत पुनर्जन्म, आणि मरणोत्तर पुनः पुनः जन्ममरणाचें चक्र, यांचा विचार केला आहे, आणि फार तर आपणास प्राण्यांच्या या एका जन्मासंबंधींच कांहीं तरी कळूं शकतें, हें सांगितलें आहे. पूर्वीच्या आणि या नंतरच्या जन्माविषयीं जर आपणास कांहींहि निश्चित ज्ञान नाहीं, तर एवढ्याशा एका जन्माबद्दल दुःख कशाला? ह्याच देही पुनः पुनः जन्माला येतो, तो कधींच मरत नाही, या सिद्धांताच्या आधारानेंच हें विवेचन केलें आहे. पण खरें तर याचें स्वरूप कोणासहि कळणें शक्यच नाहीं. मोठाले सिद्धांती याची आश्चर्ययुक्त वर्णनें करतात, पण याचें खरें स्वरूप कोणासच कळत नाहीं. श्लोक २९ तील आशय काठकोपनिषत् १-२-७ मध्यें दिल्याप्रमाणें "श्रवणायाऽपि बहुभिर्न लभ्यः शृण्वन्तोऽपि वहवो यं न विद्युः। आश्चर्यो वक्ता, कुशलोऽस्य लब्धाऽऽश्चर्या ज्ञाता कुशलानुशिष्टः ॥" असा दिला आहे. कोणसच निश्चित काय तें कळत नाहीं, तेव्हां शास्त्रसिद्धांताप्रमाणेंच त्यांचें स्वरूप मानावयास पाहिजे. जीवात्मा नित्य आणि सनातन असून, परमात्म्याचाच अंश आहे, पण तो शुद्ध (केवल) नसून उपाहित आहे, असा वेदांतशास्त्राचा सिद्धांत आहे.

**देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।**
**तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥३०॥**

हे भारता ! हा सर्व प्राणिमात्रांच्या देहांत वसणारा देही (जीवात्मा) सर्वदाच अवध्य ( मारतां न येणारा ) आहे, तेव्हां कोणत्याहि प्राण्यासंबंधीं दुःखानें विव्हल होणे तुला योग्य नाहीं. ३०

**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि ।**
**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत् क्षत्रियस्य न विद्यते ॥३१॥**
**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।**
**सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम् ॥३२॥**

तुझ्या स्वाभाविक क्षात्रधर्माचा विचार केल्यासहि तुझ्या चित्तांत हा विकंप ( माघार घेण्याची इच्छा ) उत्पन्न होणें योग्य नाहीं, कारण क्षत्रियाला धर्म्ययुद्धापेक्षां अधिक कल्याणकर कांहींहि दुसरे नाहीं. ३१ हें स्वर्गकपाट आपसुकच उघडलें गेलें आहे. भाग्यवंत क्षत्रियांनाच, पार्था ! असें हें धर्मयुद्ध लाभतें. ३२

अर्जुनाची युद्धापासून परावृत्ति केवळ चित्तभ्रमानें झाली होती, ती स्वाभाविक नव्हती. त्याला त्याच्या वर्णधर्माची आणि स्वभावाची मुद्दाम आठवण करून दिली आहे.

**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।**
**ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥३३॥**
**अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम् ।**
**संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥३४॥**
**भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः ।**
**येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥३५॥**
**अवाच्यवादांश्च बहून् वदिष्यंति तवाहिताः ।**
**निन्दन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥३६॥**

**हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महिम् ।**
**तस्मादुत्तिष्ठ कौंतेय युद्धाय कृतनिश्चयः ॥३७॥**

आतां जर तूं या धर्म्य युद्धापासून परावृत्त होशील, तर आपला धर्म आणि कीर्ति दोहींला मुकशील, आणि पापाचा मात्र धनी होशील. ३३ सर्व जग तुझी अव्याहतपणें निंदा करीत राहील. कीर्तिवताला तर अपकीर्ति मरणापेक्षांहि मरण आहे. ३४ हे (येथें जमलेले) महारथी, तूं भिऊन रणांतून पळून जात आहेस असें म्हणतील. आणि ज्यांनीं तुला आजपावेतों एवढा मान दिला, त्यांच्यापुढें तुला खालीं पहावें लागेल. ३५ तुझे शत्रु तुझ्या वीरत्वाची हेटाळणी करून, तोंडांतून काढूं नयेत असे अपशब्द तुझ्यासंबंधीं काढतील; यांपेक्षां अधिक उद्वेगजनक ते काय असणार? ३६ अरे! मारला गेलास तर स्वर्ग मिळविशील, आणि विजयी झालास तर पृथ्वीचें राज्य भोगशील. कर तर मग, अर्जुना! युद्धाचा निश्चय, आणि उठून उभा रहा. ३७

याप्रमाणें लौकिकवादानें अर्जुनाच्या मनाचा भ्रम घालविण्याचा प्रयत्न केला आहे. " द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमंडलभेदिनौ । परिव्राड् योगयुक्तश्च रणे चाभिमुखो हतः " असें महाभारतांत अन्यत्र आहे, त्याचाच येथें अनुवाद आहे.

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।**
**ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥३८॥**

सुख होवो वा दुःख होवो, लाभ होवो वा हानि होवो, जय होवो वा अपजय होवो, चित्ताची समता ढळूं द्यावयाची नाही, अशा बुद्धीनें युद्धास तयार हो, म्हणजे तुला कसलेंहि पाप लागणार नाही. ३८

श्लो. १६ ते ३० पावेतों तात्त्विकज्ञानाच्या भूमिकेवरून अर्जुनाचा भ्रमनिरास करण्याचा प्रयत्न केला. त्यानंतर पुनः त्याला लौकिक भूमिकेवरूनहि, याप्रसंगीं त्याचें कर्तव्य काय, तें स्पष्ट करून सांगितलें. त्याच्या सर्व शंकांचा निरास करण्यासाठीं, त्याला शेवटीं, आपलें स्वभावज कर्म केवळ कर्तव्यबुद्धीनें

केल्यास कोणतेंहि पाप लागणार नाहीं, असें येथें सांगितलें आहे. जय होईल का पराजय होईल, याची वाटाघाट करीत बसणें म्हणजे केवळ कर्तव्यशून्यता आहे. कोणतेंहि कर्म करणें योग्य आणि न्याय्य असें एकदां निश्चित झाल्यावर, मग त्यांत जयापजयाची वाटाघाट करीत बसणें योग्य नाहीं. हा उपदेश ज्ञान आणि व्यवहार दोन्ही दृष्टीनें केला आहे.

**एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ।**
**बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि ॥३९॥**

ही ( आतां पावेतों ) तुला सांख्यबुद्धि ( ज्ञानाच्या तात्त्विकभूमिकेवरून ) सांगितली, आतां ही योगबुद्धि सांगतो, ऐक. या योगबुद्धीनें युक्त झालास, म्हणजे पार्था ! कर्मबंधापासून मुक्त होशील. ३९

आतां पावेतों ज्ञान आणि व्यवहार दोन्ही सांगितलीं. येथें सांख्य म्हणजे ज्ञान, सांख्यदर्शन नव्हे. हें ज्ञान म्हणजे परमार्थवस्तुविवेक. योग म्हणजे परमात्म्याशीं, परमेश्वराशीं तादात्म्य. जें कर्म करावयाचें तें ईश्वरार्पण बुद्धीनें करावयाचें. “ तदर्थ ” आणि “ मुक्तसंग ” होऊन कर्म केल्यास, तें कर्म आपलें नव्हेच, मग त्यापासून बंध होणार नाहीं, हें साहजिकच झालें. अहंता, ममता, लोभ, हींच बंधाला कारण होतात, तीं नसल्यास बंध कोठचा ?

**नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।**
**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥४०॥**

या बुद्धियोगांत ( मोक्षमार्गकर्मयोगांत ) आरंभिलेलें कर्म विफल होत नाहीं, आणि कांहीं विपरीत फल ( दोष ) होण्याचीहि आशंका नाहीं. तसेंच या योगधर्माच्या थोडया ( स्वशक्त्यनुसार ) अनुष्ठानानें देखील, महद्भयापासून ( जन्ममरणरूप संसारापासून ) साधकाचें रक्षण होईल. ४०

पुढील पांच श्लोकांत काम्य कर्मानुष्ठानाचा उल्लेख आहे. त्या कर्मांतील अभिक्रमनाश आणि प्रत्यवायोत्पत्ति या दोषांची भीति बुद्धियोगाचरणांत

कधींहि नाहीं असें निक्षून सांगितलें आहे. श्रौतस्मार्त काम्यकर्में एकादा आरंभिल्यावर शेवट पावेतों, कांहीं विघ्न न येतां, यथासाग, त्यांतील विधिमध्यें बारीकसारीकहि चुकी न होऊं देतां पार पडलीं, तरच त्यांचे अपेक्षित फल मिळणें शक्य असतें. कर्म अर्धवट राहिलें, त्यांत कांहीं विघ्न आलें, किंवा विधींत कांहीं चुकी झाली, तर सर्वच निष्फल होतें; उलट दोष लागण्याचीच भीति असते. तसें बुद्धियोगानुष्ठानासंबंधीं नाहीं. काम्यकर्में विशिष्ट फलाकांक्षेनें केलीं जातात, तसें बुद्धियोगानुष्ठानांत नसून, साधकाला यथाधिकार साध्य जी सद्गति ती प्राप्त होते. जेवढ्या उत्कटतेनें, प्रयत्नानें आणि सातत्यानें, हें योगानुष्ठान होईल, त्या मानानें सिद्धि निश्चित मिळते. फलाकांक्षाच नसल्यानें, त्यांत वैफल्याचीहि भीति नाहीं.

**व्यवसायात्मिका बुध्दिरेकेह कुरुनदंन ।**
**बहुशाखा ह्यनन्ताश्च बुध्दयोऽव्यवसायिनाम् ॥४१॥**

हे कुरुनंदना ! या बुद्धियोगनिष्ठेंत एकाच ध्येयावर बुद्धि निश्चयानें केंद्रित करावयाची असते, परंतु ज्यांची बुद्धि अशी निश्चित झालेली नसते, त्याच्या बुद्धीला अनंत फाटे फुटतात. ४१

काम्यकर्में अनेक, आणि त्यांचीं फलेंही अनेक प्रकारचीं, तेव्हां यां काम्यकर्मासंबंधीं निश्चित असें एकच ध्येय नाहीं. पण योगाचें ध्येय एकच. काठकोपनिषदांत योगाचे वर्णन असें आहे. “ यदा पंचावतिष्ठन्ते ज्ञानानि मनसा सह । बुद्धिश्च न विचेष्टति तामाहुः परमां गतिम् ॥ तां योगमिति मन्यन्ते स्थिरामिन्द्रियधारणाम् । अप्रमत्तस्तदा भवति योगो हि प्रभवाप्ययौ ॥ ” मूलकारणाशीं संयोग ज्यांत साध्य होतो तो योग. येथें योगमार्गांत एकच एक निश्चित ध्येय, आणि एकच एक निश्चित मार्ग असतो.

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः ।**
**वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥४२॥**
**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।**
**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥४३॥**

**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।**
**व्यवसायात्मिका बुध्दिः समाधौ न विधीयते ॥४४॥**

वैदिक कर्मकाण्डाच्या अर्थवादावर भर देणारे, आणि कर्मापेक्षां श्रेष्ठ दुसरें कांहींहि नाहीं असें प्रतिपादन करणारे, वेदाभ्यास जड, मोठ्या रसभरित वाणीनें, त्या कर्मांची महती सांगतात. ४२ हे केवळ काम्य-कर्मांत गढून राहणारे कर्ममार्गी, स्वर्गप्राप्तीच श्रेष्ठ साध्य मानतात, आणि भोग आणि ऐश्वर्य प्राप्त करून देणाऱ्या, जन्म हेंच कर्मफल देणाऱ्या, विशिष्ट ( काम्य ) क्रियांचे आडंबर करतात. ४३ ( याप्रमाणें ) भोग आणि ऐश्वर्याच्या मागें लागलेल्यांची आणि त्यायोगें ( योग्य मार्गापासून ) चालितचित्त झालेल्यांची बुद्धि त्या कर्ममार्गांत निश्चित असली, तरी त्यांच्या चित्तास समाधान प्राप्त होऊं शकत नाहीं. ४४

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।**
**निर्द्वंद्वो नित्यसत्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥४५॥**

वैदिक कर्मकाण्डाचा त्रिगुणांशीं ( सांसारिक विषयांशीं ) संबंध आहे. तूं त्रिगुणांपासून अलिप्त ( निष्काम ), ( सुख–दुःख, राग–द्वेष, लाभालाभ इत्यादि ) द्वद्वांनीं व्यग्र न होणारा, शुद्ध सत्त्वगुणांत स्थिर राहणारा, योगक्षेमाची चिंता न वाहणारा, जितेंद्रिय असा हो. ४५

कर्मकाण्डांत कांहीं कर्में सत्वप्रधान, कांहीं राजस, तर कांहीं तामस अशीं सांगितलीं आहेत. गुण बंधकारक आहेत. त्यांपासून चित्ताला शांति, किंवा समाधान मिळत नाहीं. काम्य कर्मांचा त्यागच करावयास पाहिजे. राग–द्वेष लाभालाभादि द्वंद्वें दुःखाला कारणीभूत होतात, म्हणून त्यापासून दूर राहून शुद्ध सत्त्ववृत्तीचाच आश्रय करावयास पाहिजे.

**यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।**
**तावान् सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥४६॥**

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।**
**मा कर्मफलहेतुर्भूः मा ते सङ्गोस्त्वकर्मणि ॥४७॥**
**योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा धनंजय ।**
**सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥४८॥**

सर्वत्र विपुल जलसंचय लभ्य असला, तरी त्यांतून आपल्याला आवश्यक ( आणि हितकारक ) तेवढेच घ्यावयाचें असतें, अशाच प्रकारची बुद्धि ज्ञानवान् ब्रह्मनिष्ठाची सर्व वैदिक कर्मासंबंधीं असते. ४६ ( विहित ) कर्मे योग्य प्रकारे करणें, एवढाच तुझा अधिकार ( कर्तव्य ) आहे, ( त्या कर्मांच्या फलश्रुतींत सांगितलेल्या ) फलासंबंधीं तुला कसलाहि अधिकार ( हक्क ) नाहीं. केवळ कर्मफलाच्याच उद्देशानें कर्मे करूं नकोस, आणि कर्म परित्यागाविषयींहि आसक्ति धरूं नकोस. ४७ अर्जुना! परमेश्वराच्या ठायीं अनन्य भावानें, आणि अनासक्तबुद्धीनें, साध्याची पूर्ति किंवा अपूर्ति दोहोंविषयीं समचित्त राहून कर्माचरण कर. चित्ताच्या समतेलाच योग म्हणतात. ४८

यज्ञदानतपादि विहित कर्मे, तसेंच प्राप्त आणि स्वभावविहित कर्मे करणें, एवढेंच प्रत्येकाचें कर्तव्य आहे. त्यांपासून कोणतीं फळें प्राप्त होतील, किंवा होणार नाहींत, ह्यासंबंधीं अधिकार कर्त्याचा नाहीं.

**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।**
**बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥४९॥**
**बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।**
**तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥५०॥**

हे धनंजया! बुद्धियोगापेक्षां केवळ कर्माचरण कितीतरी कनिष्ठ आहे. तूं बुद्धियोगाचा आश्रय कर. फलाच्या हेतूनें कर्माचरण करणारे लोक क्षुद्र कोत्या मनाचे आहेत. ४९ योगबुद्धीनें कर्म करणारा पुण्य आणि पाप दोहोंपासून मुक्त होतो, म्हणून परमात्म्याशीं अनन्यत्व प्राप्त करण्याचा अभ्यास कर; कर्माचरणांत योगबुद्धि असणें कल्याणप्रद आहे. ५०

महत्त्व बुद्धियोगाचें आहे. शास्त्रविहित, स्वभावज, परिस्थित्यनुरूप, स्वशक्त्यनुरूप आणि योग्य कर्म कोणतें हें आपले आपणच ठरवून, तें निरभिमान बुद्धीनें, निर्ममत्वानें करावयाचें, आणि ईश्वराला अर्पण करावयाचें. पाप तर अधोगतीला नेणारें आहे, पण पुण्यहि बंधकारक होतें. योगबुद्धीनें या दोहोंपासून कर्ता अलिप्त राहूं शकतो. कर्माचरणांत योगबुद्धि असणें हें कुशल ( कल्याण ) देणारें आहे.

**कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।**
**जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयम् ॥५१॥**

कारण, बुद्धियुक्त ( परमात्मतत्त्वाशीं एकरूप झालेले ) योगी कर्मफलाचा पारित्याग करून, जन्म आणि कर्मबंध यांपासून मुक्त होऊन, तें आनंदमय कैवल्यपद प्राप्त करतात. ५१

अनामय म्हणजे सर्वोपद्रवरहित, सर्व सुखदुःखांच्या पलीकडचें, आनंदमय.

**यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।**
**तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥५२॥**
**श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।**
**समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥५३॥**

तुझी बुद्धि या ( कार्याकार्यांच्या, हेयाहेयाच्या ) भ्रमाच्या गहन गोंधळांतून बाहेर पडली, म्हणजे मगच तुला ( या कर्मफलाच्या ) श्रुतश्रोतव्याचा ( आजपावेतो ऐकलेल्याचा, आणि इतःपर ऐकशील त्याचाहि ) वीट येईल. ५२ अशा ( प्रवृत्ति-निवृत्तिलक्षण ) श्रवणांनीं गोंधळून चळलेली तुझी बुद्धि, जेव्हां तुझ्याच अंतःकरणांत स्थिर होऊन राहील ( बाह्य फलाशेपासून परावृत्त होईल ), तेव्हांच तुला त्या परम तत्त्वाशीं ऐक्य साध्य होईल. ५३

अमक्या कर्माचें फल अमुक, असें जें कर्मकाण्डांत सांगितलें आहे, त्यानें बुद्धि विचलित होणें साहजिक आहे. परंतु हीं फलें अनित्य आहेत, आणि अंतीं सद्गति प्राप्त करून देणारीं नाहींत, असें कळल्यावर तीं कर्में नकोशींच

वाटतील. लोकव्यवहारांत देखील, केवळ फलाच्या लोभानें कर्माकडे धाव घेणारांची बुद्धि विचलित होऊन, त्यांच्या मनाचें समाधान आणि शांति ढळणारच. आपणास योग्य असें कर्म कोणतें तें ठरवून, तें, एकनिष्ठेनें, आणि कर्तव्यबुद्धीनें केल्यास, त्यापासून मनाला समाधान लाभेल, आणि तें कर्म ईश्वरार्पण बुद्धीने, आणि निरहंकारवृत्तीनें केल्यास परम शांति प्राप्त होईल. "नायमात्मा प्रवचनेन लभ्यः न मेधया न बहुना श्रुतेन। यमेवैष वृणुते तेन लभ्यः तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम्" मुंडकोपनिषत् ३।२।३

अर्जुन उवाच—

**स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥५४॥**

अर्जुन म्ह०—स्थितप्रज्ञ ( अढळ ज्ञानी ) कोणास म्हणावयाचें, समाधिस्थ ( समाहित चित्त ) कसा असतो, ज्ञाननिष्ठ योगी कसें बोलतो, कसा बसतो ( राहतो ), कसा वागतो ? ५४

**श्रीभगवानुवाच—प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान्।**
**आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥५५॥**

प्रत्यगात्मस्वरूपांत आत्मसंतुष्टयोगी ( संन्यासी ) अंतःकरणांतील सर्व कामनांचा परित्याग करतो, तेव्हां त्याला स्थितप्रज्ञ म्हणतात. ५५

अद्वैतानंदांत मग्न होऊन योगी आत्माराम होतो. द्वितीय कांहींच नसल्यामुळें कामनेला अवसरच उरत नाहीं. आपणासकट सर्व कांहीं त्यानें परमात्म्याचे ठिकाणीं समर्पण केल्यानें, आणि समर्पणाचीहि जाणीव त्यास नसल्यानें, सर्व कांहीं "परं ब्रह्म" होऊन गेल्यामुळें, त्याला कामना कसली असणार ? असा योगी ज्ञाननिष्ठ, ज्ञानस्वरूप, स्थितप्रज्ञ म्हणावयाचा.

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥५६॥**

दुःखानें ज्याचें मन उद्विग्न होत नाहीं, सुखाविषयीं ज्याला हांव नाहीं, विषयासंबंधीं आसक्ति, ( अन्यापासून ) भय, आणि (वैफल्यामुळें)

ज्याला क्रोध कधींहि उत्पन्न होत नाहीं, तसेंच ज्याची बुद्धि अत्यंत स्थिर असते, त्याला मुनी ( आत्ममग्न ) म्हणतात. ५६

वरील दोन श्लोकांत " सर्व संकल्प संन्यासी " आणि " सत्वसमाविष्ट, मेधावी, च्छिन्नसंशय त्यागी " योग्याचें वर्णन आहे. हें दोघे वेगळे नाहीत. " यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि, " संन्यासी आणि योगी एकच.

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।**
**नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥५७॥**
**यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ।**
**इंद्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥५८॥**

ज्याला कोणत्याहि बाह्य वस्तूंविषयीं ममत्व नाहीं, आणि जो कोणत्याहि सुखकर किंवा दुःखकर घटनेनें हर्षित किंवा पीडित होत नाहीं, त्याचीच बुद्धि स्थिर असते ( तोच स्थितप्रज्ञ आहे ). ५७ कांसव ज्याप्रमाणें आपले अवयव पूर्णपणें आंत ओढून घेतें, त्याप्रमाणे पुरुष जेव्हां विषयांपासून आपलीं इंद्रियें आवरून मागे घेतो, तेव्हांच त्याची बुद्धि स्थिर झाली म्हणावयाची ( तोच स्थित प्रज्ञ म्हणावयाचा ). ५८

" सर्वत्र अनभिस्नेह " ज्यास कशाविषयींहि आणि कोणाविषयींहि आसक्ति (ममता) नाहीं, आणि जो सुखदुःखादि द्वंद्वांत समबुद्धि असतो, आणि ज्याला विषयांसंबंधीं किंचितहि ओढ नाहीं, तोच खरा संन्यासी, खरा स्थित प्रज्ञ.

**विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः ।**
**रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥५९॥**

विषयांचे सेवनच न करणारापासून विषय दूर जातील, विषयासंबंधीं गोडी ( किंवा अंतरंगांतील प्रीति ) मात्र शिल्लक राहील, पण तीहि परमतत्त्वाचें दर्शन झाल्यावर नाहींशी होईल. ५९

विषयांशीं संबंधच येऊं न दिला, तर बाह्यरूप विषय दूर करतां येतील;

परंतु त्या विषयासंबंधीं अंतःकरणातील ओढ सर्वस्वीं नाहींशी होणार नाहीं. आत्मसाक्षात्कार झाल्यावर, " रसो वै सः " असें ज्याचें वर्णन आहे, त्याचें दर्शन झाल्यावर मात्र, हे गौण रस आपोआप चित्तांतून गळून पडतील. संन्यासी, किंवा स्थितप्रज्ञ योगी बाह्यविषय अनुभवीत नाहीं असें नाहीं, पण त्याच्या मनात त्यांविषयीं आवड किंवा ओढ नसते, ते असोत कीं नसोत, त्याचें तिकडे लक्षच नसतें.

**यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः ।**
**इंद्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥६०॥**
**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।**
**वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥६१॥**

हे कौंतेया ! ( परमतत्वाच्या साक्षात्कारासाठीं ) प्रयत्न करणाऱ्या ज्ञानी पुरुषाचीहि अनावर इंद्रियें त्याचें मन बळजोरीनें विचलित करतात. ६० त्या सर्वांचें संयमन करून, मीच ( ईश्वरच ) सर्वस्वीं आपली परम गति आहे अशा अनन्यभावानें युक्तचित्त असावें; ज्याचीं इंद्रियें संयमित झालीं, त्याचीच बुद्धि स्थिर होते ( तोच स्थितप्रज्ञ म्हणावयाचा ). ६१

**ध्यायतो विषयान् पुंसः संगस्तेषूपजायते ।**
**सङ्गात् संजायते कामः कामात् क्रोधोऽभिजायते ॥६२॥**
**क्रोधात् भवति संमोहः संमोहात् स्मृतिविभ्रमः ।**
**स्मृतिभ्रंशात् बुद्धिनाशो बुद्धिनाशात् प्रणश्यति ॥६३॥**

ज्याच्या चित्तांत नेहमीं विषय घोळत असतात, त्याला त्यांसंबंधीं आसक्ति उत्पन्न होते, आसक्तीपासून ते विषय प्राप्त होण्याविषयीं उत्कट इच्छा, आणि ( इच्छेप्रमाणें ते विषय प्राप्त झाले नाहींत तर ) त्या इच्छेपासून क्रोध उत्पन्न होतो. ६२ क्रोधापासून चित्तास भ्रांति आणि भ्रांति झाल्यावर आपण कोण आहोंत याचें त्याला भानच राहत नाहीं; असे झालें म्हणजे बुद्धीचें स्थैर्य नष्ट होऊन, अंतीं त्याचा सर्वस्वीं नाश होतो. ६३

इंद्रियांचा आणि मनाचा निग्रह न केल्यास कशी अनर्थपरंपरा ओढवते तें सांगितलें. परंतु, देहवंताला विषय सर्वस्वीं टाळणें तरी कसें शक्य होईल? म्हणून विषयांकडे दृष्टी कशी असावी, तें सांगतात.

**रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ।**
**आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥६४॥**

विषयांसंबंधीं आसक्ति नाहीं, पण द्वेषहि नाहीं, अशा आत्मसंयमित इंद्रियांनीं (आणि त्यांबरोबरच मनानेंहि) विषयांकडे पाहिल्यास (वागल्यास), संयमी पुरुषाचें चित्तास प्रसन्नता लाभेल. ६४

जर विषयांविषयीं ओढ नसेल, किंवा त्यांचा त्याग करण्याचा मुद्दाम प्रयत्न नसेल, तर त्यांत वावरल्यानें चित्तावर कांहींहि परिणाम होणार नाहीं. अनेक विषय आपल्या समोरून जातात, पण आपलें तिकडे लक्षच नसेल, तर त्यांचा चित्तावर कांहींच परिणाम होणार नाहीं; ते येतील, आाण जातील. विषयच केवळ मनास विकृति उत्पन्न करूं शकत नाहींत, मनच विषयांना विकृत रूपानें पाहात असतें, आणि विकृत मन दुःखाला कारण होतें. निर्लोभ आणि निर्द्वेष मनानें विषयांशीं संबंध आल्यास, त्यापासून चित्ताची शांति ढळण्याचें कारणच नाहीं. वस्तु आवडली म्हणजे तिच्यापासून होणारा आनंद होणारच, परंतु ती आपणास मिळावी, तिच्यावर आपलें स्वामित्व असावें, अशी लोभबुद्धी झाली म्हणजे तीच वस्तु दुःखाला कारण होऊं शकते. सर्व जगतांतील वस्तुजात पाहून, त्या पाहण्याचा आनंदच घेत राहिल्यास सर्व आनंदमयच होईल, परंतु तेथें आवड–निवड, राग–द्वेष, हेयादानबुद्धि उद्भून झाल्यास, मग तो शुद्ध आनंद कसा मिळणार? " न प्रहृष्येत् प्रियं प्राप्य नोद्विजेत् प्राप्य चाप्रियम् । स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रम्हवित् ब्रह्मणि स्थितः ॥" अशी स्थिरबुद्धि स्थितप्रज्ञाची असते. केवळ डोळे मिटून विषयांपासून परावृत्त होतां येत नाही, मन अविकृत पाहिजे.

**प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।**
**प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः प्रर्यवतिष्ठते ॥६५॥**

**नास्ति बुध्दिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।**
**न चाभावयतः शांतिरशान्तस्य कुतः सुखम् ॥६६॥**
**इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।**
**तदस्य हरति प्रज्ञां वायूर्नावमिवाम्भासि ॥६७॥**
**तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।**
**इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥६८॥**

( इंद्रियाच्या आणि मनाच्या निग्रहानें ) प्रसन्नता लाभल्यावर, त्याच्या ( योग्याच्या ) सर्व दुःखांचा अंत होतो, आणि अशा प्रसन्नान्तःकरण असलेल्या मनुष्याचे बुद्धीस अत्यंत स्थिरता प्राप्त होते ( ती आत्मस्वरूपी निश्चल होते ). ६५ ज्याचें चित्त ( परतत्वाचें ठिकाणीं ) एकत्व पावलेलें नाही, त्याची बुद्धि स्थिर राहूं शकत नाहीं, आणि त्याला निष्ठा ( दृढबुद्धि ) नाहीं. ज्याची बुद्धि दृढ नाहीं ( चंचल आहे ), त्याच्या चित्तास शांति नाहीं; आणि शांति नाहीं, त्याला सुख कोठचें ? ६६ जें मन विषयांच्या नादीं लागणाऱ्या इंद्रियांच्या मागें जाईल, तें बुद्धीला, वायु पाण्यावर होडगें हवें तिकडे नेतो त्याप्रमाणें, स्वैर भटकावयास लावील. ६७ म्हणून, हे महाबाहो अर्जुना ! ज्याचीं इंद्रियें विषयांपासून पूर्णपणें परावृत्त आहेत, त्यांचीच बुद्धि स्थिर राहूं शकते. ६८

देह आहे तोंपावेतों बाहेरचें जग आहेच, आणि इंद्रियें आहेत, तों पावेतों इंद्रियांचे विषयहि आहेतच. डोळे मिटून घेतले तरी विषयांची स्मृती नाहीशी होणार नाहीं. विषयांसंबंधीं आस्था आणि ओढ नसेल, तरच त्यांविषयीं तटस्थता शक्य होईल. कोणत्याही विषयांसंबंधी द्वेष, किंवा त्याला टाळण्याची वृत्ति जर सतत मनांत राहील, तर तोहि त्या विषयाशीं संबंधच होईल. विरोधहि एक संबंधच आहे. परंतु, विषयांसंबंधीं तटस्थता किंवा औदासीन्य असल्यास, त्या विषयांपासून चित्तास व्यग्रता उत्पन्न होणार नाहीं. आपल्या डोळ्यांसमोरून अनेक विषय जातात, परंतु ज्यांच्याशीं आपला संबंध नसतो, त्यांपासून मनावर कांहींच परिणाम होत नाहीं. सुखदुःखें रागद्वेषांत असतात, तीं विषयांत नाहींत. चित्त तर कधींच रिकामें राहूं

शकत नाही. तें जर परतत्त्वाशीं युक्त असेल, तर विषय आपोआपच बाजूस सरतील; आणि विषय दूर होऊन बुद्धि स्थिर होईल, तरच शांति आणि समाधान लाभेल.

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥६९॥**

भूतमात्राची ज्यापासून निवृत्ति ( निशा ) त्याठिकाणीं जितेंद्रिय योग्याची निष्ठा ( जागृति ) असते, आणि ज्या ठिकाणी भूतमात्राची आसक्ति ( जागृति ) असते, त्यापासून आत्मद्रष्ट्या मुनीची निवृत्ति ( निशा ) असते. ६९

विषयसुखाची हांव ही प्राणिमात्राची प्रवृत्ति आहे. ही हांव कधींच संपत नाहीं. आणि म्हणून चित्तास स्थिरता नाहीं, शांतीहि नाहीं. परमतत्त्वाशीं बुद्धि एकरूप झाली, विषयाची ओढ नाहींशी झाली, म्हणजे मगच शांति प्राप्त होईल. प्राणिमात्राची प्रवृत्ति विषयांकडे, तर योग्याची प्रवृत्ति आत्मज्ञानाकडे; त्याचा सतत प्रयत्न आत्मसंतोष प्राप्तीविषयीं, विषयसुखासंबंधी नसतो.

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ।**
**तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी ॥७०**

अनेक जलौघ आंत येऊन मिळत असतांहि ज्याची सीमा अढळच असते, अशा समुद्रांत प्रवेश करणाऱ्या जलाप्रमाणेंच सर्व इंद्रियार्थसान्निकर्ष ज्याच्या चित्ताला प्रतीत होतात, त्यालाच शांति मिळते. इंद्रियार्थांची कामना करणाराला शांति मिळणें शक्य नाही. ७०

**विहाय कामान् यः सर्वान् पुमांश्चरति निस्पृहः ।**
**निर्ममो निरहंकारः स शान्तिमधिगच्छति ॥७१॥**
**एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।**
**स्थित्वाऽस्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥७२॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे सांख्ययोगो नाम द्वितीयोऽऽध्यायः**

सर्व कामनांचा परित्याग करून, सर्व इच्छा सोडून देऊन, ममत्वाहंत्व-विरहितवृत्तीनें जो वागतो, त्याला शांति प्राप्त होते. ७१ ( योग्याच्या ) या स्थितीला ब्राह्मी स्थिति ( ब्रह्मनिष्ठा ) म्हणतात. ही प्राप्त झाल्यास चित्त कधींच विचलित होत नाहीं, आणि याच स्थितींत स्थिर राहून अंतकालींहि योग्याला ब्रह्मसायुज्य प्राप्त होतें. ७२

ही ज्ञाननिष्ठ स्थितप्रज्ञ योग्याला प्राप्त होणारी परम गति सांगितली आहे. चित्त व्यग्र होऊ न देतां, स्थिर चित्तानें, अहंता आणि ममता सोडून ईश्वरार्पण बुद्धीनें स्वकर्माचरण केल्यास, अंतीं परमगति मिळेल, असा अर्जुनास उपदेश केला आहे. कर्तव्याकर्तव्याच्या गोंधळात तो पडला होता, त्यांतून बाहेर पडण्याचा उपाय, स्वभाव नियत कर्म निःस्वार्थ बुद्धीनें करणें, हाच सांगितला आहे. स्वकर्म, स्वधर्म यासंबंधीं गोंधळ मनांत उद्भवतात. त्यांसंबंधी निर्णय करणें कठीण होतें. शुद्ध, निरपेक्ष, कामक्रोध रहित स्वकर्तव्यदक्षतेची बुद्धी ठेवल्यास, शुद्ध अंतरात्मा निर्णय देतो. पण, जर अंतःकरणावर कामक्रोधादिकांचें आवरण आलें असेल, आणि अंतरात्मा मंदप्रभ झाला असेल, तर योग्य मार्ग दिसणार नाहीं. बुद्धि कलुषित झाली असेल, तर योग्य निर्णय मिळणार नाहीं. यासाठीं "मी" कोण, जगताचा माझा संबंध काय, आपल्या समोर समस्या आहे तिचें स्वरूप काय, ह्या विषयींचा शुद्ध निरपेक्ष बुद्धीनेंच निर्णय करावयास पाहिजे. तत्त्वज्ञान आणि व्यवहार दोहीं दृष्टींनीं अर्जुनास उपदेश केला आहे. स्वर्गाविषयींच्या कल्पनेला बाजूस सारून, बुद्धीचें समत्व आणि ईश्वरार्पण बुद्धीनें कर्माचरण, हींच दोन तत्त्वे अर्जुनाचे पुढें सविस्तर मांडलीं आहेत, आणि परमपदाची प्राप्ति होण्यास बुद्धियोगाचा उपदेश केला आहे.

---

# अध्याय तिसरा

## कर्मयोग

अर्जुन उवाच—**ज्यायसी चेत् कर्मणस्ते मता बुध्दिर्जनार्दन ।**
**तत्किं कर्माणि घोरे मां नियोजयसि केशव ॥१॥**
**व्यामिश्रेणेन वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।**
**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥२॥**

अर्जुन म्ह०—हे केशवा ! हे जनार्दना ! कर्मनिष्ठेपेक्षां बुद्धिनिष्ठा श्रेष्ठ, असेंच जर तुझें म्हणणें आहे, तर मग हें घोर कर्म करण्याचा मला आग्रह कां करीत आहेस ? १ अशा संदिग्ध भाषणानें माझ्या बुद्धीस अधिकच गोंधळांत टाकीत आहेस, असें मला वाटतें. तर आतां मला ज्यानें परम कल्याण साध्य होईल, असें एकच निश्चित काय तें सांग २

श्रीभगवान उवाच–**लोकेऽस्मिन् द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयाऽनघ ।**
**ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥३॥**

श्रीभगवान म्ह०—हे निष्पापा ( अर्जुना ) ! या मनुष्यलोकांत दोन श्रेय:प्राप्तीचे मार्ग आहेत, असें मी तुला पूर्वींच सांगितलें, एक सांख्यांची ( ज्ञानमार्गी मुनींची ) ज्ञानयोगनिष्ठा, आणि दुसरी योग्यांची कर्मयोगनिष्ठा. ३

एका मार्गानें केवळ ज्ञानानेंच मोक्ष मिळवावयाचा, " ज्ञानादेव तु कैवल्यम् ", आणि दुसऱ्यानें, कर्माचरणानें ( क्रमानें ) मोक्षास अधिकारी व्हावयाचें; दोन्ही मार्गांचें अंतिम साध्य एकच.

**न कर्मणामनारम्भात् नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।**
**न च संन्यसनादेव सिध्दिं समधिगच्छति ॥४॥**

केवळ कर्म न करण्यानेंच ( कर्मपरित्यागानेंच ) नैष्कर्म्य ( कर्मबंधापासून मुक्तता ) मनुष्यास प्राप्त होत नाहीं, आणि केवळ संन्यासानेंच सिद्धि मिळत नाहीं. ४

**न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ।।५।।**
**कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।**
**इंद्रियार्थान् विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ।।६।।**

कर्म केल्याशिवाय कोणीहि क्षणभरदेखील राहूं शकत नाहीं. सर्वांनाच त्यांचे स्वभावज गुण कर्में करावयास अपरिहार्यतेनें लावतात. ५ केवळ बाह्य कर्मेंद्रियें आवरून धरून, जो मनांत विषयांचें चिंतन करीत राहतो, त्या महामूर्खाला ढोंगीच म्हणावयाचें. ६

मी कोणतेंच कर्म करणार नाहीं, असें म्हणणें हा दुराग्रह आहे. देह आहे तोंवर कर्म आहेच. कर्में हीं अनेक प्रकारचीं आहेत. कांहींच करणार नाहीं, असें म्हणणें वेडेपणा आहे. ज्ञाननिष्ठ सांख्ययोगीहि असें म्हणणार नाहीं. शारीर आणि प्राणकर्में तर निसर्गतः होतच असतात. शास्त्रविहित, स्वभावविहित, लौकिक, यज्ञदानतपादिकर्में हीं करावयाचीं किंवा नाहींत, हाच काय तो प्रश्न आहे. जीं कर्में आपोआपच होतात, करावीं लागत नाहींत, त्यांसंबंधीं प्रश्नच नाहीं. कर्में जर अपरिहार्यच आहेत, तर तीं कोणत्या बुद्धीनें करावयाचीं, कोणतीं करावयाचीं, कोणतीं करावयाचीं नाहींत, एवढाच विचार करावयाचा.

**यस्त्विंद्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।**
**कर्मेंद्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ।।७।।**

परंतु जो मनानें इंद्रियांचा निग्रह करून ( संयमानें ) कर्मेंद्रियांनीं (मन किंवा बुद्धि विचलित होऊं न देतां ), युक्त चित्तानें आणि अनासक्त बुद्धीनें, स्वकर्मानुष्ठान करतो, तो पुरुष श्रेष्ठ आहे. ७

" कर्मयोगम् आरभते असक्तः सन्, " येथें कर्मयोग म्हणजे काय, तें सांगितले आहे.

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।**
**शरीरयात्राऽपि च ते न प्रसिध्द्येदकर्मणः ॥८॥**

तूं विहितकर्म कर; कर्म न करण्यापेक्षां कर्म करणें अधिक चांगले. तूं जर कर्म केलें नाहींस, तर तुझा योगक्षेमहि चालणार नाहीं. ८

**यज्ञार्थात् कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः ।**
**तदर्थं कर्म कौंतेय मुक्तसंगः समाचार ॥९॥**

हे कौंतेया ! यज्ञाला उद्देशून केलेल्या कर्मांशिवाय इतर सर्व कर्मे ह्या मनुष्यलोकांत कर्मबंधन ( कर्मांमुळें पुनर्जन्म देणारीं ) आहेत, ( म्हणून ) अनासक्तबुद्धीनें केवळ यज्ञार्थ कर्मे कर. ९

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।**
**अनेन प्रसविष्यध्वम् एष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥१०॥**

सृष्ट्युत्पत्तिकालीं यज्ञासह प्रजा निर्माण करून ब्रह्मदेव म्हणाले, या यज्ञानें तुमची अभिवृद्धी होवो, हाच तुमच्या इष्ट कामना तृप्त करणारा होवो. १०

यज्ञ म्हणजे अग्नींत देवतांना उद्देशून आहुती देणें. ईश्वरार्पण बुद्धीनें केलेलें कर्म, तेंहि यज्ञकर्मच. प्राणिमात्रांच्या ठिकाणीं ईश्वर वास करीत आहे, तेव्हां भूतहितार्थ कर्म तेंहि यज्ञकर्मच. स्वात्मलाभार्थ किंवा भोगेच्छेनें न केलेलें, परार्थ कर्म, तें यज्ञकर्म.

**देवान् भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।**
**परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ॥११॥**

**इष्टान् भोगान् हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः ।**
**तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः ॥१२॥**

**यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः ।**
**भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥१३॥**

या यज्ञानें तुम्हीं देवांना संतुष्ट करा, ते देव तुम्हांस समृद्ध करोत; या प्रमाणें, परस्परांस समृद्ध करून परमकल्याण प्राप्त करून घ्या. ११ यज्ञानें संतुष्ट झालेले देव तुम्हांस इष्ट भोग देतील; त्यांनींच दिलेलें त्यांना अर्पण न करतां जो सेवन करील, तो केवळ चोरच आहे. १२ यज्ञांतून अवशिष्ट राहिलेल्या पदार्थांचें सेवन करणारे साधुजन, सर्व पापापासून मुक्त होतात; पण जे अप्पलपोटेपणानें आपणांपुरतेंच शिजवितात, ते केवळ पापाचेंच सेवन करतात. १३

ज्या ईश्वरी शक्तींनीं हा संसार चालतो ते देव. ज्याप्रमाणें मनुष्याच्या इंद्रियांना आणि मनाला प्रेरणा आणि बल देणाऱ्या देवता मनुष्याचें जीवित सफल करतात, त्याच प्रमाणें हे देव हा संसार सफल करतात. हे देव त्या सर्वसाक्षी सर्वात्म्याचें ऐश्वर्य. परमेश्वराच्या अधिष्ठानाची सतत जाणीव ठेवून संसारांत वागावयाचें, आणि ज्या ईश्वरी कृपेनें आपणांस संसारांत सुख आणि भोग मिळतात, तिची आठवण ठेवून इतरांना सुखी करण्याचा प्रयत्न करावयाचा, आणि शक्त्यनुसार आर्तांचें दुःख कमी करावयाचें, हेंच मनुष्याचें कर्तव्य आहे. जसें आपणास दुसऱ्यापासून मिळतें, तसें दुसऱ्यांना परत द्यावयासहि पाहिजे. असा जो वागणार नाहीं, तो चोर आहे यांत शंका नाहीं. यज्ञशिष्ट म्हणजे यजन करून उरलेलें पदार्थ. यज्ञकर्म करून त्यांतून उरेल तें आपण घ्यावयाचें, हें महान् उदात्त तत्त्व येथें सांगितलें आहे. परार्थ कर्म करून उरलेले ( यज्ञशिष्ट ) भोग, अनासक्त बुद्धीनें, आणि अनहंकारानें योगक्षेमार्थ ग्रहण करणें, हें यज्ञविधान आत्मशुद्धीला आणि चित्ताच्या प्रसादाला उपकारक होईल.

**अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ।**
**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥१४॥**
**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।**
**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥१५॥**

**एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।**
**अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥१६॥**

भूतमात्राची उत्पत्ति अन्नापासून, अन्न पर्जन्यापासून, यज्ञानें पर्जन्य, आणि यज्ञ वेदविहित कर्मानें सिद्ध होतो. १४ यज्ञकर्म वेदविधीनें होतें, आणि वेद (ब्रह्म) अक्षरब्रह्मापासून उद्भूत आहेत; म्हणून, सर्वगत (अक्षर, कूटस्थ) नित्य ब्रह्माचें यज्ञकर्मांत अधिष्ठान आहे. १५ ह्या अशा प्रकारें ईश्वरप्रवर्तित यज्ञचक्राचें अनुवर्तन (अनुसरण) जो इंद्रिय-भोगपरायण पापात्मा करीत नाहीं, तो आपलें जीवित सर्वस्वी वृथा घालवितो. १६

यज्ञकर्मानेंच पर्जन्य होतो; "अग्नौ दत्ताऽऽहुतिः सम्यगादित्यमुपतिष्ठते । आदित्याज्जायते वृष्टिर्वृष्टेरन्नं ततः प्रजाः". सर्व जगताचें जीवन आदित्य आहे. आदित्यापासूनच प्राणिमात्राची उत्पत्ति आहे. आदित्याचें बाह्य दृश्यस्वरूप हें प्रकाशमान सूर्यमंडल, आणि या दृश्य स्वरूपापलीकडील परमतत्त्व सर्व जगदाधार ईश्वरी शक्ती आहे. प्राणीमात्राचीं कर्में त्या तत्त्वांतच जाऊन मिळतात, आणि तेथूनच प्राणिमात्रास कर्मप्रवृत्ति, आणि कर्म करण्याची शक्ति मिळते. हा कर्मांचा, आणि त्या ऐश्वरी परमतत्त्वाचा संबंध नीट समजून घेऊन वागावयास पाहिजे.

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।**
**आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥१७॥**
**नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।**
**न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥१८॥**
**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर**
**असक्तो ह्याचरन् कर्म परमाप्नोति पूरुषः ॥१९॥**

जो मनुष्य आत्मनिष्ठ असून आत्मानंदांत मग्न असेल, ज्याला संतोष-वृत्तींत राहण्यास बाह्य वस्तूंची आवश्यकता नाहीं, त्याला मात्र आवश्यक

असें कर्तव्य कांहींच नाहीं. १७ त्यानें कर्म केलें तरी, आणि न केलें तरी, सर्व सारखेंच; कारण त्याला आपल्या उद्दिष्टासाठीं कोणावरहि अवलंबून राहावयाचें नसतें. १८ म्हणून, तूं अनासक्तवृत्तीनें सतत आपलें कर्तव्य करीत रहा, कारण अनासक्तवृत्तीनें स्वकर्माचरण करणाराला परमपद प्राप्त होतें. १९

ज्याला कोणापासून कांहीं मिळविण्याची अपेक्षा नाहीं, जो आत्मसंतुष्ठ आत्माराम असून स्वानंदांतच मग्न असतो, त्याला आवश्यक कर्तव्य असें कांहींच नाहीं. त्यानें कांहीं केलें काय, न केलें काय, त्यापासून त्याचें किंवा दुसऱ्या कोणाचेंहि कांहीं बिघडत, किंवा सुधरत नाहीं. त्याच्यावर कोणी अवलंबून नसतें, तोही कोणावर अवलंबून नसतो. अशा ज्ञानी आत्मनिष्ठाची गोष्टच वेगळी. परंतु अर्जुनाची स्थिती तशी नव्हती. त्यानें सर्वसंगपरित्याग केलेला नव्हता. तो द्वंद्वातीत झालेला नव्हता. म्हणून स्वकर्म करणें त्याला तर आवश्यकच होतें. स्वभावनियत आत्मकर्तव्य अनासक्तवृत्तीनें करीत राहिल्यास सद्गति मिळेल, हेंच येथें सांगितलें आहे.

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।**
**लोकसंग्रहमेवापि संपश्यन् कर्तुमर्हसि ॥२०॥**
**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥२१॥**

कारण जनकादिकहि स्वकर्माचरणानेंच संसिद्धीच्या ( मोक्षाच्या ) मार्गाला लागले. तुला लोकांना योग्य मार्गदर्शन करण्यासाठीं तरी कर्म करणें आवश्यक आहे. २० लोकाग्रणी जसें वागतात, त्याप्रमाणेंच त्यांचे अनुयायीहि वागतात; ते जी कर्माचरणाची प्रणाली घालून देतात, तिलाच लोक अनुसरतात. २१

मागील श्लो. १९ मध्यें, अनासक्त वृत्तीनें कर्तव्य करीत रहा, म्हणजेच परमपद मिळण्याचा अधिकारी होशील असें सांगितलें. याला जनकादिकांचा दाखला दिला कीं, त्यांनाहि कर्माचरणानेंच मोक्षाचा मार्ग लाभला.

श्लो. २० च्या द्वितीयार्थांत पुनः व्यवहाराच्या दृष्टीनें विचार करावयास सुरुवात केली आहे. लोकसंग्रह म्हणजे उन्मार्गप्रवृत्तिनिवारण, किंवा समाजधारणा असें म्हणता येईल. अर्जुन "बहुमत" (मान्य) होता, म्हणून त्यानें इतरांना मार्गदर्शन करणें आवश्यक होतें.

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।**
**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥२२॥**
**यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रितः ।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥२३॥**
**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।**
**संङ्करस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥२४॥**

पार्था ! तिन्ही लोकांत मला कांहीं कर्तव्य उरलें आहे असें नाहीं. कांहीं न मिळालेलें मला मिळवावयाचेंहि नाहीं, (तथापि) मी स्वकर्तव्य करीतच आहें. २२ जर मी सतत, निरलसपणें कर्म करीत राहणार नाहीं, तर लोक सर्वस्वीं माझेंच अनुकरण करतील. २३ मीच जर कर्म केलें नाहीं, तर (अशा रीतीनें) लोकांचा (समाजाचा) उच्छेद होईल, आणि मींच (समाज व्यवस्थेंत) गोंधळ माजवून लोकांना पीडा दिल्यासारखें होईल. २४

समाजाग्रणींनीं लोकाना, स्वतः योग्य मार्गाचा अवलंब करून, मार्गदर्शन केलें पाहिजे. श्रीकृष्णासारख्या योगेश्वराला कांहीं या जगात करावयाचें उरलें नव्हतें, लोकांना योग्य मार्गदर्शन करणें एवढेंच करावयाचें होतें. समाजांत प्रत्येकानें आपापलें कर्तव्य करीत राहावें, हेंच समाजधुरिणांनीं सम्यगाचरणानें आणि स्वोदाहरणानें लोकांना शिकवावयाचें असतें.

**सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत ।**
**कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥२५॥**
**न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसङ्गिनाम् ।**
**जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान् युक्तः समाचरन् ॥२६॥**

अज्ञजन कर्मांविषयीं आसक्ति ठेवून ज्याप्रमाणें कर्माचरण करतात, तद्वतच पण अनासक्तवृत्तीनें, ज्ञानवान् पुरुषानें लोकांना मार्गदर्शन करण्यासाठी स्वकर्माचरण करावें. २५ ज्ञानी ( आत्मसंतुष्ट ) पुरुषानें, अज्ञ आणि कर्मासक्त लोकांचा बुद्धिभ्रंश करूं नये; स्वत: युक्तचित्तानें उत्तम कर्माचरण करून, ( अज्ञ ) जनांच्या कर्मप्रवृत्तींना योग्य वळण लावावें. २६

ज्ञान्याला कर्मे करून कांहीं विशिष्ट साध्य साधावयाचें नसतें, त्याची कर्मां-विषयीं पूर्ण विरक्तीच असते; पण ज्यांचा, वैराग्याच्या अभावीं, कर्मत्यागाचा अधिकार नसतो, असे अज्ञहि त्या ज्ञान्याच्या बहिरंगाचें अनुकरण करून कर्म-त्याग करतील, तर समाजांत गोंधळ माजेल, आणि समाजस्वास्थ्य बिघडेल. म्हणून, ज्या ज्ञानी लोकाग्रणींचें सर्वसामान्य जनता अनुकरण करीत असेल, त्यानीं लोकांना, त्याच्यांतच वागून, त्याच्या कर्मांना योग्य वळण लाविलें पाहिजे.

**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।**
**अहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते ॥२७॥**
**तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।**
**गुणागुणेषु वर्तन्ते इति मत्वा न सज्जते ॥२८॥**
**प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जन्ते गुणकर्मसु ।**
**तानकृत्स्नविदो मन्दान् कृत्स्नविन्न विचालयेत् ॥२९॥**

कर्में सर्वस्वीं प्रकृतिज गुणांनीच घडत असतात, ( पण ) अहंकारानें वेडावलेला जीव मीच कर्ता असें मानतो. २७ हे वीरा ! गुणभेदांचें, आणि कर्मभेदांचे तत्त्व जाणणारा ज्ञानी, करणात्मक गुणांचा विषयात्मक गुणांशीं संन्निकर्ष म्हणजेच कर्म, असें जाणून ( कर्मांत ) आसक्त होत नाहीं. २८ प्रकृतिज गुणांनीं भ्रांत झालेले अज्ञजन, या गुणांनीं घडणाऱ्या कर्मजालांत गुंततात, म्हणून अशा पूर्ण ज्ञान नसलेल्या मंदबुद्धी जनांच्या चित्तांत, पूर्ण ज्ञानी पुरुषानें उगाच गोंधळ उत्पन्न करूं नये. २९

कर्म केवळ प्रकृतिज गुणांच्या परस्पर व्यापारानें निष्पन्न होतें. आत्मा अकर्ता, आणि केवळ साक्षी आहे. परंतु अहंत्वममतायुक्त जीव आपणच कर्ता असें मानतो, आणि गुणांचें कर्तृत्व आपणाकडे ओढून घेतो. कर्तृत्व प्रकृतीचें, आणि पुरुष अकर्ता आहे, असें सांख्यमत आहे. विकार आणि गुण प्रकृतिज आहेत, आणि कर्तृत्व त्यांचेंच आहे, पुरुषाचें नाहीं. अद्वैत सिद्धांताप्रमाणें आत्मा शुद्ध, बुद्ध, अकर्ता, अनंत, अव्यय, आणि केवळ साक्षीरूप ज्ञान-घन आहे.

**मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।**
**निराशीर्निर्ममो भूत्वा युद्धयस्व विगतज्वरः ॥३०॥**

सर्व कर्मं मलाच अर्पण करून, विवेक बुद्धीनें, सर्व आशातृष्णांचा परित्याग करून, ममता सोडून, वैक्लव्यास मनांत थारा न देतां युद्ध कर. ३०

कर्ता करविता परमेश्वर, मी केवळ त्याची आज्ञा पाळणारा सेवक आहे, अशा बुद्धीनें सर्व कर्मांचा भार ईश्वरावर टाकून, आपणांस यांतून कांहीं मिळवावयाचें आहे अशी बुद्धी न ठेवितां, कर्म केल्यास, त्या कर्माचा दोष कधींहि लागणार नाहीं. अशा बुद्धीनें वागावयास अर्जुनास उपदेश केला आहे. मागील दहा श्लोकात कर्म करण्याची आवश्यकता स्पष्ट केली, आणि अनासक्त बुद्धीनें कर्म केल्यास दोष कसे लागत नाहींत हें सांगितलें. सामान्य जनांच्या बुद्धीला फाटे फोडून त्याना कर्मापासून निवृत्त करूं नये, हें निक्षून सांगितलें आहे. सर्वसाधारण मनुष्याची प्रवृत्ति कर्माकडे असते, त्या त्याच्या प्रवृत्तीला योग्य वळण लावावें, पण त्याला कर्मापासून निवृत्त होण्यास सांगूं नये. तें निसर्गाच्या विरुद्ध होईल. तसें केल्यास समाजांत ढोंग माजेल, आणि समाजधारणेंत व्यत्यय येईल. लोकांत आळस आणि अनाचार माजेल, आणि खऱ्या विवेकवैराग्याचा विपर्यास होईल.

**ये मे मतमिदं नित्यं अनुतिष्ठन्ति मानवाः ।**
**श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः ॥३१॥**
**ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम् ।**
**सर्वज्ञानविमूढांस्तान् विद्धि नष्टानचेतसः ॥३२॥**

जे पुरुष माझ्या या उपदेशास अनुसरून श्रद्धेनें, त्यांत वृथा दोष काढीत न बसतां, नित्य वर्तन करतील, ते देखील कर्मबंधापासून मुक्त होतील. ३१ परंतु जे कोणी, यांत वृथा दोष दाखवून माझ्या सांगण्या-प्रमाणें वागणार नाहींत, त्या अविवेकी आणि सर्वज्ञतेनें फुंजलेल्यांचा नाशच होईल, हें पक्कें समज. ३२

अध्याय २ श्लो. ७१ मध्यें, स्थितप्रज्ञांना परमशांती प्राप्त होते म्हणून म्हटलें, मग कर्म करणारास शांति लाभेल किंवा नाहीं? या प्रश्नास उत्तर, त्यांनाहि शांति लाभेल, असें येथें सांगितलें आहे. या अध्यायाच्या प्रारंभीं अर्जुनाचा हाच प्रश्न होता. कर्मयोगानेंहि, सर्व कर्मांचा संन्यास परमात्म्याच्या ठिकाणीं केल्यास, योगसंसिद्धि प्राप्त होते. कर्मांचा परित्याग करावयास नको.

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।**
**प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥३३॥**
**इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।**
**तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ ॥३४॥**

ज्ञानी पुरुषहि आपल्या प्रकृतीस अनुसरून वागणारच. भूतमात्राची प्रवृत्ति आपल्या प्रकृतीला अनुसरून वागण्याची असते, तेथें निग्रहाचें काय चालणार? ३३ इंद्रियांचे राग ( विषयांसंबंधीं मनाची ओढ ) आणि द्वेष ( त्यांचा तिटकारा ) इंद्रियार्थां ( विषयां ) पुरतेच केवळ आहेत, त्यांच्या आहारीं जाऊं नये; ते भलत्या मार्गाला लावणारे आहेत. ३४

प्राणिमात्राची प्रवृत्ती भोगाकडे आहे, ‘ प्रवृत्तिरेषा भूतानां निवृत्तिस्तु महाफला. ” हा भूतांचा स्वभावधर्म आहे. परंतु केवळ प्राप्त भोग ग्रहण करणें वेगळें, आणि भोगासंबंधीं लालसा असणें वेगळें. लालसेनें हीच शुद्ध साधी प्रवृत्ति अत्याचारी बनते. कामक्रोध, रागद्वेष, लोभमोह हे सर्व भोग-लालसेनें उद्भवतात, म्हणून लालसा नसावी नैसर्गिक प्रवृत्ति असणारच. ज्याप्रमाणें अत्यंत वेगवान जलप्रवाहाच्या उलट दिशेनें पोहत जाणें कठीण, तसें प्रकृतीच्या ओढीच्या विरुद्ध जाणेंहि कठीण. परंतु नावेंत बसून, ती नाव

दोरांनीं ओढून नेली तर प्रवाहाच्या उलट दिशेनेंहि जाणें शक्य होईल, तद्वतच, ईश्वरकृपा झाली ( अंतरात्म्याची प्रेरणा झाली ) आणि सत्संग मिळाला, तर या नैसर्गिक प्रवृत्तीला आंवरूनहि, विवेकवैराग्यानें, या प्रकृतीच्या बंधनांतून सुटणें शक्य होईल.

**श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात् स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥३५॥**

( आपल्या स्वभावास आणि अधिकारास अनुरूप असा ) स्वधर्म ( आपणांस, कदाचित् ) गौण वाटला तरी, अगदीं सांगोपांग आचरलेल्याहि ( पण आपल्या स्वभावास आणि अधिकारास अननुरूप अशा ) परधर्मापेक्षां अधिक कल्याणप्रद आहे. स्वधर्माचरणांत मरण आलें तरी 'पत्करेल, परधर्माचरणानें अनर्थपरंपराच ओढवेल. ३५

संन्यास मार्गाच्या मोठेपणास भुलून सांसारिकानें जर स्वकर्माचरण सोडून दिलें, तर त्यांत त्याचें कल्याण नाहीं. " सहजं कर्म सदोषमपि न त्यजेत्. " म्हणूनच " न बुद्धिभेदं जनयेदज्ञाना कर्मसङ्गिनाम् " असें सांगितलें आहे. खऱ्या ज्ञान्यांनीं अज्ञानांना कर्मापासून परावृत्त करूं नये. ज्याचा अधिकार संन्यासाचा नाहीं, त्याला त्या मार्गांत लोटण्यानें त्याचा नाशच होईल, कल्याण होणार नाहीं. अर्जुन स्वभावानें खरा क्षत्रिय वीर होता. तो विजिगीषू होता. त्यानें संन्यासमार्गाचा अवलंब करणें योग्य नव्हतें. खऱ्या वैराग्याशिवाय संन्यासवृत्ति शक्य नाहीं, आणि तसें खरें वैराग्य अर्जुनास प्राप्त झालेलें नव्हतें.

अर्जुन उवाच— **अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ।**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥३६॥**

अर्जुन म्ह०—हे वार्ष्णेया ! कर्त्याची इच्छा नसतांहि, तो कोणाच्या प्रेरणेनें, बलात्कारानें ओढून नेल्यासारखा, पापमार्गाला जातो ? ३६

वर श्लोक ३४ मध्यें " रागद्वेषौ ह्यस्य परिपन्थिनौ " असें म्हटलें आहे, त्यासंबंधीं विशेष विवरण करण्यासाठीं आतां उपक्रम केला आहे. कमाचें

महत्त्व. आणि त्याचें अपरिहार्यत्व सांगितलें. खोट्या संन्यासभावनेपासून उद्भवणारे दोषहि स्पष्ट केले. आतां कर्माचरणांत कोणतें पथ्य पाळावयाचें तें सांगतात.

श्रीभगवान उवाच— **काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥३७॥**

श्रीभगवान म्ह०—( मनुष्यास विमार्गांत ओढून नेणारा ) काम, हाच (लालसा विफल झाल्यास) क्रोधरूप होतो; रजोगुणापासून उद्भवणारा हा काम महाभक्षक ( प्राण्यांना ग्रासून नष्ट करणारा ), आणि महापापी आहे, आणि ( सांसारिकांचा ) महान् वैरी आहे, हें पक्कें समज. ३७

नैसर्गिक प्रवृत्ति म्हणजे काम. प्राणिमात्राला काम आहेच. काम हेंच जीवनाचें मूलतत्त्व आहे. " धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि " असें पुढें सांगितलें आहे. तो काम जोंपावेतों आपल्या मर्यादेंत आहे, म्हणजे शुद्ध निसर्गज आहे, तोंपावेतों भयावह नाहीं; पण त्याचें रूपांतर लालसेंत ( लोभांत ) झालें, म्हणजे मग अध्याय २ श्लो. ६२–६३ मध्यें सांगितल्याप्रमाणें तो नाशाला कारण होतो.

**धूमेनाव्रियते वन्हिर्यथाऽऽदर्शो मलेन च ।**
**यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तनेदमावृतम् ॥३८॥**
**आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।**
**कामरूपेण कौंतेय दुष्पूरेणानलेन च ॥३९॥**
**इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याऽधिष्ठानमुच्यते ।**
**एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥४०॥**
**तस्मात्त्वमींद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।**
**पाप्मानं प्रजाहिह्येनं ज्ञानाविज्ञाननाशनम् ॥४१॥**

धूमानें जसा अग्नि, मळानें जसा आरसा, उल्बणानें जसा गर्भ, तसा यानें ( कामानें ) संसार ( कर्मप्रवृत्ति ) व्यापून टाकला आहे. ३८ कौंतेया !

कधींहि शमन न पावणाऱ्या अग्नीसारख्या, या कामरूपी ज्ञान्यांच्या हाड-वैऱ्यानें, त्यांचें ज्ञान पूर्णपणें गुरफटून टाकलें आहे. ३९ इंद्रियें, मन, आणि बुद्धि यांत ठाण मांडून, या तीहींच्या द्वारें, हा (काम) देहधारी जीवांच्या ज्ञानास झांकून टाकून, त्यांना मोह पाडतो. ४० म्हणून, हे भरतोत्तमा ! प्रथम इंद्रियांचें संयमन करून, या ज्ञानाचा आणि विज्ञानाचा नाश करणाऱ्या पाप्याला घालवून दे. ४१

ज्ञानानें काम वाढतच जातो. वास्तविक असें ज्ञान यथार्थज्ञान नव्हे. व्युत्पन्नता जसजशी वाढते, तसतशी मनुष्याची हांवहि वाढते. भोळ्याभाबड्या अशिक्षितांच्या इच्छा आकांक्षाहि बेताच्याच असतात. ज्ञानाचें क्षेत्र वाढलें, म्हणजे अभिलाषाहि वाढत जाते. या लोभानें एकदां मनाची आणि बुद्धीची पक्कड घेतली, म्हणजे तो दिवसेंदिवस आपलें स्थान दृढच करीत जातो. म्हणून प्रथम इंद्रियें, मग मन, त्यानंतर बुद्धि, अशीं उत्तरोत्तर निगृहीत करूनच, याला घालविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. दीर्घ अभ्यासानें आणि प्रयत्नानेंच हें शक्य होईल.

**इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।**
**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुध्देः परतस्तु सः ॥४२॥**
**एवं बुध्देः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।**
**जहि शत्रुं महाबाहो कामरूपम् दुरासदम् ॥४३॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः**

इंद्रियांच्या प्रवृत्तीच (प्रथम) अनाकलनीय. इंद्रियांच्याहि पलीकडचें मन, मनाच्या पलीकडे बुद्धि, आणि तो (आत्मा) तर बुद्धीच्याहि पलीकडचा आहे. ४२ अशा श्रेणीनेंच बुद्धीच्या पलीकडे असलेल्या आत्मतत्त्वाचें ज्ञान करून घेऊन, आत्मसंयमानें चित्त स्थिर करून, या कामरूपी दुर्दम्य शत्रूस, हे वीरा ! नाहींसा करून टाक. ४३

काठकोपनिषत् प्रथमाध्याय तृतीयवल्ली मंत्र १०–११ मध्यें इंद्रियांपासून पुरुषापर्यंतची श्रेणी दिली आहे. इंद्रियें -अर्थ-मन-बुद्धि-महत्-अव्यक्त-पुरुष अशा श्रेणीनें परमपद मिळवावयाचें असें सांगितले आहे. येथें इंद्रियें आकलनास कठीण, त्यांपेक्षां मन कठीण, त्यापेक्षां बुद्धि कठीण, असें सांगून बुद्धीच्या आकलनानंतरच आत्मतत्त्वाचें ज्ञान होऊ शकतें, असें सांगितलें आहे. प्रथम इंद्रियें, त्यानंतर मन, मग बुद्धि, असें संयमन साध्य झाल्यावर, नंतर त्या आत्मतत्वाला पोहचतां येईल बुद्धीच्याहि पलीकडे तें आत्मतत्त्व असल्यामुळें, बुद्धीनेंच केवळ त्याचें आकलन होणार नाहीं. त्या तत्वाचें यथार्थ ज्ञान झाल्यावरच, आणि आत्मसंयमन साध्य झाल्यावरच कामवासना जिंकतां येतील.

लोकव्यवहार, आपला योगक्षेम, लोकसंग्रह, समाजधारणा, आपणास इतरांकडून मिळालेल्या उपकृतींचे उतराई होण्याची आवश्यकता आणि इच्छा, आर्तांचें दुःख निवारण, आणि सर्वांत महत्त्वाचें असें स्वतःच्या चित्ताचें समाधान, यांसाठीं मनुष्याची कर्में करण्याविषयीं प्रवृत्ति होते. परंतु संसारापासून विन्मुख झालेल्या आत्मज्ञान्यास यापैकीं कोणतीहि गोष्ट कर्मप्रवृत्त करूं शकत नाहीं. तो कोणाकडून उपकृतीची अपेक्षाच करीत नाहीं. अशी ही आत्यंतिक निरपेक्षता दीर्घ तपश्चर्येनें, आणि अनेक जन्मांच्या संसिद्धीनंतरच प्राप्त होऊं शकते. पण असे पुरुष विरळा. त्यांनीं विहित कर्म न केलें तर काय बिघडेल ? त्यांच्या वाटेस कोणींच जाणार नाहीं पण सर्व साधारण मनुष्य, जो समाजावर आपल्या योगक्षेमासाठींहि अवलंबून आहे, त्यानें मात्र कर्म केलेंच पाहिजे. त्यानें आपलें शास्त्रविहित आणि स्वभावज कर्म न करणें, किंवा संन्यासाचें पांघरूण घेणें, हा समाजाचा आणि ईश्वराचा अपराधच करणें होय. त्याला जर समाजाच्या साहाय्याची अपेक्षा आहे, तर त्यानें आपलें कर्तव्य आपणास शक्य होईल तसें, निरभिमानवृत्तीनें, आणि निरपेक्षतेनें केलेंच पाहिजे. हेंच ईश्वराच्या चक्रप्रवर्तनाचें अनुवर्तन या अध्यायांत सांगितलें आहे.

दुसऱ्या अध्यायाच्या शेवटीं स्थितप्रज्ञाचें वर्णन आहे. त्यांत अकर्मांची, किंवा कर्म परित्यागांची, स्तुति नाहीं. ज्ञानावस्थित, कामक्रोधादि विकारांच्या पलीकडे गेलेल्या, विषयांपासून पूर्णतया विन्मुख झालेल्या ज्ञानयोग्याची स्तुती

आहे. "दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय" यांत कर्माची निंदा नाहीं, बुद्धि-योगाची स्तुती आहे. बुद्धीला महत्त्व आहे, केवळ कर्माला महत्त्व नाहीं. त्यावरून असा निष्कर्ष काढतां येणार नाहीं कीं, संसारांत कर्तव्यकर्माचरण गौण आहे. सर्वसाधारण मनुष्यास प्राप्तकर्माचरणाव्यतिरिक्त मार्गच नाहीं. त्यांतच अनासक्तीची बुद्धि ठेविल्यास हानिलाभापासून होणारे चित्तक्षोभ टळतील. समचित्तता, आणि सर्व कर्मे परमात्म्यास समर्पण करणें, हाच चित्त-शांतीचा, सुखाचा, आणि अंती सद्गतीचा मार्ग आहे.

येथें कर्माचरणाचें अपरिहार्यत्व सांगितलें आहे. संन्यासाची निंदा नाहीं, पण ढोंगीपणाची निंदा आहे. धन्य आणि अविचारणीयचरित अश्या जीवन्मुक्तां-संबंधी चर्चा करणेंच योग्य नाहीं. सामान्य जनास योग्य मार्ग दाखविण्या-साठीं श्रीगीतेचा अवतार आहे. संन्यास ( ज्ञानमार्ग ), भक्तिमार्ग किंवा केवळ कर्मयोगच श्रीगीतेंत प्रतिपादित आहे असें नाहीं. सर्व मार्ग एकाच ठिकाणीं जातात हें सत्य आहे.

---

# अध्याय चौथा

## ज्ञानकर्मसंन्यासयोग

श्रीभगवानुवाच–इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।
विवस्वान् मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥१॥
एवं परंपराप्राप्तं इमं राजर्षयो विदुः ।
स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥२॥
स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।
भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥३॥

श्रीभगवान् म्ह०–हाच शाश्वत योग मी पूर्वी विवस्वानाला सांगितला, विवस्वानानें मनूला, आणि मनूनें इक्ष्वाकूला सांगितला. १ असा हा परंपरेनें प्राप्त झालेला योग राजर्षींना विदित होता. परंतु हे वीरा ! तो चिरकालच्या ओघांत मागे पडला. २ आतां तूं माझा भक्त आणि जिवलग मित्र, म्हणून मी तुला तोच पुरातन योग आज सांगत आहे, कारण हें माझें अत्यंत महत्त्वाचें गूढतत्त्व आहे. ३

मागील दोन अध्यायांत ज्ञाननिष्ठालक्षण ससंन्यासकर्मयोग सांगितला. सर्व वेदांताचें सार, प्रवृत्तिनिवृत्तिलक्षण असा हा योग, हीच श्रीगीतेची शिकवण आहे. अर्जुन स्वभावगुणांनीं, आणि विशिष्ट परिस्थितीनेंहि या योगाचाच अधिकारी होता. येथें हा योग राजर्षींना विदित होता म्हटलें आहे, आणि अर्जुनहि परिपूर्ण क्षत्रियवृत्तीचा असल्यामुळें, त्याला या योगाचा उपदेश अधिकच आवश्यक होता. मागील अध्यायांतहि जनकाचा निर्देश या ससंन्यासकर्मयोगासंबंधीं केला आहे. कर्मयोग, ज्ञान, कर्मसंन्यास, अनन्य भक्ति, आणि त्यानंतर कैवल्यप्राप्ती, असा क्रम पुढें दिला आहे.

**अर्जुन उवाच—अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।**
**कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥४॥**

अर्जुन म्ह०—विवस्वान् तुझ्या कितीतरी पूर्वीं जन्मला, तूं तर त्याच्या नंतर जन्मलास; मग तूं विवस्वानास पूर्वीं सांगितलेंस हें कसें मानूं ? ४

येथें गीतोपदेश सांगणारे भगवान् केवळ वृष्णी वासुदेव नाहींत, परमज्ञानी योगेश्वर हें गीतातत्त्वज्ञान अखिल मानवांना सांगत आहेत, असें स्पष्ट करण्यासाठीं येथें हा प्रश्न घातला आहे. पूर्वजन्म–पुनर्जन्माचा सिद्धांतहि हलकेंच येथें प्रविष्ट केला आहे.

**श्रीभगवान उवाच—बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥५॥**

श्रीभगवान् म्ह०—अर्जुना ! तुझे आणि माझे आतां पावेतों अनेक जन्म गेले. त्या सर्वांचें ज्ञान मला आहे. हे वीरा ! तुला ते माहीत नाहींत. ५

जीवाला मरण नाहीं. देहत्यागालाच मरण म्हणावयाचें, पण तें मरण देहाचें. ज्ञानी पुरुषाला जन्ममरणाचें तत्त्व कळतें. हा पूनर्जन्माचा सिद्धांत दृष्टाच्या पलीकडचा आहे, परंतु तर्कातीत नाहीं. जें आज आहे, तें कोणत्या तरी स्वरूपांत पूर्वींहि असलेंच पाहिजे, आणि भविष्य काळांतहि कोणत्या तरी स्वरूपांत असणारच, हा शास्त्रांचा सिद्धांत आहे जड आणि अजड सृष्टींत भेद केवळ सापेक्ष आहे, असें आतां आधुनिक शास्त्रेंहि मानतात, आणि असेंहि मानतात कीं, जड ( पदार्थ ) आणि चैतन्य ( शक्ति ) दोन्ही परिवर्तन पावतात, पण नितांत नष्ट होत नाहींत. जीवाचें अस्तित्व स्वानुभवसिद्ध आहे. तो चैतन्यरूप, पण विकाराधिष्ठित आहे. त्याचें रूपांतर होतें, पण नाश कधींच होत नाहीं. तोच देह धारण करतो, त्यांत वागतो, आणि तो देह त्याला निरुपयोगी झाला म्हणजे, त्याला सोडून तो दुसऱ्या देहांत प्रवेश करतो. त्याची देहांत असण्याची खूण प्राणन. तो हत्तींत हत्ती एवढा, आणि मुंगींत मुंगी एवढा आहे. देहाचें प्राणन थांबलें, तरी देही ( जीवात्मा ) नष्ट होत

नाहीं. तो आपल्या व्यापारास सोईचें दुसरें वाहन पाहतो. तो वशी नाहीं, तो प्रकृतीच्या गुणांच्या आणि विकारांच्या आधीन असतो, आणि त्या गुणांचा आणि विकारांचा वारा जिकडे नेईल तिकडे तो जातो. त्याच्यांत असणारें चैतन्य तत्त्व मात्र स्थलकालाबाधित आहे. तो जेथें जाईल तेथें तें आहेच. तो वस्तुतः तेंच अनंत, अव्यय, अविनाशी, विभु तत्त्व आहे. आकाशतत्त्वाप्रमाणें तें तत्त्व निश्चल, नित्य, विकारातीत, सर्वव्यापी आहे. मनुष्यदेहांतून जीव त्याला सोडून जातो, तेव्हां तो मन, बुद्धि, अहंकार आणि चित्त घेऊन जातो. चैतन्य तर सर्व वस्तुजातांत विद्यमान आहेच. ह्याप्रमाणें जीव पुनः पुनः आपल्या व्यापार क्षेत्रांत, इष्ट स्वरूपांत, अवतरतो. हा व्यष्टिरूप, परतंत्र जीव, विकारांच्या आणि गुणांच्या हेलकाव्यावर, संसारमहार्णवांत प्रकृतीच्या लाटांवर, इतस्ततः झोकांड्या खात राहतो. समष्टीरूप ईश्वर परतंत्र नाहीं. तो प्रकृतीचा स्वामी आहे. तो सर्वतंत्र स्वतंत्र आहे. त्यानें मनुष्यरूप धारण केलें, म्हणजे त्यालाहि संसाराचे हेलकावे खावे लागतातच, परंतु तो वशी आहे. विशिष्ट हेतूनें तो जगतांत अवतरतो, आणि इतर मानवांप्रमाणें वागून, तो आपलें अवतारकार्य पूर्ण करून, पुनश्च आत्मस्वरूपांत प्रविष्ट होतो.

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥६॥**

मला वास्तविक जन्म नाहीं, माझा आत्मभाव पण शाश्वत आहे, आणि मी भूतमात्राचा शास्ता आहे; तथापि मी माझ्या आत्मप्रकृतींतच अधिष्ठित होऊन, माझ्या अघटितघटनाशक्तीनें देहधारी होऊन अवतरतो. ६

जो नित्य, अव्ययात्मा आहे त्याला जन्म कसा असेल ? तो नेहमीं आहेच, आणि अव्ययात्मा असल्यानें, नाहीं असा तो कधींच होत नाहीं. असें हें ईश्वराचें स्वरूप आहे. तो सर्व भूतमात्राचा प्रभवाप्यय आहे. त्याला जन्म तर नाहींच, मग तो अवतार रूपानें कसा प्रादुर्भूत होतो ? तो आहेच, आणि विश्व व्यापून आहेच, पण जेथें त्याच्या विशिष्ट प्रादुर्भावाची आवश्यकता असेल, तेथें तो तसा प्रकट होतो. कसा प्रकट होतो ? हें गूढ मनुष्याच्या बुद्धीस अनाकलनीय आहे. ही ईश्वरी माया अचिंत्यघटनारूप आहे. ह्या संसाराचें सातत्य

आणि क्षेम राहिले पाहिजे, ही इश्वरीच्छा आहे. त्यांत बाधा होऊं लागल्यास, तोच ईश्वर कोणत्या तरी प्रकारानें बिघडलेली परिस्थिती पुनः सुघटित करून, समाजांत स्वास्थ्य प्रस्थापित करतो.

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥७॥**
**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥८॥**

हे भारता ! जेव्हां जेव्हां धर्माची अवनति होऊन अधर्माचा प्रभाव (संसारांत) वाढूं लागतो, तेव्हां तेव्हां मी देहधारी होऊन प्रकट होतो. ७ सन्मार्गानें वागणाऱ्यांच्या रक्षणासाठीं, आणि समाजकंटकांचा उच्छेद करण्यासाठीं, तसेंच अवनतीस गेलेल्या धर्माच्या पुनःस्थापनेसाठीं मी प्रत्येक युगांत वारंवार संसारांत अवतरतो. ८

ईश्वर सर्व ठिकाणीं, आणि प्राणिमात्रांचे अंतर्यामी आहेच. संसारांतील सातत्य आणि साधुभाव बिघडत आहे असें जेथें असेल, तेथें शुद्ध स्थल आणि पात्र पाहून ईश्वर विशिष्ट प्रकारें आविर्भूत होतो. चांगलें टिकलें पाहिजे, आणि वाईट नष्ट झालें पाहिजे, कारण याशिवाय सातत्य सिद्ध होणार नाहीं, म्हणून ती ऐश्वरी शक्ति आवश्यक आणि योग्य ती परिस्थिती उत्पन्न करून घेऊन प्रकट होते. हा ईश्वराच्या निसर्गाचा नियमच आहे. ज्यायोगें संसाराचें सातत्य आणि साधुभाव साधतो तो धर्म, “ धारणात् धर्मः ”, आणि विघटना ज्यानें होईल तो अधर्म.

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥९॥**

अशा प्रकारें माझें संसारांत अवतरण, आणि माझें दिव्य अवतारकार्य ज्या ज्ञान्याला यथावत् कळलें, तो देहत्यागानंतर पुनः जन्माला येतच नाहीं, तो माझ्यांतच मिळून जातो. ९

ईश्वराचे जन्म आणि कर्म जाणणें, म्हणजे केवळ मनानें किंवा बुद्धीनें जाणणें नव्हे. जाणणे म्हणजे तद्रूप होणें. तसें जाणल्यावरच ज्ञानी मुक्त होतो. मग तोहि ईश्वरस्वरूपच होऊन "परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्" असेंच कर्म करूं लागतो. त्यांत आणि ईश्वरांत भेदच उरत नाहीं. तो आपले व्यक्तिमत्त्व आणि वेगळें अस्तित्वच विसरून जातो, म्हणजेच तो मुक्त होतो.

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥१०॥**

ज्यांची संसारांतील विषयांसंबंधीं ( किंवा घटनासंबंधीं ) आसक्ति पूर्ण नाहींशी झाली आहे, भय आणि क्रोध हेहि ज्यांचे पूर्णतेनें नाहींसे झाले आहेत, ज्यांना जीवितांत सर्व कांहीं मीच एक आहे, आणि ज्यांना केवळ मीच आश्रयस्थान आहे, असे अनेक ज्ञानी ज्ञानतपानें ( सम्यक् ज्ञानाच्या चिंतनाने ) शुद्ध ( निर्मोह ) झालेले, माझ्यांत येऊन मिळालें आहेत ( मत्स्वरूप झाले आहेत ). १०

राग म्हणजे आसक्ति ही विषयांसंबंधीं असते, पण ज्यांना ईश्वराशिवाय दुसरें कांहींच नाहीं, त्यांना राग कोठचा, आणि क्रोध तरी कशाविषयीं असणार? " परस्माद्वै भयं भवति, " ज्यांना पर असें नाहींच, त्यांना भय तरी कसलें? " वासुदेवः सर्वम् " असेंच ज्याना झाले, ते ईश्वरस्वरूपच झाले.

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥११॥**

जीव मला ज्या भावनेनें आपणा स्वतःस समर्पण करतात, तसाच मी त्यांना होतों. मानव सर्वस्वीं मीच ( सर्वांतर्यामी ईश्वरानें ) घालून दिलेल्या मार्गानें जातात. ११

सर्वांतर्यामी, सर्वसाक्षी, सर्वात्मा, सर्वेश्वर जीवाला त्याच्या कामनेप्रमाणेंच फल देतो. त्या अंतरात्म्याला जो जसा मानील तसाच तो होतो. " उपद्रष्टानुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन् पुरुषः परः," तोच जीवाला त्याच्या भावनेप्रमाणें मार्ग दाखवितो. समदर्शी योग्याला तो "समः

सर्वेषु भूतेषु" होतो, आणि तो योगी मुक्त होतो. विषयलोलुप संसारी जीवाला तो त्याच्या इच्छा तृप्त करणारा दिसतो, आणि तो जीव आपल्या इच्छाजालांतच गुरफुटून राहतो. त्याच्याच कृपेनें धनार्थीला धन मिळतें, आणि ज्ञानार्थीला ज्ञानहि पण प्राप्त होतें. त्यांना धनाचा आणि ज्ञानाचा मार्गहि दाखविणारा तोच आहे.

**कांक्षन्तः कर्मणां सिध्दिं यजन्त इह देवताः ।**
**क्षिप्रं हि मानुषे लोके सिध्दिर्भवति कर्मजा ॥१२॥**

या संसारांत कर्माच्या फलसिद्धीच्या आकांक्षेनें मानव देवतांची आराधना करतात, कारण मनुष्यलोकांत कर्माची सिद्धि त्वरित होते ( अशीच त्यांची श्रद्धा असते ). १२

जसा भाव तसा देव. वित्तार्थी वित्त देणाऱ्या देवतेचाच भक्त असतो, बलार्थी बलभीमाचीच उपासना करतो. किंबहुना, प्रत्येक जण आपल्या कामनेप्रमाणें आपला देव उभा करतो. खरा देव त्याच्या हृदयांतच असतो. मनापासून अत्यंत उत्कटतेनें, आणि सर्वात्मभावानें केलेली कामना, तदनुरूप प्रयत्न करावयासहि प्रेरित करते. आणि जशी भावनेची उत्कटता तसाच प्रयत्नहि केला जाऊन, इच्छित फलहि बहुधा प्राप्त होतें. क्वचित्, पूर्णपणें फलसिद्धि कर्त्याच्याच आधीन नसल्यामुळें त्यांत विघ्नेंहि येतात, पण सर्वसाधारणपणें प्रयत्नानुरूप फलसिद्धि होते. हृदयांत पूजलेली देवता प्रत्येक इंद्रियाच्या ठिकाणीं प्रकट होते, आणि बुद्धि, मन, इंद्रियें या सर्वांच्या प्रयत्नानें कार्यसिद्धि होते. एका जिवाची कार्यसिद्धि जर दुसऱ्या जीवाच्या कार्यसिद्धीच्या आड येत असेल, तर त्यांपैकीं प्रबल असेल तिचा विजय होतो. तसेंच संसारांत अनेक जीवांशीं, अनेक जड अजड भावांशीं, संबंध येतो, त्यांचाहि परिणाम कार्यसिद्धीवर झाल्याशिवाय राहत नाहीं पण मनुष्य कार्यसिद्धीचा विचार करतांना एवढी मोठी दृष्टि ठेवीत नाहीं, आणि क्वचित् इच्छित कार्यसिद्धि होत नाहीं तेव्हां निराश होऊन बसतो. पण तो जो प्रयत्न करतो, तो आपल्या कामनेप्रमाणें, हृदयांत पूजलेल्या देवतेनें दाखविलेल्या मार्गानेंच करीत असतो. "सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता परो ददातीति कुबुद्धिरेषा," ज्याला त्याला आपल्या भावनेच्या उत्कटते-

प्रमाणें बहुधा फल मिळतें. सद्भावना ठेऊन, परमेश्वराच्या खऱ्या स्वरूपाचें ज्ञान करून घेऊन, " समः सर्वेषु भूतेषु " अशा परमात्म्यास शरण जाणाराला चित्तास शांति आणि अंतीं सद्गति प्राप्त होते. आपल्या हृदयांतील देवता, म्हणजे ज्यांत आपलें जीवितसाफल्य आहे असें आपण मानतो तें परमसाध्य ध्येय. तदनुरूप कर्म घडल्यावर, प्रयत्नाप्रमाणें इष्टसिद्धीहि होते.

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।**
**तस्य कर्तारमपि मां विध्द्यकर्तारमव्ययम् ।।१३।।**

गुण आणि कर्म यांच्या वांटणीवर आधारलेली चतुर्वर्णव्यवस्था मीच उत्पन्न केली आहे, पण मी जरी या वर्णव्यवस्थेचा कर्ता असलों तरी, मी अकर्ता आणि शाश्वत स्वरूपच आहे, हें नीट समजून घे. १३

ईश्वराचें शाश्वत स्वरूप अकर्ता असेंच आहे. जरी त्यानें हें सर्व केलें आहे, तरी त्यानें, शाश्वत परमात्म्यानें, कांहींच केलेलें नाहीं. प्रत्येक जीवास आपापल्या वासनेप्रमाणें, स्वभावजगुणाप्रमाणें आणि तदनुरूप कर्मांप्रमाणेंच फलप्राप्ति होते. ईश्वर अकर्ता आहे. चातुर्वर्ण्य गुणकर्मविभागशः झालें आहे. समाजाच्या आवश्यकतेप्रमाणें, पूर्वींच्या समाजशासकांनीं तें केलें, पण त्यासंबंधीं प्रेरणा मानवांच्या ( समाजांतील घटकांच्या ) गुणकर्मांनेंच मिळाली, असें हें ईश्वरनिर्मितच आहे. ज्याप्रमाणें वेद हे ईश्वराचें निश्वसन, त्याचप्रमाणे वर्ण व्यवस्थेसारख्या समाजस्वास्थ्यास अवश्य अशा व्यवस्थाहि ईश्वरनिर्मितच आहेत. मानवांच्या स्वभावगुणानुकूलच या व्यवस्था आहेत. यांनीं समाजाचें सातत्य आणि स्वास्थ्य साधावें हाच हेतु आहे.

**न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा ।**
**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ।।१४।।**

मला ( सर्वांतर्यामी सर्वसाक्षीला ) कर्मांचें बंधनहि नाहीं, आणि कर्मफलाची आकांक्षाहि नाहीं; असें माझें ( अंतरात्म्याचें ) खरें स्वरूप ज्यानें जाणलें, त्याला कर्मबंध होत नाहीं. १४

वर्णव्यवस्थेप्रमाणें वर्णधर्म पाळावयास पाहिजेत, आणि हे समाजधारणेस आवश्यक आहेत हें खरें, पण हें बंधन अंतरात्म्यास नाहीं. तो शुद्ध निर्मुक्तच

आहे. कर्में शरीरास आवश्यक आहेत. खऱ्या निर्मुक्तास बाह्य कर्में केलीं तरी, आणि न केलीं तरी सारखेंच. त्याला कर्मफलाची आकांक्षा नाहीं, म्हणून कर्माचें बंधनहि नाहीं.

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।**
**कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥१५॥**

असें पूर्णपणें समजूनच पूर्वकालच्या मुमुक्षूंनीं (मदर्थ) कर्में केलीं. त्यांनीं आपलीं प्राप्तकर्में केलीं, तुला प्राप्त झालेले कर्म तूं कर. १५

कर्म फलासंबंधीं लालसा नसेल तर कर्म बंधनकारक होत नाहीं. असें जाणूनच मुमुक्षूंनीं प्राप्त कर्में आचरलीं. कर्म करूनहि ते मुक्त झाले. कर्मसंन्यासाची आवश्यकता आहेच असें नाहीं. निरपेक्ष बुद्धीनें कोणतेंहि कर्म केल्यास त्यापासून होणारें पुण्यपाप आपणांस नाहीं. आर्त मनुष्य समोर आला, आणि आपण त्याची आर्ति पाहून त्यास शक्य तें साहाय्य केलें, तेथें आपलें कर्तव्य संपलें. आपल्या पुढें जें कर्तव्य आलें, तें अंतःकरणास समाधान व्हावें या भावनेनें केलें, तर चित्तास शांति मिळेल. " यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं शंभो तवाराधनम् " अशा बुद्धीनें कर्म केल्यास, आणि कर्तृत्वाचा अभिनिवेश चित्तांत नसल्यास, त्या कर्माचें फल कांहींहि झालें, तरी त्यापासून हर्ष किंवा विषाद वाटणार नाहीं, म्हणजेच त्या कर्माचें बंधन होणार नाहीं. ईश्वरावताराचें दिव्य तत्त्व, त्यासंबंधीं ज्ञानी पुरुषाचें कर्तव्य, सामान्य जीवाचें कर्तव्य, चातुर्वर्ण्य, कर्माकडे पाहण्याची योग्य दृष्टि, यांसंबंधीं विचार करून आतां कर्म, अकर्म, विकर्म काय तें सांगतात.

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।**
**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥१६॥**
**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।**
**अकर्मणश्च बोध्दव्यं गहना कर्मणो गतिः ॥१७॥**
**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्माणि च कर्म यः ।**
**स बुध्दिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥१८॥**

कर्म काय, अकर्म कोणतें यांचा निर्णय महाज्ञान्यांसहि नीट होत नाहीं. तुला मी आतां तें कर्म सांगतों, जें नीट समजल्यास तुला अकल्याणकर कर्म टाळतां येईल. १६ कर्म, अकर्म, विकर्म तीनहि नीट समजून घ्यावीं; कर्माचें तत्त्व यथार्थतेनें जाणणें फार कठीण आहे. १७ जो पुरुष स्वकर्माचरणांतच नैष्कर्म्य असूं शकतें हें जाणतो, आणि जो केवळ शारीरकर्मपरित्यागानेंच कर्मत्याग होत नाहीं असें समजतो, तोच सर्व कर्में करूनहि, मानवांत खरा जाणता, आणि योगी आहे. १८

कर्म म्हणजे यथायोग्य कर्माचरण, कर्माभाव म्हणजे अकर्म, आणि विकर्म म्हणजे निषिद्ध कर्म. " कर्मण्यकर्म " म्हणजे स्वकर्माच्या यथायोग्य समाचरणांतच " नैष्कर्म्यसिद्धि "; हेंच येथें प्रतिपादिलें आहे. कर्माचरणांत बुद्धि-योगाचें महत्त्व, वेदविहित यज्ञकर्माचें महत्त्व, आणि यज्ञाचे अनेक प्रकार सांगून, " अध्यात्मयज्ञ " सर्वांत श्रेष्ठ असें सांगितलें आहे. " अकर्माणि च कर्म " याचा अध्याय ३ श्लो. ७ मध्यें उल्लेख आहे. नितांत कर्माभाव शक्यच नाहीं, इंद्रियकर्में थांबविलीं तरी मनाचीं कर्में थांबत नाहींत. बाह्य कर्में थांबविल्यास मनाचे व्यापार अधिकच होऊं लागतात, म्हणून खरें " नैष्कर्म्य " कसें असतें, हें समजून घेणें फार महत्त्वाचें आहे.

**यस्य सर्वे समारम्भाः कामसंकल्पवर्जिताः ।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पण्डितं बुधाः ॥१९॥**
**त्यक्त्वा कर्मफलासङ्गं नित्यतृप्तो निराश्रयः ।**
**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित् करोति सः ॥२०॥**

ज्याच्या कर्मप्रेरणा कामनाविरहित आणि विशिष्ट हेतुवर्जित असतात, त्याला ब्रह्मवेत्ते, ज्ञानरूपी अग्नीनें ज्याचीं शुभाशुभलक्षण कर्में दग्ध झालीं आहेत असा, ज्ञानवान् मानतात. १९ सर्व कर्मफलाविषयीं आसक्ति सोडून, सर्वदा संतोषवृत्तींत असणारा, आणि कोणत्याहि आश्रयस्थानावर अवलंबून नसणारा ज्ञानी, कर्म करीत असला तरी, तो ( परमार्थतः ) स्वतः कांहींच करीत नसतो. २०

हीच " नैष्कर्म्य " वृत्ति, आणि हेंच " कर्मणि अकर्म ".

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।**
**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥२१॥**
**यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ।**
**समः सिध्दावसिध्दौ च कृत्वापि न निबध्यते ॥२२॥**

सर्व इच्छा ज्याच्या नाहींशा झाल्या आहेत, ज्यानें अंतःकरणाचें आणि बाह्येंद्रियांचें संयमन केलें आहे, आणि सर्व संसाराचा व्याप ज्यानें सोडून दिला आहे, त्यानें शरीर धारणाला आवश्यक असें निरभिमानवृत्तीनें कर्म केलें, तर त्याला कोणताहि दोष लागत नाहीं. २१ जें कांहीं सहज, अनायासें, प्राप्त होईल त्यावर संतुष्ट राहणारा, कामक्रोध, रागद्वेष, सुख-दुःखादि द्वंद्वापलीकडे ज्याची वृत्ती गेली आहे असा, ज्याला दुसऱ्याचा हेवा नाहीं, ज्याला हानि लाभ दोन्ही सारखेंच, त्यानें कोणतींहि कर्में केलीं तरी तीं त्याला बंधनकारक होत नाहींत. २२

ही वर्णिलेली वृत्ति कर्मप्रवृत्तीची नसून कर्मसंन्यासाची आहे. सङ्ग ही चित्ताची वृत्ती आहे, केवळ बाह्य कर्माचरणानें सङ्ग घडत नाहीं. केवळ शारीर-कर्म, त्यांत आसङ्ग नसेल तर, तें अकर्मच. त्याचा चित्तावर कांहींच परिणाम होणार नाहीं. बीज भाजल्यावर जसें रुजत नाहीं, तसें ज्ञानाग्निदग्ध कर्म शुभा-शुभफलदायी होत नाहीं.

**गतसङ्गस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।**
**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥२३॥**
**ब्रह्मार्पणं ब्रह्महविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।**
**ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥२४॥**

ज्याची कर्मफलासंबंधीं आसक्ति नाहीं, जो कर्मबंधापासून मुक्त आहे, ज्याचें चित्त ज्ञानानंदांत मग्न आहे, त्याचें यज्ञार्थ केलेलें कर्म सर्वच विलय पावतें. २३ त्याचीं आहुती देण्याचीं उपकरणें आणि आहुतीहि ब्रह्म, त्याचें हवनहि ब्रह्माग्नींत ब्रह्मानेंच केलेलें, असा तो ब्रह्मकर्मांत चित्तैकाग्र्य झालेला ( योगी ) ब्रह्मस्वरूपींच विलीन होणार. २४

**दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।**
**ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुव्हति ॥२५॥**
**श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुव्हति ॥**
**शब्दादीन्विषयानन्ये इन्द्रियाग्निषु जुव्हति ॥२६॥**
**सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।**
**आत्मसंयमयोगाग्नौ जुव्हति ज्ञानदीपिते ॥२७॥**

कांहीं योगी देवांना उद्देशून यज्ञ करतात, तर दुसरे कांहीं ब्रह्मरूपी अग्नींत, यज्ञानें यज्ञाचेंच हवन करतात (सोपाधिक आत्म्याला निरुपाधिक परब्रह्मस्वरूपानें पाहतात). २५ कांहीं श्रोत्रादि इंद्रियांना संयमाग्नींत हवन करतात, तर दुसरे शब्दादि विषयांना इंद्रियाग्नींत हवन करतात. २६ सर्वच इंद्रियकर्में आणि प्राणकर्में कांहीं योगी ज्ञानानें प्रदीप्त केलेल्या आत्मसंयमरूपी अग्नींत हवन करतात. २७

इंद्र वरुणादि देवतांना उद्देशून केलेला तो दैव यज्ञ, आणि " यज्ञेन यज्ञ ", " ब्रह्मयज्ञ ", यमनियमादि यज्ञ, तसेच ध्यान धारणादि यज्ञ, असें येथें अनेक यज्ञ सांगितलें आहेत. हे सर्वच अर्थात् निष्काम यज्ञ आहेत.

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।**
**स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥२८॥**

कांहीं हविर्द्रव्याने यज्ञ करणारे, कांहीं तपश्चर्येनें, आणि कांहीं योगसाधनानें यज्ञ करणारे आहेत; आणि दुसरे कांहीं खडतर व्रताचरणानें वेदाध्ययन करून आणि शास्त्रार्थ परिज्ञानानें यज्ञ करणारे योगी आहेत. २८

**अपाने जुव्हति प्राणं प्राणेऽपानं तथाऽपरे ।**
**प्राणापानगती रुध्वा प्राणायामपरायणाः ॥२९॥**
**अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुव्हति ।**
**सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥३०॥**
**यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् ।**
**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥३१॥**

अपानांत प्राणाची, आणि प्राणांत अपानाची आहुती देऊन प्राणापानांच्या गतीचा निरोध करून प्राणायामतत्परहि दुसरे योगी आहेत. २९ कांहीं आहारांचें नियमन करून प्राणांतच प्राणांची आहुती देतात. हे सर्वच यज्ञाचें तत्त्व जाणणारे, यज्ञकर्मानें पुनीत होऊन, ३० यज्ञावशिष्ट जें अमृत तें प्राप्त करून घेऊन, शाश्वत ब्रह्मस्वरूपांत विलीन होतात. (परंतु) जो यज्ञ करीत नाहीं त्याचें इहलोकीं कल्याण नाहीं, त्याला, हे अर्जुना ! परलोकप्राप्ति कोठून होणार ? ३१

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।**
**कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥३२॥**

असे हे अनेकविध यज्ञ वेदांच्या द्वारें पसरलेले आहेत. हे सर्व यज्ञ कर्माचरणानेंच सिद्ध होतात, हें समजलें म्हणजे तूं कर्मबंधापासून मुक्त होशील. ३२

यज्ञ हें कर्मविधान आहे, कर्मसंन्यास नव्हे, तेव्हां कर्माशिवाय यज्ञ होणार नाहीं. वर सांगितलेले सर्व यज्ञ आत्मशुद्धीसाठीं करावयाचे आहेत, ते काम्य यज्ञ नाहींत.

**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।**
**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥३३॥**
**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥३४॥**
**यत् ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ।**
**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥३५॥**

हविर्द्रव्यानें करावयाच्या यज्ञांपेक्षां ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे. कारण, हे वीरा ! सर्व कर्मांचें अंतिम साध्य ज्ञान आहे. ३३ तें ज्ञान तत्त्वदर्शी ज्ञानी पुरुष, तूं, त्यांना शिष्यत्वानें शरण गेल्यास, त्यांना त्यासंबंधीं प्रश्न केल्यास, आणि शिष्यत्व पत्करून त्यांची सेवा केल्यास, तुला सांगतील, हें

पक्कें समज. ३४ हें ज्ञान प्राप्त झाल्यावर, तुझ्या मनांत असा गोंधळ पुनः होणार नाहीं, आणि त्या ज्ञानानें अखिल भूतजात आत्मस्वरूपांत, आणि तसेंच तें माझ्यांत ( ईश्वरांतहि ) तुला दिसूं लागेल. ३५

निश्रेयसप्राप्तीचा मार्ग ज्ञानच आहे, कर्म हें ज्ञानाचें साधन आहे, " ज्ञानदेव तु कैवल्यं, " तें ज्ञान गुरुपासून मिळालें पाहिजे, आणि त्याची परिसमाप्ति म्हणजे सर्वात्मभाव, समता, सर्वभूतहितत्व आणि ब्रह्मसायुज्य.

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।**
**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥३६॥**

तूं पाप्यांपेक्षांहि पापी असलास तरी, या ज्ञाननौकेनें या पापांच्या सागराला तरून जाशील. ३६

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।**
**ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते तथा ॥ ३७॥**

ज्याप्रमाणें धगधगलेला अग्नि काष्टांना जाळून भस्म करतो, त्याप्रमाणें ज्ञानाग्नि, हे अर्जुना ! सर्व कर्मांचा समूळ नाश करून टाकतो. ३७

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।**
**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दाति ॥३८॥**
**श्रद्धावांल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छाति ॥३९॥**

ब्रह्मज्ञानासारखें पवित्र जगांत दुसरें कांहींहि नाहीं. तें तुला योगाची पूर्णसिद्धि झाल्यावर क्रमाक्रमानें, स्वतःच्याच प्रेरणेनें, आपल्याच अंतरंगांत प्राप्त होईल. ३८ शुद्ध श्रद्धेनें, तत्परतेनें, इंद्रियनिग्रहानेंच ज्ञान प्राप्त होतें, आणि ज्ञान प्राप्त झाल्यावर तत्काळच शाश्वत शांति प्राप्त होते. ३९

श्रद्धेशिवाय ज्ञान प्राप्त होत नाहीं. तें तर्ककुतर्कानें प्राप्त होत नाहीं. आपणास ज्ञान देणारा निश्चितपणें ज्ञान देऊं शकेल, अशी श्रद्धा असल्याशिवाय ज्ञानोप-

लब्धीच होणार नाहीं. ज्ञान मिळविण्यासाठीं तन्मय झालें पाहिजे, आणि इतर बाह्य वस्तूंनीं मन व्यग्र होऊन उपयोगी नाहीं. ज्ञानार्जनांत जितकी तल्लीनता होईल, बाह्य जगाची जाणीव जितकी नाहींशी होईल, आणि आत्मारामांत जितकें मन मग्न होईल, तितका शांतिसुखाचा अनुभव प्राप्त होऊं लागेल, सर्व विश्वाशीं समता चित्तांत प्रतीत होऊं लागेल, आणि ब्रह्मात्मभावाचा साक्षात्कार होऊं लागेल. हें ब्रह्मज्ञान " स्वयं " " योग संसिद्ध " "कालेन" आणि " आत्मनि विन्दति," ह्या चारहि पदांचा आशय अत्यंत महत्त्वाचा आहे. जो ह्या ज्ञानासंबंधीं तन्मय आणि तत्पर होऊन त्याच्याशीं एकरूप होईल, त्यालाच हें अभ्यासानें, आपल्याच प्रयत्नानें, आपल्याच ठिकाणीं प्राप्त होईल. सर्वच ज्ञान अशाच तत्त्वावर प्राप्त होतें. तें अंतरंगांतून उद्‌भूत होतें, तें सुप्त असलेलें जागृत होतें. " नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन । यमैवेष वृणुते तेन लभ्यः तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम्. "

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥४०॥**

ज्याला सम्यक् ज्ञान प्राप्त झालेलें नाहीं, श्रद्धाहि नाहीं, आणि ज्याच्या चित्तांत नेहमीं संशय असतो, त्याचा नाश ठरलेलाच; अशा पुरुषाला ऐहिक अभ्युदय नाहीं, परलोकीं सद्गति नाहीं, आणि त्याला सुख कधींच लाभणार नाहीं. ४०

वर ज्ञानार्जनास श्रद्धेची आवश्यकता सांगितली, तीच येथें अधिक स्पष्ट करून सांगितली आहे. संशया मनुष्य तर्कट काढीत बसतो, म्हणून त्याला चित्ताला शांति देणारें ज्ञान कधींच होऊं शकत नाहीं.

**योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।**
**आत्मवन्तं न कर्माणि निबध्नन्ति धनंजय ॥४१॥**
**तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनाऽऽत्मनः ।**
**छित्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥४२॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे ज्ञानकर्मसंन्यासयोगो नाम चतुर्थोऽध्यायः**

ज्यानें ईश्वरपरायणतेनें सर्व कर्मांचा संन्यास केला आहे, सम्यक् ज्ञानानें ज्याचें चित्तांतील संशय नाहींसे झाले आहेत, अशा आत्मज्ञानी पुरुषाला कर्मांचें बंधन होऊंच शकत नाहीं. ४१ म्हणून अज्ञानानें (अविवेकानें) उद्भूत झालेला हा आपल्या चित्तांतील संशय सम्यक्ज्ञानाच्या खड्गानें नष्ट करून टाकून, बुद्धियोगाचा आश्रय करून, उठून उभा रहा. ४२

"चेतसा सर्व कर्माणि मयि संन्यस्य मत्परः। बुद्धि योगमुश्रित्य मच्चितः सततं भव" असें शेवटीं अ. १८ त सांगितलें आहे, तेंच येथें प्रतिपादित केलें आहे. श्रद्धा ज्ञानावर आधारलेली असावयास पाहिजे. ज्ञानपूर्वक विवेकानें बुद्धीचा निश्चय झाल्यावरच, ज्ञानाच्या क्षेत्रांत प्रगती होऊं शकते. सम्यकज्ञान जसजसें प्रतीत होत जातें, तसतसें अधिकाधिक ज्ञान चित्तांत प्रस्फुट होतें, आणि अंतरंगांत प्रकाश होत जातो. संशयी वृत्ति ज्ञानाचा निरोध करते. ज्ञान बाहेरून येतें असें नाहीं, तें अंतःकरणांत प्रकाशूं लागतें. दुराग्रह आणि कुग्रह त्याला आड येतात, त्यांना बाजूस सारून अंतःकरणाचें कपाट उघडें केल्यास, "सर्व द्वारेषु देहेऽस्मिन् प्रकाश उपजायतें," अशी स्थिति प्राप्त होते.

तिसऱ्या अध्यायांत कर्माचें अपरिहार्यत्व आणि कर्मसंन्यासाचें खरें स्वरूप सांगितलें, आणि चौथ्यांत कर्माला ज्ञानाची जोड देणें आवश्यक आहे, असें प्रतिपादिलें आहे. यज्ञार्थ कर्म करावें, तो यज्ञ म्हणजे काय हें तिसऱ्यांत सांगून, ज्ञानयज्ञ हा श्रेष्ठ यज्ञ म्हणून चौथ्यांत सांगितलें आहे. "यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्व किल्बिषैः" "यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम्," "यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते" असें यज्ञार्थ कर्म प्रतिपादिलें आहे. कर्म आणि ज्ञान यांची याप्रमाणें सांगड घातली आहे. ज्ञाननिष्ठ कर्माचें विशेषत्वें समर्थन केलें आहे. कर्माचा केवळ शरीरानें परित्याग, म्हणजे त्याग किंवा संन्यास नव्हे. महत्त्व अंतःकरणाच्या वृत्तीचें आहे.

---

# अध्याय पांचवा

## कर्मसंन्यास योग

अर्जुन उवाच—

**संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।**
**यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥१॥**

अर्जुन म्ह०—हे श्रीकृष्णा ! तूं कर्मांचा संन्यास करावयास सांगतोस, आणि ( त्याबरोबरच ) कर्मयोगहि आचरावयास सांगतोस, तर आतां या दोहोंपैकीं कोणती एक निष्ठा मोक्षदायक आहे, तें मला निश्चित सांग. १

अ. ४ मध्यें "योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् । आत्मवंतं न कर्माणि निबध्नन्ति धनंजय" असें म्हटलें आहे, म्हणजे ज्ञाननिष्ठा आणि कर्मनिष्ठा दोनीहि आवश्यक अशा सांगितल्या. "ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम्" अशा या दोन निष्ठा तिसऱ्या अध्यायांतहि सांगितल्या होत्या.

श्रीभगवानुवाच—

**संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।**
**तयोस्तु कर्मसंन्यासात् कर्मयोगो विशिष्यते ॥२॥**
**ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति ।**
**निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥३॥**

श्रीभगवान् म्ह०—कर्मसंन्यास आणि कर्मयोग दोन्ही मार्ग निःश्रेयस ( मोक्ष ) देणारे आहेत, त्या दोहोंपैकीं कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोगाचें विशेष महत्त्व आहे. २ कारण, हे महाबाहो ! ज्याला ( कशाविषयीं किंवा कोणाविषयींहि ) द्वेष नाहीं, ज्याला कसलीहि आकांक्षा नाहीं, आणि जो

( राग–द्वेष, सुख-दुःख इत्यादि ) द्वंद्वाच्या पलीकडे आहे, कर्मबंधापासून तो अनायासेंच मुक्त होतो; तो नैष्ठिक संन्यासी जाणावा. ३

कर्मयोग आणि कर्मसंन्यास हे दोन्ही मोक्षप्राप्तीसाठीं आवश्यक आहेत. कर्मयोगाच्या सम्यगाचरणानेंच ज्ञानयोग, आणि संन्यासयोग सिद्ध होतो. कर्मयोग आचरणास सुलभ आहे. " कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः । जन्मबंध विनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयम् ॥ " रागद्वेषादि द्वंद्वें सोडून कर्मयोगी नित्यसंन्यासी होतो, आणि त्याला अंतीं कैवल्य प्राप्ति होते.

**सांख्ययोगौ पृथक् बालाः प्रवदन्ति न पण्डिताः ।**
**एकमप्यास्थितः सम्यग् उभयोर्विन्दते फलम् ॥४॥**
**यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।**
**एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥५॥**

सांख्य ( ज्ञानमार्ग, संन्यास ) आणि योग ( कर्मयोग ) हे भिन्न आहेत, असा अज्ञजनांचा प्रवाद आहे, ज्ञानी असें म्हणत नाहींत. ४ एकाचेंच उत्तम प्रकारें आचरण करणारास दोहोंचेंहि फळ मिळतें. ४ सांख्य ( ज्ञानयोगी, संन्यासी ) ज्या पदाला पोंहचतात, त्याच पदाला योगीहि ( कर्मयोगीहि ) पोहोचतात. सांख्य आणि योग दोन्ही एकच असें ज्याला समजलें, त्यालाच खरें तत्त्व समजलें. ५

सांख्ययोगी केवळ ज्ञानानेंच कैवल्य मिळवितात, आणि कर्मयोगी बुद्धियुक्त कर्म करून ज्ञानी होतो, आणि नंतर त्याला कैवल्य प्राप्त होतें. " न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते । तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति " " सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यतें ", दोघेहि ज्ञानानेंच परमपदाला जातात.

**संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।**
**योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥६॥**

हे महाबाहो ! योगाशिवाय ( कर्मयोगाशिवाय ) संन्यास ( ज्ञानयोग ) प्राप्त होणें अत्यंत कठीण आहे, आणि कर्मयोगी तपस्व्याला ब्रह्मपदाची प्राप्ति होण्यास फार काळ लागत नाहीं. ६

आत्मशुद्धीसाठीं विहितकर्में बुद्धियुक्त अंतःकरणानें करूनच, ज्ञान प्राप्तीला साधक योग्य होतो. अशा पूर्वतयारीशिवाय ज्ञानप्राप्ति होणें कठीण आहे. याप्रमाणें कर्मयोगी परमपदप्राप्तीला योग्य होतो, हेंच कर्मयोगाचें वैशिष्ट्य आहे. कर्मयोगानेंच कर्मसंन्यास सिद्ध होऊं शकतो.

**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ।**
**सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥७॥**
**नैव किञ्चित् करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।**
**पश्यन् शृण्वन् स्पृशन् जिघ्रन् अश्नन् गच्छन् स्वपन् श्वसन् ॥८॥**
**प्रलपन् विसृजन् गृण्हन् उन्मिषन् निमिषन्नपि ।**
**इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन् ॥९॥**

विशुद्धांतःकरण, आत्मसंयमी, जितेंद्रिय, भूतमात्राला आत्मवत् पाहणारा कर्मयोगी कर्में करूनहि कर्मानें बद्ध होत नाहीं. ७ तत्त्ववेत्ता (ज्ञानी) कर्मयोगी इंद्रियांच्याद्वारें पाहून, ऐकून, स्पर्श करून, वास घेऊन, खाऊन, चालून, निजून, स्वासोच्छ्वास करून, ८ बोलून, देऊन, घेऊन, डोळे उघडून, डोळे मिटून ( या सर्व क्रिया होत असतांहि ) इंद्रियें इंद्रियार्थांशीं संबंधित होत आहेत, मी कांहींच करीत नाहीं असें मानतो. ९

कर्मांत आसक्ति नसेल, आणि चित्त जर महत्तत्त्वाभिनिविष्ट असेल, तर कर्म केल्याचें तर नाहींच, पण कर्म घडल्याचेंहि भान राहणार नाहीं.

**ब्रह्मण्याधाय कर्माणि सङ्गं त्यक्त्वा करोति यः ।**
**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥१०॥**
**कायेन मनसा बुद्ध्या कवलैरिंद्रियैरपि ।**
**योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वाऽऽत्मशुध्दये ॥११॥**

अनासक्तबुद्धीनें, सर्वकर्में ब्रह्मार्पण करून जो वागतो, त्याला, कमलदलाला जसें पाणी चिकटत नाहीं तसें, पाप चिकटत नाहीं १० शरीरानें,

मनानें, बुद्धीनें, आणि अलिप्त अशा इंद्रियांनींहि, अनासक्तीनें, आत्म-शुद्धीसाठीं कर्मयोगी कर्माचरण करतात. ”

फलाकांक्षेनें नव्हे, तर आत्मशुद्धीकरितां योगी विहित कर्में करतात.

**युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीम् ।**
**अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ॥१२॥**

फलाकांक्षा सोडल्यानें कर्मयोग्याला ( कर्माचरणानें ) शाश्वतशांति मिळते, पण फलाकांक्षेनें फलाविषयीं आसक्त पुरुष, योगयुक्त नसेल तर, कर्मानें बद्ध होतो. १२

**सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ।**
**नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥१३॥**

चित्तानें ( विवेकबुद्धीनें ) सर्व कर्मांचा संन्यास करून जितेंद्रिय देही या नवद्वार पुरांत ( देहांत ) कांहींहि न करतां, किंवा कांहींहि न करवितां, प्रसन्नचित्त ( आत्मानंदीं मग्न ) राहतो. १३

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।**
**न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥१४॥**
**नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जन्तवः ॥१५॥**

हा प्रभु ( देही, आत्मा ) या संसारांत कर्तृत्वबुद्धीहि उत्पन्न करीत नाहीं, किंवा कांहीं क्रियाहि करीत नाहीं, किंवा कर्मांचें फलहि देत नाहीं, केवळ प्रकृतिधर्मानेंच सर्व कांहीं घडत असतें. १४ तो सर्वव्यापी (सर्वात्मा) कोणाचें पाप घेत नाहीं, किंवा पुण्यहि पण घेत नाहीं; ज्ञानावर अज्ञानाचें पटल असल्यामुळें जीवांना ( पाप पुण्याविषयींचा ) मतिभ्रम होतो. १५

हा प्रत्येकाच्या हृदयांत वास करणारा अंतरात्मा ( परमात्म्याचा अंश ) देहाचा स्वामी ( प्रभु ) आहे, परंतु देहाचें कर्तृत्व आणि भोक्तृत्व त्याचें नाहीं, तें उपहित जीवाचें आहे. जीवाची प्रकृति कर्म करते, आणि त्याचें फलहि

भोगणारा जीवच आहे. तसेंच हा सर्वसाक्षी, सर्वात्मा, विभु सर्वांतर्यामी आहे, तरी जीवाच्या पापपुण्यापासून तो अलिप्त आहे, कारण तो कर्ता नाहीं म्हणून भोक्ताहि नाहीं. जीवाच्या अज्ञानानें पापपुण्य घडतें, त्यांचा अधिकारी जीवच.

**ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।**
**तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥१६॥**
**तद्‌बुध्दयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।**
**गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥१७॥**

परंतु तें अज्ञानाचें पटल ज्यांचें आत्मज्ञानानें नाहींसें झालें आहे, त्यांचें तें ज्ञान सूर्याप्रमाणें ( अंधकार नाहींसा करून ) त्यांना त्या परमपदाचें ( परब्रह्माचें ) दर्शन घडवून देतें. १६ त्या सम्यक्‌ज्ञानानें पूतपाप झालेल्या, परमपदार्शी बुद्धीनें, अंतःकरणानें, आणि निष्ठेनें एकरूप झालेल्या पुण्यात्म्यांना जन्ममरणाचा फेरा नाहीं. १७

पुण्यपापासंबंधीं अज्ञान आत्मज्ञानानेंच ( सम्यक् ज्ञानानेंच ) नष्ट होईल, आणि अपरोक्ष ज्ञान झाल्यावर जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्तता होईल.

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।**
**शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः ॥१८॥**
**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्‌ब्रह्मणि ते स्थिताः ॥१९॥**

या आत्मज्ञानी पण्डितांना विद्याविनयादि गुणांनीं युक्त ब्राह्मण काय, एक ( मूर्ख अडमुठा ) बैल काय, एक हत्ती ( महापशू ) काय, एक कुत्रा ( कुत्सित प्राणी ) काय, किंवा कुत्र्याचें मांस खाणारा ( अमंगल हीनजाती ) काय, सर्व सारखेच. १८ अशी ज्यांची बुद्धि समत्वपूर्ण झाली त्यांनीं येथेंच ( याच देहीं ) जन्ममरण जिंकलें, कारण परब्रह्म सर्वदोषातीत आणि सर्वांशीं सम आहे, म्हणून ते ( पूर्णप्रज्ञ ) ब्रह्मांतच ( ब्रह्मस्वरूपच ) आहेत. १९

हें येथें जीवन्मुक्ताचें वर्णन आहे. ते देहांत असले तरी मुक्तच आहेत.

**न प्रहृष्येत् प्रियं प्राप्य नोद्विजेत् प्राप्य चाप्रियम् ।**
**स्थिरबुध्दिरसंमूढो ब्रह्मविद् ब्रह्मणि स्थितः ॥२०॥**
**बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत्सुखम् ।**
**स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥२१॥**

असा तो ब्रह्मस्वरूप झालेला स्थितप्रज्ञ ( स्थिरबुद्धि ) सिद्ध (असंमूढ) ब्रह्मज्ञानी सुखानें हर्षित होत नाहीं, किंवा अनिष्ट परिस्थितींत उद्विग्नहि होत नाहीं. २० बाह्येंद्रिय विषयांत त्याचें अंतःकरण आसक्त नसल्यानें आत्मानंदाचें जें सुख तें त्यास प्राप्त होतें, आणि तो योगानें ब्रह्माशीं तादात्म्य पावलेला योगी शाश्वत सुखाचा अनुभव घेतो. २१

आत्मानंदांत जें सुख आहे, तें अनुभवल्यावांचून कळत नाहीं, तें त्या योग्यास प्राप्त होतें, आणि त्याला ऐहिक सुखाची गोडी राहत नाहीं.

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।**
**आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥२२॥**

बाह्येंद्रियविषयांपासून मिळणारे भोग अंतीं केवळ दुःख देणारेच असतात. हे कौंतेया ! ते भोग प्राप्त होणारे आणि नष्ट होणारे असल्यामुळें, ज्ञानी पुरुष त्यांत गुंतून सुख मानीत नाहीं. २२

**शक्नोतीहैव यः सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात् ।**
**कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥२३॥**

काम आणि क्रोधापासून उत्पन्न होणारे आवेग देहावसानापूर्वीं येथेंच ( या देहींच ) जो सहन करूं शकतो ( ज्याचें चित्त या विकारांनीं क्षोभ पावत नाहीं ) तोच ( खरा ) योगी, आणि तोच ( खरा ) सुखी पुरुष म्हणावयाचा. २३

हें जीवन्मुक्ताचें वर्णन आहे. मरणानंतर मोक्षापेक्षां, हाच मोक्ष श्रेष्ठ आहे.

**योऽन्तःसुखोंऽतरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः ।**
**स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥२४॥**

**लभन्ते ब्रह्मनिर्वाणं ऋषयः क्षीणकल्मषाः ।**
**छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥२५॥**

ज्याचें सुख स्वांतःकरणांतच आहे, जो सदा आत्मानंदांतच मग्न असतो, ज्यानें स्वात्मप्रकाश अनुभविला आहे, असा तो ब्रह्मस्वरूप झालेला आत्मज्ञानी परब्रह्मांतच विलीन होतो. २४ छिन्नसंशय, स्वाधीनान्तःकरण, भूतमात्राच्या हितांत आत्मसुख मानणारे निर्दोष ऋषी परब्रह्मांत विलीन होतात. २५

ब्रह्मनिर्वाण, म्हणजे सायुज्यमुक्ति, आत्मानंदांत सदा मग्न राहणाऱ्या ज्ञानयोग्यांना सहजच आहे. ते देहांत असूनहि परब्रह्मांतच आहेत.

**कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।**
**अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥२६॥**

कामक्रोध ज्यांना कधींहि स्पर्श करूं शकत नाहींत, अशा कृतात्म्या आत्मज्ञानीं यतींना ( जीवन्मुक्तांना ) ब्रह्मसायुज्य तर सदा सन्निधच आहे. २६

असे योगी मुक्तच आहेत. जीवन्मुक्तांना मुक्तीसाठीं कोठें जावयाचें नसतें.

**स्पर्शान् कृत्वा बहिर्बाह्यान् चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः ।**
**प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ॥२७॥**
**यतेंद्रियमनोबुध्दिर्मुनिर्मोक्षपरायणः ।**
**विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥२८॥**

बाह्येंद्रियविषयांना बाहेर घालवून, दृष्टि भ्रमध्यांत स्थिर करून, नासिकेंत प्राण आणि अपान सम करून, २८ इंद्रियें, मन आणि बुद्धि यांचें नियमन करून असणारा, इच्छा, भय, क्रोध ज्याचे लय पावले आहेत असा, केवळ मोक्षच परमगति मानणारा मुनि ( संन्यासी ) सर्वदा मुक्तच आहे, ( त्याला मोक्ष म्हणजे कांहीं मिळवावयाचें असें नाहीं ). २९.

कर्मयोग ईश्वरार्पितसर्वभावानें आचरून, सत्त्वशुद्धि, ज्ञानप्राप्ति आणि नंतर सर्वकर्मसंन्यास या क्रमानें योगी ब्रह्मनिर्वाण पदाला पोहचतो. यासाठीं आवश्यक असलेला ध्यानयोग पुढील अध्यायांत सांगावयाचा आहे, त्याचें येथें दिग्दर्शन केलें आहे. ध्यानयोग काय हें येथें थोडक्यांत सूत्ररूपानें सांगितलें आहे.

**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।**
**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥२९॥**
**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**
**संन्यासयोगो नाम पञ्चमोऽध्यायः**

सर्व यज्ञ, सर्व तपें ज्याला जाऊन पोहचतात, जो अखिल जगाचा अधिपति ( सर्वेश्वर, सर्वात्मा ), आणि जो सर्व भूतमात्रांचा ( निरपेक्षतेनें कल्याण करणारा ) जिवलग मित्र आहे, अशा ( सर्वांच्या हृदयांत वास करणाऱ्या, सर्वकर्मफलाध्यक्षाला, सर्वसाक्षी परमेश्वराला ) मला यथार्थतया जाणून, तो योगी परमशांति ( परम समाधान ) पदाला पोहचतो. २९

सर्व यज्ञांचा आणि तपांचा भोक्ता असा तो अधियज्ञ परमेश्वर आहे. सुहृद म्हणजे ममताळू, प्रेमानें ईप्सित देणारा. जशी श्रद्धा, जशी भक्ति, जसा भाव तसेंच कर्माचें फल मिळतें. हा फलदाता सर्वांतर्यामी परमात्माच आहे. जसें मागावें तसेंच मिळतें, हा निरपवाद नियम आहे. कर्माला ज्ञानाची जोड देऊन, समत्वबुद्धि, अनासक्ति, इंद्रियनिग्रह, आणि परमात्म्याच्या ठिकाणीं अनन्यभाव, या सर्वांनीं युक्त असा कर्मयोगी ध्यानयोगाच्या अभ्यासानें नित्य-संन्यासी होतो, आणि ब्रह्मनिर्वाणपदाला जाण्यास योग्य होतो.

---

# अध्याय सहावा

## ध्यानयोग

श्रीभगवानुवाच--

**अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।**
**स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥१॥**
**यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विध्दि पांडव ।**
**न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥२॥**

श्रीभगवान् म्ह०---कर्मांच्या फलावरच केवळ दृष्टी न ठेवितां जो आपलें कर्तव्यकर्म करीत राहतो, तो संन्यासीहि आहे आणि योगीहि आहे; केवळ अग्निकार्य सोडून, किंवा निष्क्रिय होऊनच कोणी संन्यासी किंवा योगी होत नाहीं. १ ज्याला संन्यास असें म्हणतात तोच योग होय असें समज, कारण संकल्पाचा संन्यास केल्याशिवाय कोणासहि योगी होता येत नाहीं. २

कर्मफलाचा आश्रय म्हणजे कर्मफलाभिलाषा. कोणत्याहि कर्मप्रवृत्तिला विशिष्ट उद्देश असतोच. उद्दिष्टाशिवाय कर्मप्रवृत्ति शक्य नाहीं, परंतु फललालसा नसेल तर कर्मबंध होणार नाहीं. कर्तव्यकर्माचरणाची आवश्यकता, आणि महती याठिकाणीं पुनः निक्षून सांगितली आहे. कर्तव्यबुद्धीनें, फल-लालसा सोडून, स्वकर्माचरण करणारा पुरुष, संन्याश्यापेक्षां किंवा योग्यापेक्षा कमी प्रतीचा नाहीं, तसेंच संन्यास आणि योग यांत मूलतः तात्विक भेद नाहीं हें येथें स्पष्ट केलें आहे.

**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।**
**योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥३॥**

**यदा हि नेंद्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।**
**सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥४॥**

योगाभ्यासास उद्युक्त होणाऱ्या व्रती साधकाला कर्मानेंच उपक्रम सांगितला आहे, आणि त्यालाच योगसिद्धि झाल्यावर शांति (निर्विकारता) हेंच साधन सांगितलें आहे. ३ विषयांविषयीं आणि कर्मांविषयीं अनासक्त झाल्यावर, त्या सर्व काम्यकर्मांचा अत्यंत परित्याग करणाऱ्या योगयुक्ताला योगारूढ (योगसंसिद्धि प्राप्त झालेला) म्हणतात. ४

योगसिद्धीसाठीं प्रथम यम, नियम, आसन, प्राणायाम हीं कर्मेंच करणें आवश्यक असतें. हींच साधनें योगसिद्धीला कारण होतात. या साधनांशिवाय साधक प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि या चतुष्टयाचा अधिकारी होत नाहीं. अशा प्रकारें योगसाधनेस कर्माचें महत्त्व सांगितलें आहे. कर्माचा परित्याग केल्यास योगहि साध्य होऊं शकत नाहीं. कर्म करून देहशुद्धि आणि चित्तशुद्धि झाल्यानंतरच योगमार्गात पदार्पण करतां येईल. योगसिद्धीला शम आवश्यक आहे, पण पूर्वाभ्यासाला कर्मच आवश्यक आहे. संकल्पविकल्पात्मक मनाचा निरोध, आणि विषयासंबंधीं आणि कर्मफलासंबंधीं अनासक्ति साध्य झाल्यावरच योग सिद्ध झाला, असें म्हणतां येईल.

**उध्दरेदात्मनाऽऽत्मानं नात्मानमवसादयेत् ।**
**आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥५॥**
**बंधुरात्माऽऽत्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।**
**अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥६॥**

आपली उन्नति आपण स्वतःच करून घ्यावयास पाहिजे, आपण आपला अधःपात होऊं देऊं नये; कारण, आपल्या उद्धाराला सहायक आपणच, आणि अवनतीला कारण, आपले शत्रूहि, आपणच होतो. ५ ज्यानें आत्मसंयमनानें आपणा स्वतःला जिंकलें, तोच आपल्या स्वतःचा (उद्धार करणारा) मित्र होतो, (उलट), ज्यानें आत्मसंयमन केलें

नाहीं, तो स्वतःच ( आपलें अकल्याण करून घेणारा ) आपण आपलाच शत्रु बनतो. ६

अध्यात्माच्या क्षेत्रांत मनुष्य आपणच आपला मित्र, किंवा शत्रु होत असतो. आपलीं इंद्रियें, मन, बुद्धि, अहंत्व हीं सर्व मिळूनच "मी" ( अहं ) होतो. इंद्रियांचें आणि चित्ताचें संयमन, माझें मीच केलें पाहिजे. मी बरें वाईट होणें, सर्वस्वीं माझ्याच स्वाधीन आहे.

**जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥७॥**
**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः ।**
**युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः ॥८॥**

संयमी आणि शांतचित्त पुरुषाचा श्रेष्ठ शुद्ध अंतरात्मा शीतोष्ण, सुख-दुःख, मानापमान ( इत्यादि द्वंद्वभावित परिस्थितींतहि ) शांत स्थिर राहतो ( चित्तैकाग्र्यापासून ढळत नाहीं ). ७ सम्यक् ज्ञान आणि आत्मानुभूति यांनीं संतुष्टचित्त झालेला, अकंपनीय ( अढळ ) संयमी, ज्याला मातीचें ढेंकूळ, दगड, सुवर्ण सर्वच सारखीं, अशाच योग्याला समाहितचित्त सिद्ध म्हणतात. ८

द्वंद्वातीत योग्याला द्वंद्वाचा अनुभव येत नाही असें नाही, पण त्याचें समाधान कोणत्याहि परिस्थितींत ढळत नाही.

**सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु ।**
**साधुष्वपि च पापेषु समबुध्दिर्विशिष्यते ॥९॥**

दयार्द्र अंतःकरणाचा, स्नेही, विरोधी, पक्षातीत, तडजोड करणारा, गर्ह्यवृत्तीचा, किंवा जवळचा संबंधीं, त्याचप्रमाणें सदाचरणी किंवा दुराचरणी, हे सर्वच ज्याला सारखे तोच सर्वश्रेष्ठ ( योगी ) आहे. ९

**योगी युञ्जीत सततं आत्मानं रहसि स्थितः ।**
**एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥१०॥**

**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।**
**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥११॥**
**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः ।**
**उपविश्यासने युञ्ज्याद्योगमात्मविशुध्दये ॥१२॥**
**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।**
**संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥१३॥**
**प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।**
**मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥१४॥**

ध्यानयोगाची साधना करणारानें नेहमीं एकांत ठिकाणीं, एकट्यानें बसून, अंतःकरणाचा आणि इंद्रियांचा संयम करून, सर्व आशाआकांक्षांचा त्याग करून, ममत्व सोडून, आपल्या चित्तवृत्तींचा निरोध करावा. १० पवित्र स्थळीं, न डळमळणारें, फार उंच नाहीं, फार खालींहि नाहीं असें, तळांत कुशासन, त्यावर मृगाजिन, त्यावर धूतवस्त्राची घडी असें आपलें आसन सिद्ध करून, ११ त्या ठिकाणीं मन एकाग्र करून, चित्ताचें आणि इंद्रियांच्या क्रियांचें नियमन करून, आसनावर स्थिर होऊन, चित्त-शुद्धीसाठीं योगसाधना करावी. १२ आपले शरीर, मस्तक, आणि मान एका रेषेंत निश्चल ठेऊन, आपल्या नासाग्रीं दृष्टि लावून, कोणत्याहि दिशेस न पाहतां, नितांत अचल राहावें. १३ चित्त शांत ठेवून, भय सोडून देऊन, ब्रह्मचारिव्रतानें राहून, मनाचें निरोधन करून, अंतः-करणांत परमेश्वराचें ध्यान करून, ईश्वरच आपलें सर्व कांहीं आहे अशा बुद्धीनें योगमग्न होऊन बसावें. १४

ध्यान योगाच्या अभ्यासाला शांत एकांत स्थान पाहिजे. येथें अभ्यासाची प्रक्रिया सांगितली आहे. बाहेरचें वातावरण कसें असावें, आणि अंतःकरण-वृत्ति कशी ठेवली पाहिजे हेंहि सांगितलें आहे. हें " योगम् आरुरुक्षोः " कर्म सांगितलें आहे. योगारूढ झाल्यावर त्याला परम शांति प्राप्त होते. " योगा-रूढस्य शमः कारणम् " हें पुढील श्लोकांत सांगितलें आहे.

**युञ्जन्नेवं सदाऽऽत्मानं योगी नियतमानसः ।**
**शान्ति निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥१५॥**

याप्रमाणें चित्तवृत्तीचा निरोध करून सतत योगाभ्यास करणारास मांझ्या स्वरूपीं ( ईश्वरस्वरूपीं ) प्राप्त होणारी, आणि शेवटीं मोक्षाप्रत नेणारी, शांति मिळते. १५

**नात्यश्नतस्तु योगोऽस्ति नचैकांतमनश्नतः ।**
**न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥१६॥**
**युक्तहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।**
**युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥१७॥**

अधिक खाणाराला, किंवा मुळींच न खाणाराला, अधिक झोंपणाराला, किंवा मुळींच न झोंपणाराला, हा ध्यानयोग साध्य होणार नाहीं. १६ नियमित आहार, नियमित हिंडणें फिरणें, व्यवहारांतहि नियमितच वागणें, निद्रा आणि जागरणहि नियमितच ठेवणें, अशा नियमितपणानें वागणारालाच हा सर्व दुःखापासून मुक्त करणारा ध्यानयोग साध्य होऊं शकतो. १७

या योगाच्या साधनेंत प्रथमच यम, नियम, आसन, प्राणायाम येतात. पण शरीरास उगाच पीडा द्यावयाची नाहीं, " कर्षयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः मां चैवांतःशरीरस्थं तान् विद्ध्यासुरनिश्चयान् " अशा आसुरी तप करणारास योग साध्य होणार नाहीं. इंद्रियांचे लळे पुरविणारासहि तो साध्य होणार नाहीं. वैराग्यपुनीत बुद्धीनें, धैर्यानें, निश्चयानें, आपल्या बलास झेंपेल अशी साधना केल्यास, ती उपकारक आणि फलदायी होऊं शकते.

**यदा विनियतं चित्तं आत्मन्येवावतिष्ठते ।**
**निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥१८॥**
**यथा दीपो निवातस्थो नेङ्गते सोपमा स्मृता ।**
**योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः ॥१९॥**

ज्यावेळीं ( अशा निर्दिष्ट साधनेनें ) निगृहीत चित्त केवळ अंतरात्म्यांतच नितांत स्थिर होऊन राहील, आणि साधक सर्वकामनिर्मुक्त ( निरभिलाष ) होईल, त्यावेळींच तो योगयुक्त झाला असें म्हणावयाचें. १८ निगृहीतांतःकरण आणि आत्मस्वरूपनिष्ठ योग्याला, नितात वातवर्जित स्थानीं असलेल्या, किंचित्‌हि चलित न होणाऱ्या दीपज्योतीची उपमा दिली आहे. १९

**यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।**
**यत्र चैवात्मनाऽऽत्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥२०॥**
**सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।**
**वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥२१॥**
**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।**
**यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणाऽपि विचाल्यते ॥२२॥**
**तं विद्यात् दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् ।**
**स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ॥२३॥**

ज्या योगस्थितींत योगानुष्ठानानें विषयापासून निवृत्त झालेल्या चित्ताला उपरति ( विरक्ति ) प्राप्त होते, ज्या स्थितींत स्वात्मदर्शन झाल्यानें आत्मानंदाचा अनुभव लाभतो ( पूर्ण आत्मसंतोष प्राप्त होतो ), २० ज्या स्थितींत इंद्रियातीत, पण केवळ बुद्धीलाच प्रतीत होणारें असें, जें शाश्वत ( ज्याचा कधींहि नाश नाहीं असें ) सुख त्याची जाणीव होते, आणि ज्या ध्यानयोगात स्थिर झालेला योगी तत्त्वापासून कधींहि ढळत नाहीं, २१ जी स्थिति प्राप्त झाल्यावर त्यापेक्षां कशालाहि योगी अधिक श्रेयस्कर मानीत नाहीं, आणि ज्या स्थितीपासून योग्याला अत्यंत मोठें दुःखहि विचलित करूं शकत नाहीं, २२ तीच सर्व दुःखसंबंधापासून सोडविणारी, जिला योग असें म्हणतात, ती निष्ठा आहे, हें नीट समजावें, आणि या योगाचा ( ध्यानयोगाचा ) किंचित्‌हि न कंटाळता निश्चयानें अभ्यास करावा. २३

श्लोक १८, १९ आणि २० ते २३यांत ध्यानयोग्याची आणि ध्यानयोगाची लक्षणें सांगितलीं आहेत. ध्यानयोगांत अव्यक्तोपासना, निर्विकल्प समाधि, आणि आत्मना आत्मदर्शन सांगितलें आहे. यांत ईश्वराचें ध्यान असावयासच पाहिजे असें नाहीं. विकल्पानें तेंहि सांगितलें आहे. ध्यानयोगांतहि सांख्या-प्रमाणेंच सेश्वर आणि निरीश्वर असे दोन प्रकार आहेत. ईश्वरप्रणिधान विकल्पानें आहे. त्रिपुटिलयांत केवल अद्वैत दर्शन आहे. कर्म आणि भक्ति दोन्ही मार्गांत ईश्वराशीं योग ( तत्परायणता ) आहे. या दोहोंतहि द्वैत आहे, केवळ अद्वैत नाहीं. वस्तुतः द्वैताशिवाय भक्ति नाहीं, आणि कर्मानुष्ठानहि नाहीं.

**संकल्पप्रभवान् कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः ।**
**मनसैवेंद्रियग्रामम् विनियम्य समंततः ॥२४॥**
**शनैः शनैपरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया ।**
**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिन्तयेत् ॥२५॥**
**यतो यतो निश्चरति मनश्चञ्चलमास्थिरम् ।**
**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥२६॥**

मनःप्रवृत्तीनें ( मनाच्या आशाआकांक्षापासून ) उद्भूत होणाऱ्या कामनांचा मूलतः त्याग करून, मनानेंच सर्व इंद्रियांना विषयांपासून पूर्णतया परावृत्त करून, २४ धैर्ययुक्तबुद्धीनें हळूं हळूं विषयांपासून विरक्त होऊन, चित्त आत्मनिष्ठ करून, कसलेहि संकल्पविकल्प मनांत उठूं देऊं नयेत. २५ जिकडे कोठें हें स्वाभाविकपणें चंचल आणि धावरें मन भटकेल, तिकडून त्याला ओढून आणून आत्मस्वरूपांतच बांधून घाला-वयास पाहिजे. २६

ध्यानयोगाची पूर्व तयारी झाल्यावर प्रत्याहार, ध्यान, धारणा साध्य करण्याचा प्रयत्न करावयाचा. याला दीर्घ आणि निश्चयाचा असा अभ्यास पाहिजे. याचें शब्दांनीं कितीहि वर्णन केलें तरी, ध्यानयोगाची खरी कल्पना अनुभवाशिवाय होणें शक्यच नाहीं, आणि हा अनुभवहि शब्दांनीं सांगतां येणार नाहीं.

**प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।**
**उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥२७॥**

( अशा प्रकारें ध्यानयोगानें ) अत्यंत शांतचित्त झालेल्या, सर्व मनोविकार प्रलीन झालेल्या, आणि केवल ब्रह्मरूप अशा सर्वदोषानिर्मुक्त योग्याला सर्वश्रेष्ठ सुख प्राप्त होतें. २७

" शांति निर्वाणपरमां मत्संस्था अधिगच्छति " तें परमशांतीचें अतींद्रिय सुख योग्याला समाधींत प्राप्त होतें. मनाचे व्यापार नाहींसे झाल्यावर चित्ताला निर्मलता येऊन, योगी ब्रह्मस्वरूपच होतो, " निर्दोषं हि समं ब्रह्म तस्मात् ब्रह्मणि ते स्थिताः "

**युञ्जन्नेवं सदाऽऽत्मानं योगी विगतकल्मषः ।**
**सुखेन ब्रह्मसंस्पर्शं अत्यंतं सुखमश्नुते ॥२८॥**

ह्याप्रमाणें सतत ध्यानयोगाभ्यासानें सर्वदोषनिर्मुक्त झालेला योगी परब्रह्मप्राप्तीचें निरतिशय सुख अनायासानें अनुभवतो. २८

अशा प्रकारें ध्यानयोग सिद्ध झाल्यावर योगी ब्रह्मस्वरूप होतो. तो केवळ आनंदरूपच होतो. छिन्नसंशय, प्रशांतात्मा, द्वंद्वातीत, वीतराग, समबुद्धि योगी ब्रह्मस्वरूपच होतो.

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।**
**ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥२९॥**
**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्याति ।**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥३०॥**

सर्व भूतांना समत्वानें पाहणारा, तो ध्यानयोगानें निग्रहीतचित्त योगी, सर्व भूतमात्रांत आपल्या स्वतःला, आणि आपणा स्वतःतच सर्व भूतमात्र पाहतो. २९ जो मला (ईश्वराला) सर्वांभूतीं पाहतो, आणि सर्व भूतमात्र माझ्यांतच ( ईश्वरांतच ) आहे असें मानतो, त्याला मी कधींहि अंतर देणार नाहीं ( तो माझा प्रिय आहे ), आणि तो माझाच आहे, (म्हणून) त्याचा कधींहि नाश होणार नाहीं. ३०

आपल्या हृदयांत जो ईश्वर आहे, तोच भूतमात्रांत आहे अशी बुद्धि दृढ झाल्यास, भेदभावाला जागाच उरत नाहीं.

**सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥३१॥**
**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥३२॥**

समबुद्धि झालेला जो योगी भूतमात्राचे ठिकाणीं (समत्वानें) मी (ईश्वर) प्रतीत आहे असें अनुभवतो, तो कोणत्याहि स्थितींत असला तरी वस्तुतः माझ्यांतच (ईश्वरस्वरूपच) आहे. ३१ जो समत्वबुद्धीनें सर्व प्राणिमात्राचें सुखदुःख आपल्याच सुखदुःखाप्रमाणें अनुभवतो, हे अर्जुना! तोच सर्वश्रेष्ठ योगी आहे, असें मानतात. ३२

अर्जुन उवाच—

**योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।**
**एतस्याहं न पश्यामि चञ्चलत्वात् स्थितिं स्थिराम् ॥३३॥**
**चञ्चलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद् दृढम् ।**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥३४॥**

अर्जुन म्ह०—देवा मधुसूदना! हा जो साम्यबुद्धियोग तूं मला सांगितलास, तो मनाच्या चांचल्यामुळें चित्तांत स्थिर टिकेल असें मला वाटत नाहीं. ३३ हे श्रीकृष्णा! मन हें अत्यंत अस्थिर, क्षोभशील आणि दांडगें आहे. त्याचे निरोधन म्हणजे केवळ वाऱ्याची मोट बांधण्यासारखेंच अशक्य आहे, असें मला वाटतें. ३४

ध्यानयोगाच्या अभ्यासानें चित्तास स्थैर्य आणि शांति मिळते, आणि योगी परमगतीचा (ब्रह्मनिर्वाणाचा) अधिकारी होतो, असें श्लोक १५ मध्यें सांगून त्यानंतर अशा योग्याचीं लक्षणें, त्यानें पाळावयाचीं पथ्यें इत्यादि सांगून, श्लो. २९ ते ३२ मध्यें योग्यानें सर्वत्र समदर्शन असावें, आणि भूतमात्राचें

सुखदुःख आपलें सुखदुःख करावें असें सांगितलें. ध्यानयोगाच्या अभ्यासानंतर साम्यबुद्धीची आवश्यकता सांगितली. अशी समत्वबुद्धि स्थिर राहणें मनाच्या. चंचल स्वभावामुळें कठीण आहे, असें अर्जुनाचें म्हणणें. हें म्हणणें श्री भगवान् मान्य करतात. परंतु समत्वबुद्धि आवश्यक आहे, हेंही तितकेंच खरें. समत्वबुद्धीशिवाय योग पूर्ण होतच नाहीं.

श्री भगवानुवाच—

**असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।**
**अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥३५॥**
**असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ।**
**वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥३६॥**

श्रीभगवान् म्ह०—हे वीरा अर्जुना! मन हें आवरून धरण्यास कठीण आणि अत्यंत चंचल आहे यांत संशय नाहीं, परंतु, हे कौंतेया! पुनः पुनः प्रयत्न करण्यानें, आणि (दृष्टादृष्ट भोगाविषयीं) अनासक्तीनें तें ताब्यांत ठेवणें शक्य होईल. ३५ मला मान्य आहे कीं, ज्याला आत्मसंयमन करितां येत नाहीं, त्याला योगसिद्धि प्राप्त होणें शक्य नाहीं, परंतु सतत प्रयत्न करणाऱ्या संयमी साधकाला (वर सांगितलेल्या अभ्यास आणि वैराग्य या) उपायांनीं सिद्धि प्राप्त होणे शक्य आहे. ३६

यमनियमादिकांनीं मन आणि इंद्रियांचें दमन करून ध्यानयोगाची तयारी करणें शक्य होईल. परंतु संसारांत अनेक प्रकारच्या लोकांशीं वागण्याचा प्रसंग आल्यावर समत्वबुद्धि ठेवणें सोपें नाहीं. अशी बुद्धि स्थिर राहण्यास विवेक, वैराग्य, आणि सतत अभ्यास पाहिजे. काम, क्रोध, लोभाबरोबरच अहंताममताही गळून जावयास पाहिजे. तरच साम्यबुद्धि टिकून राहील.

अर्जुन उवाच—

**अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चालितमानसः ।**
**अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥३७॥**

**कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।**
**अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥३८॥**
**एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः ।**
**त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ॥३९॥**

श्रद्धा पूर्ण असूनहि, योगसिद्धि प्राप्त होण्यास, ज्याचे प्रयत्न पर्याप्त झालेले नाहींत, किंवा ( मनाच्या चंचलतेमुळें ) ज्याचें चित्त योगापासून चलित झालें आहे, अशा साधकास योगसिद्धि जर झाली नाहीं, तर त्याला पुढें कोणती गति प्राप्त होते? ३७ हे महाबाहो ! तो दोन्ही निष्ठांना मुकून, निराधार आणि ब्रह्मप्राप्तिमार्गांत भग्नाश असा, एखाद्या ढगाच्या तुकड्याप्रमाणें, मधल्यामध्येंच नष्ट होऊन जातो कीं काय? ३८ हे श्रीकृष्णा ! हा माझ्या मनांत उद्भवलेला संशय दूर कर; तुझ्याशिवाय हा संशय दूर करणारा मला अन्य दिसत नाहीं. ३९

वर, मन चंचल आहे म्हणून सांगितलें. चित्त स्थिर ठेवून योगाचा अभ्यास पार पाडावयास पाहिजे. त्यासाठीं यत्नहि पुरेसा झाला पाहिजे. आणि योगसिद्धि प्राप्त होईतों निरामय आयुष्यहि लाभलें पाहिजे. सिद्धि मिळण्यापूर्वीच मरण आलें तर? योगसिद्धि प्राप्त करून घेण्याइतके प्रयत्नहि पार पडूं शकले नाहींत तर? अशा शंका साहजिकच उद्भवणार. कर्मनिष्ठेनें करावयाचीं कर्में सोडून दिल्यास स्वर्गप्राप्तीपासून वंचित व्हावयाचें, आणि योगमार्गाच्या काठिण्यामुळें योगसिद्धीहि प्राप्त व्हावयाची नाहीं, अशा प्रकारें दोन्ही हातचीं जाऊन, केवळ दुर्गतीच प्राप्त व्हावयाची अशी भीति वाटते, म्हणून अर्जुनाचा प्रश्न आहे. छिन्नाभ्र ( लहान ढग ) मोठ्या ढगाच्या आश्रयानें त्यांतच मिळून जाऊन वर्षेल, पण तोंच एकटा एकाकी पडल्यास अंतराळांतच विरून जाणार, तशी स्वर्गहि नाहीं आणि मुक्तीहि नाहीं अशी कदाचित् साधकाची गति होणार. श्रीकृष्णांनीं मनाची चंचलता मान्य केली, आणि अभ्यास आणि वैराग्यानें सिद्धि प्राप्त होणें शक्य आहे म्हणून सांगितलें; परंतु सिद्धि प्राप्त होण्यापूर्वींच मरण आलें, किंवा त्यासाठीं करावयाचे प्रयत्न पुरतेपणीं पार पडले नाहींत तर मग काय?

श्रीभगवानुवाच—

**पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।**
**न हि कल्याणकृत्कश्चिद् दुर्गतिं तात गच्छति ॥४०॥**

हे पार्था ! (अशा योगसाधनेकरितां प्रयत्न करणाऱ्या) साधकाला इहलोकीं किंवा परलोकींहि हानि कधींच होणार नाहीं. अरे बाबा ! सत्कर्म करणाराला वाईट गति कधींच प्राप्त होणार नाहीं. ४०

**प्राप्य पुण्यकृतां लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।**
**शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥४१॥**

योगभ्रष्ट ("योगात् चालित मानसः" असा साधक) पुण्यकर्मे करणारे ज्या लोकांस जातात त्याच लोकांना मरणानंतर जाऊन, तेथें सुचिर वास करून, पुनः (मानवलोकांत) शुद्ध, शीलवान्, आणि संपन्न कुलांत जन्माला येतो. ४१

"योगभ्रष्ट" दोन प्रकारचे सांगितले आहेत. एक, थोडाच अभ्यास झाल्यावर पर्याप्त प्रयत्न होण्यापूर्वींच देह सोडून जाणारा, आणि दुसरा, अभ्यास चांगला होऊनहि सिद्धि प्राप्त होण्यापूर्वींच देह सोडून जाणारा. दोघेहि श्रद्धावान्. या ठिकाणीं पहिल्या प्रकारच्या साधकाची गति सांगितली आहे. त्याचा अभ्यास थोडा असला तरी, केलें तेवढें सत्कारणीं लागून, तो पुण्यलोकालाच (स्वर्गालाच) जाणार. पण ती गति नित्य नाहीं. तो पुनः मनुष्यलोकांत जन्म घेणारच. पूर्वपुण्याईनें तो सत्‌शील आणि सुसंपन्न आईबापांच्या पोटीं जन्म घेतो, आणि पुनः पुण्यमार्गालाच लागतो. एकदा शील शुद्ध झाल्यावर मनुष्य सन्मार्गापासून ढळत नाहीं.

**अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।**
**एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥४२॥**
**तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।**
**यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥४३॥**

किंवा, ( पर्याप्त प्रयत्न झालेला ) आत्मज्ञानी योग्याच्याच कुलांत जन्मास येतो. असा जन्म प्राप्त होणें ( वर वर्णिलेल्या गतीपेक्षां ) अधिक दुर्लभ आहे. ४२ या जन्मांत त्याला पूर्वजन्मीच्या संस्काराच्या योगानें तीच योगबुद्धि प्राप्त होते, आणि तो पुनः पूर्णसिद्धि मिळविण्याचा प्रयत्न करूं लागतो. ४३

**पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।**
**जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥४४॥**
**प्रयात्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।**
**अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥४५॥**

त्याच पूर्वजन्मीच्या योगाभ्यासानें, त्याची इच्छा नसतांहि जणूं काय, तो योगसिद्धीच्या मार्गाकडे आकृष्ट होतो, आणि योगाभ्यासाच्या ज्ञानाचीच उत्कट इच्छा ठेऊन, वेदविहित कर्ममार्गाच्या पलीकडे जातो. ४४ योगी प्रयत्नानें योगसाधना करून, सर्व हीनवासनापासून मुक्त होऊन, अनेक जन्मांत योगसिद्धि झाल्यावरच, नंतर परम पदाला जातो. ४५

ज्याची योगसाधना अपुरी झाली आहे, त्याला पुण्यकुलांत जन्म येतो, पण तो पुनः निक्षून योगसिद्धीच्या मार्गाला लागतोच असें नाहीं. शील-वंताच्या कुलांत जन्म मिळाल्यानें त्याला पुनः सन्मार्गाला लागण्याची परिस्थिति प्राप्त होते, एवढें खरें. परंतु, ज्याचा योगाचा अभ्यास चांगला झाला आहे, तो मात्र त्यामार्गांतच सतत प्रयत्न करीत राहून, अनेक जन्मांच्या साधनेनें परमात्म्याशीं ऐक्य पावतो.

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।**
**कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥४६॥**

(ध्यानयोगाभ्यासानें, वैराग्यानें आणि समत्वबुद्धीनें ब्रह्मस्वरूप झालेला) योगी, खडतर तपश्चर्या करणारापेक्षां, ज्ञान्यापेक्षां देखील, अथवा केवळ कर्माचरण करणारापेक्षांहि श्रेष्ठ मानला आहे, म्हणून, अर्जुना ! तूं योगी हो. ४६

समत्वबुद्धीनें सर्वभूतमात्राकडे पाहणारा, ईश्वरपरायण झालेला योगी सर्वश्रेष्ठ होय. तप, ज्ञान, किंवा विहित कर्मानुष्ठान, या सर्वांपेक्षां योगबुद्धि श्रेष्ठ आहे. तपानें केवळ आत्मशुद्धि होते, पण बुद्धि व्यापक होत नाहीं. तसेंच केवळ सिद्धांतांच्या उहापोहांत गुंतलेल्या ज्ञान्यास आत्मानुभवाशिवाय सिद्धि प्राप्त होत नाहीं. समबुद्धित्वाशिवाय आणि ईश्वरपरायणतेशिवाय केवळ कर्मानुष्ठान तर बंधकारकच होतें. "आत्मौपम्येन सर्वत्र समं" पाहणारा, ईश्वरपरायण योगीच सर्वांत श्रेष्ठ होय यांत शंका नाहीं.

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना ।**
**श्रद्धावान् भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥४७॥**
**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे ध्यानयोगो नाम षष्ठतमोऽध्यायः**

या सर्व योग्यांमध्यें जो पूर्णश्रद्धेनें मला (ईश्वराला) अंतःकरणांत ठेवून, अनन्यभक्तीनें माझा होतो, त्यालाच मी श्रेष्ठ योगी मानतो. ४७

ध्यानयोग, ज्ञानयोग, कर्मयोग हे परमात्म्याशीं एकरूपता मिळविण्याचे मार्ग आहेत. भक्तियोगानें परमेश्वराशीं (परमात्म्याशीं) एकरूपता, तन्मयता, तादात्म्य प्राप्त होतें. हाच भक्तियोग सर्व योगांत श्रेष्ठ योग आहे. "संयोगो योग इत्युक्तो जीवात्मपरमात्मनोः" कर्म, ज्ञान, ध्यान, सर्वात्मबुद्धि, आणि सर्वभूतहितत्वबुद्धि प्राप्त झाल्याशिवाय परमेश्वराशीं तादात्म होणार नाहीं. विश्व हेंच विश्वेश्वराचें व्यक्तरूप, आणि कूटस्थ, अव्यक्त, अक्षर विश्वेश्वर तोच पुरुषोत्तम, परमेश्वर, परमात्मा. त्याच्याशीं तन्मयता, तादात्म्य आणि तद्रूपता झाल्यावरच परमशांति आणि परमगति प्राप्त होते.

---

# अध्याय सातवा

## ज्ञान-विज्ञान योग

श्रीभगवानुवाच

**मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन् मदाश्रयः ।**
**असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥१॥**

श्रीभगवान् म्ह०—हे पार्था ! आपलें चित्त सर्वस्वी मला (ईश्वराला) अर्पण करून, मलाच केवळ अनन्यभावानें शरण येऊन ध्यानयोगाची साधना करतांना, माझें (ईश्वराचें) स्वरूप निश्चितपणे आणि संपूर्णतया कसें जाणावेंस, तें सांगतों ऐक. १

**ज्ञानं तेऽहं सविज्ञानं इदं वक्षाम्यशेषतः ।**
**यज्ज्ञात्वा नेह भूयोन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥२॥**

तुला विज्ञानासह (स्वानुभवयुक्त ज्ञानासह) हें संपूर्ण शास्त्रीयज्ञान सांगतो. हें तुला नीट समजलें म्हणजे पुनः दुसरे जाणण्याजोगें असें कांहींहि उरणार नाहीं. २

हें केवळ दृश्य बाह्य वस्तूंचेंच ज्ञान नाहीं. इंद्रियाना अगोचर, मनाला किंवा बुद्धीलाहि ज्याचें आकलन अशक्य, अशा तत्त्वाचें हें सविज्ञान ज्ञान आहे. बुद्धीनें आणि तर्कानें जाणावयाचें तें जाणल्यावर आत्मचिंतनानें प्रतीत होणारेंहि अध्यात्मज्ञान येथें सांगितलें आहे.

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥३॥**

सहस्रावधि मनुष्यांत योगसिद्धीचा प्रयत्न करणारा एकादा विरळाच असतो, आणि अशा प्रयत्न करणाऱ्या मुमुक्षूंमध्यें क्वचित्‌च एकाद्याला माझें (ईश्वराचें) स्वरूप यथार्थतया कळतें. ३

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।**
**अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥४॥**

पृथिवी, आप, तेज, वायु, आकाश ( हीं पञ्च तन्मात्रें ), आणि मन, बुद्धि, अहंकार (कारणरूप) अशी ही माझी (ईश्वराची) अष्टधा (आठ रूपानें दिसणारी ) प्रकृति (ऐश्वरी मायाशक्ति ) आहे. ४

येथें हीं आठ तत्त्वें अव्यक्त बीजरूप घ्यावयाचीं. पहिलीं चार स्थूलरूपानें प्रतीत होतात, पांचवें आकाश सूक्ष्मरूप आहे. आकाश म्हणजे अवकाश, वस्तुजाताला आधारभूत तत्त्व. कांहीं तत्त्वज्ञानांत चारच तत्त्वें मानलीं आहेत. परंतु आकाश अस्तिरूपानें, आणि सर्वाधार असें आहेच. मूळ अव्यक्तापासून अविद्यासंयुक्त अहंकार, त्यापासून बुद्धि ( महत्तत्त्व ), आणि मन, अशीं हीं तीन मूलतत्त्वें ज्ञानाला आधारभूत आहेत. पांच आधिभौतिक, आणि तीन आध्यात्मिक अशीं हीं आठ तत्त्वें आहेत. सांख्य तत्त्वज्ञानाप्रमाणें चौवीस तत्त्वें आहेत. पञ्चमहाभूतें, पञ्चज्ञानेंद्रियें, पञ्चकर्मेंद्रियें, पञ्चतमान्त्रा, मन, बुद्धि, अहंकार, आणि अव्यक्त, अशीं ही चौवीस.

**अपरेयमितस्त्वन्याम् प्रकृतिं विद्धि मे पराम् ।**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥५॥**

हे महाबाहो ! ही ( अष्टधा प्रकृति ) निकृष्टरूप ( अपरा ) आहे. हिच्यापेक्षां वेगळी, जीवरूपानें प्रतीत होणारी, माझी श्रेष्ठ ( परा ) प्रकृति आहे, हीच सर्व जगताला आधारभूत आहे, हें नीट समज. ५

पुढें क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ, क्षर आणि अक्षर पुरुष, असें भेद सांगितले आहेत, तीच ही ईश्वराची अपरा आणि परा प्रकृति प्राण धारणास निमित्त होणारी ही जीवरूप परा प्रकृति अपरा प्रकृतींत प्रविष्ठ होऊन तिला जगद्रूप करते. जीव चिद्रूप आहे. त्याच्या योगेंच हे सर्व जगत् चालतें. जीव कमीअधिक प्रमाणांत भूतसृष्टींत प्रतीत होतो. तो जडसृष्टींतहि अव्यक्तरूपानें असतोच. तो कोठें नाहीं असें नाहीं. हीच ईश्वरी माया, ईश्वरी शक्ति, योगमाया, जगदाधार आणि जगत्कारण आहे. अपरा आणि परा या दोन प्रकृती वेगळ्या नाहींत, प्रकृति एकच. केवळ तत्त्व समजावून सांगण्यासाठीं वेगळ्या मानल्या आहेत. वेगळ्या मानल्या,

पण एकीशिवाय दुसरीचें अस्तित्व मात्र नाहीं. दृष्टिभेदानें हा वस्तुभेद दाखविला आहे. क्षर-अक्षर पुरुष, आणि क्षेत्र–क्षेत्रज्ञ हे येथें प्रकृतिरूपानें दर्शविले आहेत.

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।**
**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥६॥**
**मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।**
**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥७॥**

ह्या अपरा आणि पराप्रकृतिपासूनच सर्व भूतमात्राची उत्पत्ति आहे, हें जाण. मीच ( ईश्वर ) सर्व जगताच्या उत्पत्तिचें आणि विलयाचें कारण आहे. ६ माझ्या व्यतिरिक्त, हे धनंजया ! कांहींहि नाहीं. हें सर्व जगत्, सूत्रांत मण्याप्रमाणें, माझ्यांतच ओवलेलें आहे. ७

**रसोऽहमप्सु कौंतेय प्रभाऽस्मि शशिसूर्ययोः ।**
**प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥८॥**
**पुण्यो गंधः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।**
**जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥९॥**

जलामध्यें रस मी आहे. चंद्रसूर्यांत प्रकाश मी आहे. सर्व वेदांत ॐकार मी आहे, मी आकाशांत शब्द आहे, पुरुषांत पौरुष मीच आहे. ८ पृथिवींत स्वाभाविक गंध मी आहे, मीच अग्नींत तेज आहे, भूतमात्रांत जीवनतत्त्व, आणि तपस्वीजनांत तपश्चर्या मीच आहे. ९

**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।**
**बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥१०॥**
**बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम् ।**
**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥११॥**

हे पार्था ! सर्व सृष्टपदार्थांचें शाश्वत कारण मीच आहे, असें समज. बुद्धिमतांची बुद्धि, आणि तेजस्विनाचें तेज मीच आहे. १० बलवानांचें, कामना आणि आसक्ति रहित जें बल, तें मीच आहे. धर्माला ( नीति आणि न्यायाला ) अविरोधी जीवांच्या कामनाहि मीच (ईश्वर) आहे. ११

भूतमात्रें ईश्वरांतच उद्भवतात, आणि ईश्वरांतच लय पावतात. तीं ईश्वरांतच आहेत. कोठून येत नाहींत, कोठें जात नाहींत. उत्पत्ति लय अविश्रांत चालू आहेत. ईश्वर भूतांचें बीज, ईश्वर आणि भूतें वेगळीं नाहींत. भूतें केवळ व्यक्तरूप आहेत, पण अव्यक्ताहून वेगळीं नाहींत. तीं अव्यक्तांतच आहेत, पाहणाराचे बुद्धीला तीं व्यक्त होतात एवढेंच. तीं भ्रमानें आहेत असें भासतात, असें नाहीं, "तीं आहेत," त्यांचे रूप मात्र अनित्य आहे. बीजांतच पदार्थांचें अव्यक्त अस्तित्व असतें. व्यक्त अस्तित्व ऐश्वरी योगमायेंत आहे. बुद्धि, तेज, बल हीं सर्व ऐश्वरी शक्तीचीं रूपें आहेत. बलाविषयीं विशेष असें सांगितलें आहे कीं, शुद्धरूप बल तें ईश्वरी बल, इतर बल तें जीवांचें विकृत बल (उच्छृंखलपणा). भोगलालसेपासून, काम, क्रोध, लोभ, आणि मोहापासून उद्भूत होणारा तो आवेश ( दांडगेपणा ), तें शुद्ध बल नाहीं. तें सत्वोद्भूत बल नाहीं. काम हा स्वाभाविक ( धर्म्य ), किंवा वैकारिक ( अधर्म्य ) असा असतो. शुद्ध, सात्विक अनाक्रमक (अहिंसा, सत्य, अस्तेय इत्यादिपासून प्रवृत्त होणारा) काम, ईश्वरी प्रेरणाच आहे, त्यांत वावगें कांहीं नाहीं. तो प्राण्यांचा स्वभावधर्म आहे. परस्वापहरण, परपीडा, हिंसा इत्यादिकांनीं कलंकित काम ईश्वरी प्रेरणा नाहीं, तीं जीवांची विकृत भावना आहे.

**ये चैव सात्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।**
**मत्त एवेति तान् विद्धि नत्वहं तेषु ते मयि ॥१२॥**

हे जे सात्विक, तसेच राजस आणि तामस सृष्ट पदार्थ ( जड, अजड ) आहेत, ते माझ्यापासूनच झाले आहेत, हें समज. मी त्यांत नाहीं, ते माझ्यांत आहेत.

" मत्स्थानि सर्व भूतानि न चाहं तेष्ववस्थितः ", प्रकृति ईश्वरी शक्तीचा आविष्कार आहे, म्हणून या त्रिगुणापासून उत्पन्न होणारे भाव ईश्वरांतच आहेत. परंतु त्या भावांत शुद्ध ईश्वरस्वरूप दिसणार नाहीं. ते विकारसंभव आहेत. ईश्वरस्वरूप निर्विकार शुद्ध असें आहे. ती ऐश्वरी योगमायाच सात्विकादि भावांना आधारभत आहे, पण त्या भावांत खरें ईश्वरस्वरूप दिसत नाहीं.

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।**
**मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥१३॥**

या तीन गुणविकारांनीं ( रागद्वेषमोहादि भावांनीं ), भ्रांत झालेलें जगत् या भावांच्या पलीकडील,(त्यांत व्यक्त न होणाऱ्या) विकारातीताला, मला (ईश्वराला) यथार्थतेनें जाणीत नाहीं. १३

" विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान्." सृष्टींतील विविधता आणि विकृतता त्रिगुणांपासून झालेली आहे तसेंच राग, द्वेष, मोहादि विकारहि त्रिगुणोद्भवच आहेत. या विकारांनीं ज्ञानाला झांकून टाकलें आहे, म्हणून त्यांत अव्यक्त रूपानें असणारा ईश्वर जीवाला दिसत नाहीं.

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥१४॥**

कारण माझी ही त्रिगुणात्मक ऐश्वरी अनिर्वचनीय माया ( शक्ति ) सर्वस्वी अनुल्लंघनीय आहे. मला शरण येतील तेच हिला तरून जातील.१४

हा विश्वाचा विस्तार जिच्यायोगें झाला आहे ती ही ईश्वरी माया. जीवाची उत्पत्तीहि याच मायेनें झाली आहे. हिला अघटितघटनापटीयसी म्हणतात. सर्व सृष्टि हिच्याच प्रभावानें होऊन, हिच्यांतच असल्यामुळें, हिच्या पलीकडे कोणत्याहि जीवास जाणें शक्य नाहीं. ईश्वराला अनन्यभावानें शरण गेल्यास हिच्यापासून सुटका होईल.

**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः ।**
**माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥१५॥**

( परंतु ) पापी, मूर्ख, हीनवृत्तीचे लोक, ज्यांची विवेकबुद्धि या मायेनें ( तिच्यांत गुरफटून गेल्यानें ) विकृत झाली आहे, असे आसुरी स्वभावाचे पुरुष मला शरण येत नाहींत. १५

**चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।**
**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥१६॥**

हे भरत श्रेष्ठा ! अर्जुना ! माझा आश्रय घेणारे चार प्रकारचे पुण्यवान् पुरुष आहेत. एक पीडित, दुसरा ज्ञानार्थी, तिसरा इष्टकामेच्छु, आणि चौथा ज्ञानवान्. १६

मूर्ख किंवा उन्मत्त जन परमेश्वराला विसरतात. परंतु शारीर किंवा मानसिक व्यथेनें पीडित मनुष्याला ईश्वराची आठवण होते. त्याचप्रमाणें ईश्वराविषयीं ज्ञानाची लालसा ज्याचें मनांत उत्पन्न झाली आहे, त्याचेंहि मन ईश्वरसेवेकडे वळतें. एकादी विशिष्ट कामना मनांत धरून, ती सहजसाध्य उपायांनीं साध्य होणारी नसल्यास मनुष्य ईश्वरालाच शरण जातो, तसेंच ईश्वराविषयीं ज्याला यथार्थ ज्ञान झाले आहे, असा भक्त तर ईश्वराचाच आश्रय घेतो.

**तेषां ज्ञानी नित्ययुक्तो एकभक्तिर्विशिष्यते ।**
**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥१७॥**

या चौघांपैकीं, सर्वदा मत्पर असणारा अनन्यभक्त ज्ञानी सर्वांत श्रेष्ठ आहे. ज्ञानवंताला मी अत्यंत प्रिय आहे, आणि मलाहि तो ज्ञानी अत्यंत प्रिय आहे. १७

**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वामैव मे मतम् ।**
**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥१८॥**

हे सर्वच भक्त श्रेष्ठ पुरुष आहेत, पण त्यांतच ज्ञानी भक्त माझा जीव की प्राण आहे, असें मी मानतो. कारण अनन्यभावानें मत्पर होऊन तो अत्युत्तम अशा माझ्या परम पदाला मिळण्यास निघालेला असतो. १८

सर्वच भक्त सत्प्रवृत्त, पण ज्याचें सर्वस्व ईश्वर भक्ति, ज्याला त्याशिवाय दुसरें कांहींहि प्रिय नाहीं, तो ईश्वराला साहजिकच अत्यंत प्रिय आहे.

**बहुनां जन्मनामन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते ।**
**वासुदेवः सर्वामिति स महात्मा सुदुर्लभः ॥१९॥**

ज्ञानी पुरुष अनेक जन्मांच्या साधनेनंतरच, आपलें सर्वस्व केवळ एक वासुदेव, अशा भावनेनें (अनन्य भावानें), मला (ईश्वराला) येऊन पोहचतो. असा महापुरुष सहज (सर्वत्र) मिळत नाहीं. १९

या अध्यायांत श्लो. ३ मध्यें, आणि अध्याय ६ श्लो. ४५ मध्यें, ईश्वरप्राप्ति अनेक जन्मांच्या साधनेनंतरच होते असें सांगितलें आहे. येथें सगुणभक्ति ( वासुदेवभक्ति ) सांगितली आहे. अध्याय ६ मध्यें योगाभ्यासानें सिद्धि सांगितली आहे. दोन्ही एकच. अध्याय १२ मध्यें सगुण निर्गुण दोन्ही भक्ती एकाच पदाला नेतात म्हटलें आहे. अनन्य भक्ति, अनासक्तवृत्ति, समत्वबुद्धि हींच परमगतीला ( मुक्तीला ) नेणारीं आहेत.

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः ।**
**तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियता स्वया ॥२०॥**

अनेक कामनांनीं विमूढचित्त झालेले, त्या त्या ( विशिष्ट ) उपासना मार्गांचा अवलंब करून, आपापल्या स्वभावगुणांनीं बद्ध झालेले मूढजन, दुसऱ्या ( गौण ) देवतांना शरण जातात. २०

धन, मान, संसारसुख, किंबहुना दुसऱ्या हीन वासनांनींहि प्रेरित होऊन आर्त, अर्थार्थी, असे लोक त्या त्या कामना तृप्त करणाऱ्या देवतांची उपासना करतात, आणि त्याला अनुरूपच त्यांच्या उपासनेचे विधीहि असतात.

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।**
**तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥२१॥**
**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते ।**
**लभते च ततः कामान् मयैव विहितान् हि तान् ॥२२॥**
**अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।**
**देवान् देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि ॥२३॥**

जो भक्त ज्या देवतेची श्रद्धेनें उपासना करण्याची इच्छा करतो, त्याची ती अढळ श्रद्धा मी तशीच त्या देवतेच्या ठिकाणीं स्थिर करतो. २१ भक्त, त्याच श्रद्धेनें युक्त होऊन, त्या देवतेला प्रसन्न करून घेण्यास झटतो, आणि त्याच्या कामना त्या देवतेच्या प्रसादानें तृप्तहि होतात, कारण मीच त्या पूर्ण करतो. २२ परंतु अशा मदबुद्धिजनांच्या तशा उपासनेचें फल अनित्य असतें. देवतांचे उपासक त्या देवतांनाच पोहचतात, माझे (परमेश्वराचे) उपासक माझ्या परमपदाला पोहचतात. २३

प्रत्येक मनुष्याची उपास्य देवता त्याच्या स्वभावप्रमाणें असते. गंध-पुष्पादिकांनीं देवतांचें पूजन हि वस्तुतः अंतःकरणानें आपल्या हृदयांतील देवतेचेंच पूजन होत असतें. जसा भाव तसा देव. आपणच आपल्या इच्छा-आकांक्षाप्रमाणें आपला देव उभा करतो. आपण आपल्याच भावनांची उपासना करीत असतो, आणि श्रद्धेप्रमाणें फळहि आपणास मिळतें. त्या अंतःकरणांतील देवतेपासूनच प्रेरणा मिळते, आणि त्याप्रमाणें हातून कर्म घडून, भावनेच्या उत्कटतेप्रमाणें फळहि मिळतें. जशी भावना संकुचित, किंवा मोठी त्याप्रमाणें देवहि लहान किंवा मोठा. सर्वांतर्यामीं तो परमेश्वर सर्वांच्या हृदयांत सारखाच आहे. पण मूर्ख माणसाला हें कळत नाहीं, आणि त्याच अंतरात्म्याला हीनत्वानें कल्पून, तो हीन फळाची कामना मनांत ठेवितो, आणि तदनुरूपच वागतो. मग फळ मिळतें, तेंहि अर्थात हीनच. फलदाता मात्र एकच, सर्वांतर्यामी सर्वसाक्षी परमात्मा. जसें मागावें, तसें तो देतो.

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः ।**
**परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ॥२४॥**
**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥२५॥**

माझें शाश्वत सर्वोत्तम परमात्मस्वरूप ज्यांना कळत नाहीं ते अज्ञ जन, इंद्रियांना अगोचर (अव्यक्त) अशा मला इंद्रियगोचर (व्यक्त) झालेला मानतात. २४ माझ्या योगमायेनें झांकलेलें माझें स्वरूप सर्वांना सहजगम्य नाहीं. माझ्या मायेनें मोहित झालेले अज्ञ जन मी अजन्मा (अनादि) आणि शाश्वत आहे, हें ओळखीत नाहींत. २५

अज्ञ जन या शरीरालाच आत्मा मानतात. खरा अंतरात्मा (अंतर्यामी) शरीराहून अगदीं वेगळा आहे. हें त्यांना कळत नाहीं. सर्वांतर्यामी परमात्मा अव्यक्त (इंद्रियें, मन, बुद्धि यांना अगोचर) आहे. हें त्यांना कळत नसल्या-मुळें, परमेश्वर स्वरूपाचें खरें ज्ञान त्यांना होत नाहीं.

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥२६॥**

मला ( सर्वांतर्यामीला ) होऊन गेलेली, सध्यां असलेली, आणि पुढें होणारीहि सर्व भूतसृष्टि ज्ञात आहे; पण अर्जुना ! मी मात्र कोणालाहि ज्ञात नाहीं. २६

तो " भूतादि " आहे, " अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः " असा तो परमात्मा अनादि (ज्याच्यापूर्वी कोणीहि आणि कांहींहि नव्हतें असा) आहे. तो अनंतहि आहे. म्हणून भूत, वर्तमान, भविष्य सर्वच त्याला ज्ञात आहे. सर्वांच्या हृदयांत वास करणारा, अंतरात्माहि त्याचाच अंश असल्यानें ( त्याच्याहून वेगळा नसल्यानें ), त्यालाहि सर्व काहि ज्ञात आहे.

**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।**
**सर्वभूतानि संमोहं सर्गे यान्ति परंतप ॥२७॥**

इच्छा आणि द्वेष ( हें हवें, तें नको ) यापासून उद्भवणाऱ्या द्वंद्वांच्या भ्रमानें, हे भारता ! प्राणिमात्र उत्पत्तिकाळींच, हे शत्रुनाशना ! अज्ञानावृत होतात. २७.

मातेच्या उदरांतून बाहेर पडल्यापासूनच प्राण्याला, हें हवें–हें नको, सुख-दुःख इत्यादि द्वंद्वाची जाणीव होऊं लागते. मातेच्या उदरांत तो एकाकी असतो. ज्ञान–अज्ञान द्वैताशिवाय नाहीं. ती द्वैताची जाणीव जन्मतःच सुरू होते. " मी " ही भावना झाल्यावरच, " माझें -माझें नाहीं " हें हळू हळू कळूं लागतें. हाच संमोह, हाच सम्यक् ज्ञानाच्या आड येतो.

**येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।**
**ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः ॥२८॥**

परंतु, ज्या पुण्याचारनिरत पुरुषांच्या अज्ञानाचा ( पापाचा ) क्षय झाला आहे, ते या द्वंद्वोत्पन्न ( इच्छाद्वेषादि ) अज्ञानापासून विमुक्त होऊन, अढळनिष्ठेनें ( मत्पर होऊन ) मद्भक्त होतात. २८

येथें भेदबुद्धि आणि द्वंद्वभाव हें पाप, आणि समत्वबुद्धि हेंच पुण्यकर्म म्हटलें आहे. समत्वबुद्धीनेंच बुद्धि स्थिर होऊन, ईश्वरस्वरूपाचा खरा साक्षात्कार होऊं शकतो.

**जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये ।**
**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नं अध्यात्मं कर्म चाखिलम् ॥२९॥**
**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।**
**प्रयाणकालेऽपि च ते मां विदुर्युक्तचेतसः ॥३०॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः**

जे ( मद्भक्त ) मत्पर होऊन, जरा आणि मरणापासून मुक्त होण्यासाठीं योगसाधना करतात, त्यांनाच त्या परब्रह्माचें, पूर्ण अध्यात्माचें, आणि सर्व कर्मविधानांचें ज्ञान होतें. २९ जे ( मद्भक्त ) मला अधिभूतासह, अधिदैवासह, आणि अधियज्ञासह जाणतात, त्या युक्तचित्त आत्मज्ञान्यानां देहावसानकालीहि माझें सम्यक्ज्ञान ( यथार्थ दर्शन ) होतें. ३०

मागच्या अध्यायांत ध्यानयोग सांगितला. या अध्यायांत विज्ञानासह ज्ञान सांगण्यास प्रारंभ केला. या अध्यायांत अपरा आणि परा प्रकृती, ईश्वराचें सूत्रात्मत्व, सृष्टीचा बीजभाव, त्रैगुण्य, भक्तांचे चार प्रकार, ज्ञानाचें श्रेष्ठत्व, ऐश्वरी योगमाया, ईश्वराचें अनाद्यनंतत्त्व, आणि ज्ञानाची द्वंद्वातीतता, इतके विषय आले. आतां पुढील अध्यायांत परब्रह्म, अध्यात्म, कर्म, अधिभूत, अधिदैव, अधियज्ञ, आणि योग्याची अंतकाली गति या सप्तप्रश्नांचें विवेचन केलें आहे.



# अध्याय आठवा

## अक्षरब्रह्म योग

अर्जुन उवाच--

**किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम ।**
**अधिभूतं च किं प्रोक्तं अधिदैवं किमुच्यते ॥ १ ॥**
**अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन् मधुसूदन ।**
**प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥ २ ॥**

हे पुरुषोत्तमा ! तें ब्रह्म म्हणजे काय ? अध्यात्म काय ? कर्म म्हणजे काय ? अधिभूत कशाला म्हणतात ? अधिदैव म्हणजे काय ? हे मधुसूदना! या मानव देहांत अधियज्ञ कोण, आणि कसा आहे ? आत्मसंयमी योग्यांनीं अंतकाळीं तुझें कसें ध्यान करावें ( तुला कोणत्या स्वरूपांत जाणावें ) ?

श्रीभगवानुवाच—

**अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।**
**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥३॥**
**अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् ।**
**अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृताम् वर ॥४॥**
**अंतकाले च मामेव स्मरन् मुक्त्वा कलेवरम् ।**
**यः प्रयाति स मत्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥५॥**

परम अक्षर ( परमात्मा ) म्हणजें तें ब्रह्म. परमात्म्याचा ( वेगळाल्या देहांत पृथक्त्वानें ) आत्मभाव म्हणजे स्वभाव, त्यालाच अध्यात्म म्हणतात, आणि भूतमात्राच्या उत्पत्तिस्थितीला कारण जो विसर्ग

( यज्ञ ) त्यालाच कर्म म्हणतात. ३ अनित्य ( क्षर ) सृष्टपदार्थ म्हणजे अधिभूत, ( प्राणिमात्राच्या इंद्रियादिकांना चालना देणारा ) पुरुष म्हणजे अधिदैवत, हे नरश्रेष्ठा ! या प्राणिमात्राच्या देहांत ( धारण-पोषणचालनादि कर्मांचा ) अधिष्ठाता मीच ( माझा अंशच ) तो अधियज्ञ, ४ अंतकाळींहि अनन्य भावानें केवळ माझेंच ध्यान करून ( केवळ माझेंच स्मरण राहून ) जो पुरुष देह सोडून जातो तो मत्स्वरूपच होतो, यांत संशय नाहीं. ५

"अक्षरं ब्रह्मं" याचा अर्थ ॐकार असा करतात तो बरोबर नाहीं. येथें "तें ब्रम्ह" म्हणजे काय ? तर "परं अक्षरं" असें सांगितलें आहे. पर-ब्रम्हाचा आविष्कार ( स्वो भावः ) स्वभाव, तें अध्यात्म ( ब्रम्हाचा प्रत्येक देहांत प्रत्यगात्मभाव ). विसर्ग म्हणजे सृष्टिव्यापार, हा यज्ञ आणि कर्मानें कसा सिद्ध होतो, हें अ. ३ श्लो. १४ मध्यें दाखविलें आहे. कर्म म्हणजे विसर्ग ( सृष्टीची उत्पत्ति आणि स्थिति ). क्षर ( अनित्य ) भाव ( अपरा प्रकृति ) सर्व भूतमात्रांत अधिष्ठित ( अधिभूत ) आहे. पुरुष ( अधिदैवत ) सर्व इंद्रियादिकांच्या शक्तींत अधिष्ठित आहे, आणि परमात्मा ( अधियज्ञ ) सर्व कायिक, वाचिक, मानसिक व्यापारांचा अधिष्ठाता आहे. ब्रह्म ( परमं अक्षरं )--अधियज्ञ ( ईश्वर )–अध्यात्म ( प्रत्यगात्मभाव )–अधिदैव ( इंद्रियांची आणि मनाची व्यापारशक्ति )–अधिभूत ( क्षरसृष्टि ) असा हा क्रम आहे. अध्यात्मांत ( प्रत्यगात्मभावांतच ) कर्मांची उत्पत्ति आहे.' याप्रमाणें परब्रह्मा-पासून भूतसृष्टिपावेतों सर्वांचा विचार आहे. परमात्मा विश्वांत कसा ओतप्रोत आहे, हें स्पष्टपणें दाखविलें आहे. हें नीट समजून, जो ईश्वरार्पण बुद्धीनें कर्मा-चरण करील, त्याला अंतीं त्याच्या श्रद्धेप्रमाणें, आणि भक्तीप्रमाणें सद्गति मिळेल हें उघड आहे.

**यं यं वाऽपि स्मरन् भावम् त्यजत्यन्ते कलेवरम् ।**
**तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः ॥६॥**

अंतकाळीं जो आशय ( किंवा अभिप्राय ) मनांत धारण करून पुरुष देहत्याग करतो, हें कौंतेया ! तो त्याच मनोवृत्तीला सतत वश झालेला असल्यामुळें, तदनुरूपच त्याला गति प्राप्त होते. ६

मनुष्य आयुष्यभर आपल्या स्वभावास अनुसरून, आणि परिस्थित्यनुरूप, सारखा बदलत असतो. तो स्वतःला उच्चश्रेणीला किंवा खालच्याहि श्रेणीला नेऊं शकतो. स्वभावाप्रमाणें आणि परिस्थितीनेंहि त्याची श्रद्धाहि बदलत राहते. " उद्धरेदात्मनात्मानं," जीव स्वतंत्र आहे, अज्ञानानें तो आपणास बद्ध मानतो. " अन्ते मतिः सा गतिः, " ही मति केवळ अंतःकाळच्या क्षणाची नव्हे. त्यावेळीं क्लेश होतील, ईश्वराचें विस्मरणहि कदाचित होईल, पण त्यावेळीं जसा " स्वभाव " बनलेला असेल, जशी श्रद्धा असेल, भक्ति असेल, तशीच गति मिळेल. मनुष्याला मरणापूर्वी शारीर क्लेश झाले तरी, जीवाचे उत्क्रांतीपूर्वीच हे सर्व संपतात. देह सोडण्यापूर्वी जीव देहासंबंधीं उदासीन होतो, आणि तेव्हां तो केवळ "स्वभाव" रूपच असतो. त्यावेळीं तो आपली गति निश्चित करतो. या आयुष्यांतील सर्व संस्कार, त्याचें सर्व कर्म, त्यावेळीं त्याचेपुढें उभें राहतें, आणि हें कर्म त्याला पुढील मार्गावर घेऊन जातें.

**तस्मात् सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयः ॥७॥**

म्हणून कोणत्याहि परिस्थितींत मला विसंबू नकोस, आणि मग युद्धहि कर; मन आणि बुद्धि पूर्णत्वानें मला अर्पण केल्यावर सर्वसंशयातीत होऊन तूं मत्स्वरूपच होशील. ७

मला सर्वस्व अर्पण करून, क्षणभरहि माझें अधिष्ठान मनांतून हलूं न देतां वागत राहिलास, आणि मग युद्ध केलेंस तरी प्रत्यवाय नाहीं. ' संशयात्मा विनश्यति,' मनातून सर्व संशय काढून टाक, हें अध्याय ४ श्लोक ४०–४२ मध्यें सांगितलें आहे. सर्व कर्मांत श्रीभगवंताचें अधिष्ठान पाहिजे, म्हणजेच अंतीं सद्गति मिळेल यांत संशय नाहीं.

**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।**
**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिंतयन् ॥८॥**
**कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।**
**सर्वस्य धातारमचिन्त्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥९॥**

**प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।**
**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥१०॥**

सतत परमात्मस्वरूपाचे ठिकाणीं अनन्य भावानें केंद्रित केलेल्या, यत्किंचितहि त्या स्वरूपापासून विचलित न होणाऱ्या अशा अंतःकरणानें, हे पार्था ! केवळ त्याचेंच चिन्तन करीत राहिल्यानें, भक्त त्या दैदीप्यमान पुरुषोत्तमाच्या पदाला पोहचतो. ८ त्या ज्ञानघन, शाश्वत, अगदीं सूक्ष्माहूनहि सूक्ष्म सत्वांत वास करणाऱ्या, सर्व सृष्टमात्रांचें पालन करणाऱ्या, ज्याचें स्वरूप चिन्तनास अत्यंत कठिण अशा, आदित्याप्रमाणें दैदीप्यमान, सर्व मोहांधकाराच्या पलीकडे अशा परमेश्वराचें सतत ध्यान, ९ जो अंतकाळीं स्थिर अंतःकरणानें, भक्तियुक्त होऊन, अनन्यभावानें, विधियुक्त प्रकारें भ्रूमध्यांत प्राण एकवटून करील, तो त्या दैदीप्यमान पुरुषोत्तमाच्या स्वरूपांतच विलीन होईल. १०

" प्रयाणकालेच कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः " या प्रश्नाचें येथें उत्तर आहे. " तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि धियो यो नः प्रचोदयात् " या गायत्री मंत्रांत सांगितलेल्या " आदित्यवर्णं तमसः परस्तात् " आदित्य-मंडलांतील परम पुरुषाचें हें ध्यान आहे. ध्यानयोगाच्या विधीनें हें ध्यान करावयाचें. विश्वरूप विश्वेश्वर विश्वाला व्यापून " अत्यतिष्ठत् दशांगुलम् " असा आहे. त्याचप्रमाणें, कल्पनेनें जें अत्यंत सूक्ष्मांत सूक्ष्म कल्पितां येईल, त्यांतहि तो वास करीत आहे. तो परमात्मा केवल शुद्ध भर्ग (परम तेज) आहे. तेथें तमाची कल्पनाहि करतां येणार नाहीं. भ्रूमध्यांत प्राण एकवटून ध्यानाची प्रक्रिया, राजयोगाची सांगितली आहे. ही सतत दीर्घ अभ्यासानें, यम-नियमादिकांनीं, शुद्ध आणि युक्त अशा योग्यालाच प्रयाणकालीं साधणें शक्य आहे.

**यदक्षरं वेदविदो वदन्ति विशन्ति यद्यतयो वीतरागाः ।**
**यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥११**

ज्या पदाला वेदवेदांततत्त्वज्ञ ( परम ) अक्षर असें म्हणतात, विवेक-वैराग्यसंपन्न योगी ज्या पदाशीं एकरूप होऊन जातात, आणि जें प्राप्त करून घेण्यासाठीं ब्रह्मचर्याची साधना करतात, तें ( परम ) पद तुला आतां थोडक्यांत सांगतो. ११

वर " अक्षरं ब्रह्म परमं " सांगितलें आहे, त्याच पदाचें " अक्षरात्परतः परः " असेंहि वर्णन आहे. केवळ शब्दांनीं त्याचें वर्णन होऊं शकत नाहीं. तें योग्यांनाच ध्यानगम्य आहे. आतां परब्रह्माच्या प्रतीक रूप प्रणवाच्या म्हणजे ॐकाराच्या उपासनेचें विधान सांगतात.

**सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ।**
**मूर्ध्न्याधायात्मनः प्राणं आस्थितो योगधारणाम् ॥१२॥**
**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।**
**यः प्रयाति त्यजन् देहं स याति परमां गतिम् ॥१३॥**

नवद्वारांचें निरोधन करून, मन हृदयाकाशांत स्थिर करून, आपले प्राण ब्रह्मरंध्रांत एकवटून, योगसमाधींत स्थिर झालेला ( योगी ), १२ ॐ ह्या एकाक्षर ब्रह्माचा उच्चार करून, जो माझें स्मरण करून देहत्याग करतो, त्याला परमगति प्राप्त होते. १३

प्रणवोपासना करणारा योगी अंतकाळीं परमात्म्याचें स्मरण करून, ॐकाराचा उच्चार करून देहत्याग करून गेला म्हणजे त्याला परम गति (ब्रह्मलोक) प्राप्त होते. या उपासनामार्गापेक्षां ज्ञानमार्ग वेगळा आहे. उपासना-मार्गानें ( प्रणवोपासनेनें ) ब्रह्मलोक प्राप्ति होते, परंतु केवळ ज्ञानानेंच मोक्षप्राप्ति होते. "ज्ञानादेव तु कैवल्यम्." उपासनेनें मरणोत्तर सद्गति (ब्रह्मलोक) मिळते, ज्ञानानें याच देहीं मुक्ति मिळते. ज्ञानी जीवन्मुक्त होतो.

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥१४॥**
**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।**
**नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥१५॥**

जो अनन्यभावानें, अविरतपणें, आणि सदासर्वकाळ माझेंच स्मरण करतो, त्या सदासमाहितचित्त योग्याला, हे पार्था ! मी अनायासानेंच प्राप्त आहें १४ माझ्या पदाला एकदां आल्यावर हा अनित्य दुःखपूर्ण जन्म त्या परमसिद्धि ( मोक्ष ) प्राप्त झालेल्या यतींना पुनः घ्यावा लागत नाहीं. १५.

शुद्ध बुद्ध परमात्मा जो सर्वांतर्यामी, सर्वसाक्षी, सर्वात्मा असा आहे, त्याचें स्मरण सर्वावस्थांत अनन्यभावानें करणाऱ्या योगी भक्तास तो सदा सन्निधच आहे. तादात्म्य आणि तन्मयता हीच उपासना, हेंच कैवल्य. अशी परमात्म्याशीं एकात्मता झाल्यावर हा दुःखमय संसार आपोआपच गळून पडेल. परमात्म्याशीं तादात्म्य पावलेल्या महात्म्यांची तीच परमसिद्धि, आणि तीच परमोच्च गति.

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।**
**मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥१६॥**

ब्रह्मलोकासह यच्चावत् सर्व लोकांपासून, हे कौंतेया ! पुनरागमन आहे. माझें पद प्राप्त झाल्यावर मात्र पुनर्जन्म ( पुनरावृत्ति ) नाहीं. १६

यज्ञादि कर्माचें फल स्वर्ग म्हणून सांगितलें आहे. परंतु तेथून पुनरावर्तनहि स्पष्ट सांगितलें आहे. विहितकर्म ज्ञानपूर्वक केल्यास, आणि प्रणवोपासनेनेंहि, ब्रह्मलोक प्राप्ति होईल. पण तेथूनहि पुनरावर्तन आहेच. परंतु वर सांगितल्याप्रमाणें परमात्मस्वरूपाशीं एकरूप झालेल्या ज्ञानी भक्तास पुनरावर्तन नाहीं. कारण त्याला या देहींच मोक्ष मिळालेला असतो. असा ज्ञानी भक्त जीवन्मुक्तच असल्यानें पुनरावर्तनाचें त्याला भयच नाहीं.

**सहस्रयुगपर्यंतं अहर्यद्ब्रह्मणो विदुः ।**
**रात्रिं युगसहस्रांतां तेऽहोरात्रविदो जनाः ॥१७॥**
**अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे ।**
**रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञिके ॥१८॥**
**भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।**
**रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥१९॥**

अहोरात्रविद्, म्हणजे सृष्टीची कालगणना जाणणारे विद्वान्, जो ब्रह्मदेवाचा सहस्रयुगांचा दिवस आणि जी सहस्रयुगांची रात्र आहे असें जाणतात, १७ त्या (ब्रह्मदेवाच्या) दिवसाच्या आरंभास अव्यक्तांतून व्यक्तजात (सर्वसृष्टि) बाहेर पडते, आणि रात्र होतांच ज्यास अव्यक्त म्हणतात त्यामध्येंच हें (सर्व सृष्टजात) लय पावतें. १८ (याप्रमाणें) तोच तो भूतविस्तार पुनः पुनः आविर्भूत होऊन रात्रीं लय पावतो, आणि पुनः विवश असा (अनिवार्य नियतीनें) दिवसा पुनः प्रादुर्भूत होतो. १९

जर प्रत्येक सृष्टपदार्थ अव्यक्त ब्रह्मांतूनच व्यक्त होतो, तर मग ही भिन्नता कोठून उत्पन्न झाली? उच्चनीच भाव, बरें–वाईट, सुखदुःख, हीं कशीं होतात? या प्रश्नास उत्तर म्हणून ही कल्पना आहे कीं, पूर्वीप्रमाणेंच पुनः सर्व कांहीं आविर्भूत होतें. "धाता यथापूर्वमकल्पयत्" याचा असा अर्थ केला जातो. पण हें सर्व कांहीं असेंच अनादि आणि अनंत आहे असें मानूनहि या प्रश्नाचें उत्तर देतां येईल हा केवळ श्रद्धेचा विषय आहे.

**परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।**
**यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥२०॥**

या (वर सांगितलेल्या) अव्यक्त भावापलीकडे असा (एकमेव) शाश्वत अव्यक्त भाव आहे कीं, जो हें सर्व भूतजात नष्ट झालें तरी, स्वतः नष्ट होत नाहीं. २०

परब्रह्म, पुरुषोत्तम, परमात्मा, शुद्ध, शून्य, शांत, अनंत, स्थिर, शाश्वत, अव्यक्त, अव्यय, "स्वतंत्रः स्वे महिम्नि तिष्ठति" असा आहे. हिरण्यगर्भहि अव्यक्त आहे, परंतु त्यापासून भूतांची अभिव्यक्ति होते. सत्तत्व एकच एक आहे, तें जाणून घेणाऱ्याच्या बुद्धीला वेगळेपणानें भासतें. "पुरुष एवेदं सर्वं यद्भूतं यच्च भव्यं." "स भूमिं विश्वतो वृत्त्वा अत्यतिष्ठत् दशांगुलम्" अशीं त्याच एका परमतत्त्वाचीं दोन रूपें सांगितलीं आहेत.

**अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।**
**यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥२१॥**

ह्याच ( परम ) अव्यक्ताला अक्षर ( अक्षरं ब्रह्म परमं ) असें म्हणतात. ह्यालाच ती परम (अनुत्तम) गति ( पद ) म्हणतात, कीं जेथें पोंहचल्यावर पुनरावृत्ति नाहीं; तेंच माझें ( परमात्म्याचें ) परम पद. २१

" श्लो. १३ मध्यें सांगितलेलें परमपद, आणि श्लो. १८ मधील अव्यक्त, या दोहोच्याहि पलीकडे " परम् अव्यक्तं " " अक्षरं ब्रह्म परमं " तें परमात्म्याचें परम धाम आहे. अवर अव्यक्त, हिरण्यगर्भ, ब्रह्मलोक; तेथें पोहचलेल्यांना ब्रह्मदेवाच्या दिवसाबरोबर पुनरावृत्ति आहे. परंतु जे या पदाच्याहि पलीकडे गेले, म्हणजे जे जीवन्मुक्त झाले, त्यांना पुनरावृत्ति साहजिकच नाहीं.

**पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।**
**यस्यांतस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥२२॥**

हे पार्था ! ज्या परमात्म्याच्या अंतर्गत सर्व भूतजात आहे, आणि ज्याच्या ऐश्वर्यानें हें अखिल विश्व व्यापलें आहे, तो परम पुरुष (पुरुषोत्तम) केवळ एका अनन्य भक्तीनेंच मिळणें शक्य आहे. २२

त्या अव्यक्त, अक्षर, परमपुरुष, पुरुषोत्तम परमात्म्याचें परमधाम प्राप्त करून घेण्याचा एकच उपाय आहे, आणि तो अनन्य भक्ति. " नायमात्मा प्रवचनेन लभ्यः न मेधया न बहुना श्रुतेन । यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम् " ( मुडकोपनिषत् ३–३ ). तो परमात्मा केवळ एकच एक आहे. हे सर्व जें कांहीं व्यक्ताव्यक्त आहे तें त्याहून वेगळें नाहीं, सर्व कांहीं तोच तो आहे, त्याच्याशिवाय दुसरें कांहींहि नाहीं.

**यत्र काले त्वनावृत्तिं आवृत्तिं चैव योगिनः ।**
**प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥२३॥**
**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।**
**तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥२४॥**
**धुमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।**
**तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥२५॥**
**शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते ।**
**एकया यात्यनावृत्तिं अन्ययाऽऽवर्तते पुनः ॥२६॥**

( आतां ) ज्या कालीं देह सोडून जाणारे योगी अपुनर्जन्मगतीस (ब्रह्मलोकास ) किंवा पुनर्जन्मगतीस ( स्वर्गलोकास किंवा पितृलोकास ) जातात तो काल, हे भारता ! मी तुला सांगतों. २३ अग्नि, ज्योति, दिवस, शुक्लपक्ष, उत्तरायणाचे सहामास ह्या कालीं देह सोडून जाणारे ब्रह्मवित् ( ज्ञानयोगी ) ब्रह्मलोकालाच जातात. २४ धूम, रात्र, कृष्णपक्ष, दक्षिणायनाचे सहामास या कालांत देह सोडून जाणारे योगी ( कर्ममार्गी ) चांद्रमस ज्योतीला ( पितृयाणानें स्वर्गाला, किंवा पितृलोकाला ) पोहचून ( पुण्यक्षय झाल्यावर ) मृत्युलोकाला परत येतात. २५ अशा या शुक्ल आणि कृष्ण दोन गती जगतांत (ज्ञानयोग्यांना आणि कर्ममार्गी योग्यांना) अटळच आहेत. एकीनें अपुनर्जन्मगति आणि दुसरीनें पुनर्जन्मगति प्राप्त होते. २६

बृहदारण्यकोपनिषदांत ह्या दोन गती सांगितल्या आहेत. एकास अर्चिमार्ग, ज्ञानमार्ग, देवयान म्हणतात. त्या मार्गानें ब्रह्मोपासक ब्रह्मलोकास जातो, आणि तेथें तो ब्रह्मदेव आहे तों पावेतों ब्रह्मभूत होऊन असतो. दुसऱ्यास धूममार्ग, कर्ममार्ग, पितृयाण म्हणतात. त्या मार्गानें कर्मी स्वर्गलोकास किंवा पितृलोकांस जातो, आणि पुण्यक्षय झाला म्हणजे परत मृत्युलोकांत जन्मास येतो.

**नैते सृती पार्थ जानन् योगी मुह्यति कश्चन ।**
**तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥२७॥**

हे ( दोन ) मार्ग ( पृथग् ) आहेत, असे समजल्यावर (अनन्यभक्तियुक्त ) योग्यास मतिभ्रम होण्याचें कांहींच कारण नाहीं, म्हणून हे अर्जुना ! तूं सतत योगयुक्त ( अनन्यभक्तियुक्त ) ऐस. २७

कर्ममार्गात तर वासनांचा क्षय झालेलाच नसतो. कर्ममार्गी " कामात्मानः स्वर्गपराः " असे असल्यानें त्यांना पुनरावृत्ति चुकतच नाहीं. प्रणवाची उपासना करणारा ज्ञानी उपासनेसाठीं परब्रह्मापासून विलग असतो. ज्ञानानें ब्रह्मात्मैक्य प्राप्त झालें नाहीं तर ब्रह्मोपासक देहत्यागानंतर ब्रह्ममय ( ब्रह्मभूत ) होईल, ब्रह्मांत विलीन होणार नाहीं. पण भक्त आपलें व्यक्तित्व पूर्णपणें विसरून जाऊन देहत्यागापूर्वीच परमात्मस्वरूप ( मुक्त ) झालेला असतो.

**वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।**
**अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥२८॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे अक्षरब्रह्मयोगो नाम अष्टमोऽध्यायः**

सम्यग् वेदाध्ययनाच्या, विधिवत् यज्ञकर्मांच्या, यमानियमपूर्वक तपश्चर्येच्या, आणि सत्पात्रीं दानाच्या पुण्यांचीं जीं जीं फलें शास्त्रांत सांगितलीं आहेत, त्यापैकीं कशाचेंहि महत्त्व ज्ञानी अनन्यभक्त योग्यास, हें ज्ञान झाल्यावर वाटत नाहीं, आणि त्याला आद्य (सर्वकारण) परमगति प्राप्त होते. २८

बाह्य साधनांपेक्षा अंतःकरण शुद्धीचेंच अत्यंत महत्त्व आहे. हेंच पुढें अ. ११ मध्यें "नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया । शक्य एवंविधो द्रष्टुम् दृष्टवानासि मां यथा ॥ भक्त्या त्वनन्यया शक्यः अहमेवंविधोऽर्जुन ज्ञातुं द्रष्टुं च तत्वेन प्रवेष्टुं च परंतप" असें सांगितलें आहे. " आद्यं परं स्थानं" म्हणजे "सर्वकारण ईश्वरः," जें सर्वांचें कारण अनादि आणि अनुत्तम परमात्मतत्त्व परब्रह्म, तेंच परमपद. अनन्यभक्त ज्ञानी योग्यासच तें प्राप्त होतें.

# अध्याय नववा

## राजविद्या राजगुह्य योग

श्रीभगवानुवाच—

**इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।**
**ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्षसेऽशुभात् ॥१॥**
**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।**
**प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥२॥**
**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।**
**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥३॥**

श्रीभगवान् म्ह०—( अर्जुना ! ) तूं नसेल तेथें उगाच दोष काढणारा नाहींस, ( म्हणून ) तुला हें अत्यंत गूढ असें विज्ञानासह ज्ञान ( आतां ) सांगतों. हें जाणल्यावर तुझ्या चित्तांतील भ्रम आणि मोह नाहींसे होतील. १ ही श्रेष्ठ विद्या, हें श्रेष्ठ गुह्य तत्त्वज्ञान, अत्यंत उदात्त, पवित्र, स्वानुभवानें प्रतीत होणारें, सद्धर्मास प्रवृत्त करणारें, आचरणांत आणण्यास सुखाचें, आणि ( निरपवाद ) शाश्वत असें आहे. २ येथें सांगितलेल्या या धर्मावर ज्यांची श्रद्धा नाहीं असे पुरुष, हे वीरा ! माझ्या ( परमात्म्याच्या ) पदास न येतां, मृत्यु आणि संसाराच्या फेऱ्यांतच फिरत राहतात. ३

७ व्या अध्यायांत " सविज्ञानं ज्ञानं " सांगितलें, आणि येथें " विज्ञानसहितं ज्ञानं, " आणि गुह्य तत्त्व सांगितलें आहे. शुद्ध तर्काधिष्ठित ज्ञानाला अतिंद्रिय प्रतीतीची जोड देऊन, येथें परमात्म स्वरूपाचें विवरण केलें आहे. विज्ञानग्रहणास साधक शुश्रूषु, अनुसूय, आणि श्रद्धायुक्त असावा लागतो. असूया म्हणजे " दोषारोपो गुणेष्वपि. " उगाच कुतर्क काढीत बसल्यास ज्ञान-

धारणा होणार नाहीं. तर्काच्याहि पलीकडे आत्मप्रतीतीनें होणारें असेंच तें सानुभव ज्ञान आहे. श्रद्धा म्हणजे अंधविश्वास नव्हे. बुद्धीला ( तर्काला ) पटून झालेला मनाचा निश्चय तीच श्रद्धा. ती आंधळी कधींच असत नाहीं. राजविद्या म्हणजे अत्यंत श्रेष्ठ विद्या, आणि राजगुह्य म्हणजे परम गूढ असें विज्ञान. हें समजण्यास श्रद्धा आणि अनसूया दोन्हीं आवश्यक आहेत. या तत्त्वविज्ञानांत आत्मीयतेनें शिरल्याशिवाय त्याचें आकलनच होऊं शकत नाहीं, असें तें खोल आणि अंतरगांस भिडणारें आहे. हें विज्ञान केवळ शाब्दिक ज्ञान नाहीं. याच्यायोगें आत्मतत्त्व प्रत्यक्ष होऊन धर्माधर्माचें कोडें उलगडेल. या ज्ञानविज्ञानाच्या मार्गांत कांहींहि कष्ट नाहींत, आणि याचें फलहि इतर कर्मफलाप्रमाणें भोगण्यानें कमी होणारें नाहीं येथें सांगितलेल्या तत्त्वाप्रमाणें श्रद्धेनें आचरण केल्यास परमगति प्राप्त होईल, नाहींतर सर्व-सामान्य संसारिकाप्रमाणें या जन्ममृत्यूच्या फेऱ्यांतच फिरत राहावें लागेल. येथें सांगितलेलें तत्त्व, धर्म्य, अत्यंत पवित्र आणि उदात्त, आणि आचरणास सुखाचें आहे. या धर्माचरणानें " येऽपि स्युः पापयोनयः स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् " असें सांगितलें आहे. हा धर्म वर्णधर्मापेक्षा अधिक उदार, कनवाळू, आणि सर्वसंग्राहक आहे. जन्मबंधापासून मुक्त होण्यास हाच सर्वांत श्रेष्ठ आणि सुकर मार्ग आहे, आणि या ज्ञानानें संसारांत विषमतेची बुद्धीहि उरत नाहीं.

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।**
**मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ।।४।।**

मी ( परमात्मा ) अव्यक्तरूपानें हें सर्व जगत् व्यापून आहे. ही सर्व सृष्टि माझ्यांतच ( परमात्म्यांतच ) आहे, पण मी ( अव्यक्त परमात्मा ) या भूतसृष्टींत नाहीं. ४

ईश्वर सर्व सृष्टजात व्यापून आहे. ईश्वराशिवाय सृष्टि अशी वेगळी नाहीं. सर्व एकच एक तत्त्व आहे. सर्व सृष्टपदार्थ ईश्वरांतच आहेत, परंतु सृष्टपदार्थांत म्हणजे त्यांच्या नामरूपांत, भेदभावांत मात्र परमात्मा प्रतीत होत नाहीं, तो भेदातीत ( द्वंद्वातीत ) आहे.

**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।**
**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥५॥**
**यथाऽऽकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।**
**तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥६॥**

ही भूतसृष्टि देखील माझ्या अंतर्गत नाहीं, तर मी या भूतसृष्टीचा ईश्वर ( शास्ता, वशी ) आहें, हें नीट समजून घे. भूतोत्पत्तीला कारणभूत असें माझें आत्मस्वरूप भूतांना धारण करणारें आहे, तें भूतांच्या अंतर्गत नाहीं. ५ ज्याप्रमाणें सर्वत्र व्यापून असणारें हें महत् वायुतत्त्व आकाशांत पूर्णत्वानें सर्वदा स्थित आहे, त्याचप्रमाणे ही भूतसृष्टि माझ्यांत स्थित आहे, हें नीट समजून घे. ६

"मत्स्थानि सर्व भूतानि" म्हणून लगेच "नच मत्स्थानि भूतानि" असें म्हटलें, अशा परस्पर विरुद्ध दिसणाऱ्या वचनांनीं गोंधळून जाण्याचें कारण नाहीं. भूतसृष्टि ईश्वराच्या शुद्ध, अव्यक्त, अव्यय, निरामय स्वरूपांत नाहीं, पण ती ईश्वरापासून स्वतंत्र वेगळी अशी नाहीं. भूतसृष्टि तत्त्वतः अव्यक्तरूप ईश्वरांतच आहे. विश्व आणि विश्वेश्वर वेगळे नाहींत. एक व्यक्त, एक अव्यक्त, हाच ऐश्वर योग नीट समजाऊन घ्यावयास पाहिजे. आकाश-( अवकाश ) आणि वायुतत्त्व दोन्ही समव्यापी आहेत. जेथें आकाश तेथें वायू आहेच,– किती का सूक्ष्म प्रमाणांत असेना. त्याचप्रमाणें विश्व आणि विश्वेश्वर एकच, त्यांचा विचार वेगळा करतांच येत नाहीं. "पूर्णमिदं पूर्ण-मदः पूर्णात् पूर्णमुदच्यते । पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते."

**सर्व भूतानि कौंतेय प्रकृतिं यान्ति मामिकाम् ।**
**कल्पक्षये, पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥७॥**

प्रलयकालीं, हे कौंतेया ! सर्व सृष्टजात माझ्या स्वरूपांत लीन होऊन जाते, आणि उत्पत्तिकालीं तीच सृष्टि मी पुनः उत्पन्न करतों. ७

खरें तर हें जें कांहीं आहे, तें अनादि आणि अनंतच आहे, कारण हें त्या अव्यक्त तत्वाचें व्यक्तरूप आहे, आणि तें अव्यक्त तत्त्व अनादि अनंत आहे.

पण हें सर्व एकच एक आहे, वेगळें नाहीं हेंच पटवावयाचें आहे. पाहणारा आहे तेव्हांच रूप आहे, आणि पाहणारा नाहीं तेव्हां रूप कोठें जातें? तें आहेच. ज्या कोणास हें व्यक्त व्हावयाचें तो नाहीं, असें आपण "कल्पिलें" आहे एवढेंच, त्यानें "अस्ति"त्वात बाध येत नाहीं.

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः ।**
**भूतग्रामामिमं कृत्स्नं अवशं प्रकृतेर्वशात् ॥८॥**

हें सर्व भूतजात मी आपल्या प्रकृतिसामर्थ्यानेंच (स्वभावानेंच) पुनः पुनः (योगमायेनें) उत्पन्न करतों. हें (भूतजात) प्रकृतीनें (स्वभावानें, नियतीनें) बद्ध असल्यानें स्वतंत्र नाहीं. ८

प्रकृति पुरुषापासून वेगळी नाहीं. ती पुरुषाचीच प्रकृति, ईश्वराचीच माया. जसा पुरुष आपल्या मनःसंकल्पानें कल्पनाजात उत्पन्न करतो, तो संकल्पहि त्याचाच, आणि कल्पनाहि त्याचीच, तशी ऐश्वरी मायेपासून होणारी सृष्टि ईश्वरांतच आहे. ती कल्पना अस्वतंत्र, पुरुष तर स्वतंत्रच आहे.

**न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय ।**
**उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥९॥**

ह्या सृष्टीच्या (उत्पत्ति लयाच्या) कर्मांत मी तटस्थ आणि अनासक्त असल्यानें, त्या कर्मांत मी यत्किंचितहि बांधलेला नाहीं. ९

एथपावेतों भूतसृष्टिसंबंधीं ऐश्वरयोग सांगून, येथें ईश्वर कांहीं सष्टिकर्मांत गुंतलेला नाहीं, हें सांगितलें आहे. "स्वभावस्तु प्रवर्तते," हें सर्व असें होतें, कारण हें स्वाभाविकच आहे. परमेश्वर आणि जीव हें तत्वतः वेगळे नसल्यामुळें उत्पन्न करण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. जीव आणि जगत् आहेतच. पूर्वी नसलेलीं नव्यानें होतात असें नाहीं.

**मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।**
**हेतुनाऽनेन कौंतेय जगद्विपरिवर्तते ॥१०॥**

मी केवळ साक्षीरूप राहून प्रकृतीपासून चराचर सृष्टि प्रसववितों, आणि याच कारणानें, हे कौंतेया! हें जगच्चक्र फिरत आहे. १०

ईश्वर आणि जगत् यांचा संबंध कर्ता आणि कार्य असा नाहीं. " स्व " आणि " स्वभाव " असा आहे. विश्व हें त्या विश्वेश्वर-विश्वंभराचा प्रभाव आहे.

**अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।**
**परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम् ॥११॥**
**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।**
**राक्षसीं आसुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥१२॥**

सर्व भूतमात्राचा मी महेश्वर असें माझें हें श्रेष्ठ स्वरूप न समजणारे मूढजन, मनुष्य देहांत ( अंतर्यामी रूपानें ) वास करणाराची माझी अवहेलना करतात. ११ ज्यांच्या आशा, कर्मे आणि ज्ञान विफल आहेत, असे हे क्षिप्तचित्त लोक ( मनाला आणि बुद्धीला ) मोह पाडणाऱ्या राक्षसी आणि आसुरी वृत्तींचा आश्रय करून असतात ( खऱ्या ज्ञानापासून ते वंचित असतात. ) १२

देहालाच आत्मा मानणें, आणि सर्व कांहीं या देहाच्या उपभोगासाठीं आहे असें वागणें, यालाच आसुरी किंवा राक्षसी वृत्ति म्हणतात. कधींहि पुऱ्या होऊं न शकणाऱ्या आशा बाळगणें, ज्या कर्मापासून चित्ताला समाधान किंवा खरें सात्त्विक सुख मिळूं शकत नाहीं अशीं कर्मे करणें, ज्याच्यापासून शाश्वत सत्तत्व कळणार नाहीं अशा ज्ञानाच्या मार्गे लागणें, यांपासून चित्तभ्रमाशिवाय दुसरें कांहींहि मिळणार नाहीं. अशा प्रकारें वागणाऱ्या लोकांना सर्वांतर्यामी, सर्वसाक्षी, सर्वात्मा आपल्याहि हृदयांत आहें हें कसें कळेल ? हे लोक आपल्या शुद्धांतरात्म्यानें दाखविलेल्या मार्गाची अवहेलना करून, उन्मार्गानें भोगांचे मार्गे लागतात.

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।**
**भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भुतादिमव्ययम् ॥१३॥**
**सततं कीर्तयन्तो मां यतंतश्च दृढव्रताः ।**
**नमस्यंन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥१४॥**

सर्व सृष्टजाताचें सनातन ( अविनाशी ) आद्यकारण मीच आहें, हें जाणून दैवीवृत्तीचे माहात्मे मात्र मला अनन्य भावानें भजतात. १३

ते यमनियमादि साधनांनीं मनाच्या आणि इंद्रियांच्या नियमनाचा अभ्यास करून, खडतर व्रताचें पालन करून, माझें ( ब्रह्मस्वरूपाचें ) सर्वकाळ संकीर्तन करतात, आणि मला ( हृदयस्थ अंतर्यामी परमात्म्याला ) नमस्कार करून, मत्पर होऊन, भक्तिभावानें नित्य माझी उपासना करतात. १४

येथें पुढें विस्तारानें अ. १६ मध्यें वर्णिलेल्या दैवी आणि आसुरी ( किंवा राक्षसी ) संपदांचा जातां जातां उल्लेख आहे. या संपत् ( आत्मभाव ) मुखत्वें जन्मजातच असतात. थोड्याबहुत प्रमाणांत या वृत्तींत बदल होणें शक्य आहे, पण त्यालाहि पूर्वसंस्कार ( या किंवा पूर्व जन्माचा ) आवश्यक असतो. देहात्मवादी, देहालाच आत्मा मानणारे, आसुरी किंवा राक्षसी वृत्तीचे होत. ते जीवात्मा ईश्वरांश आहे, हें मानीत नाहींत, म्हणून ते या मनुष्य देहात वास करणाऱ्या ईश्वराची अवहेलना करतात, असें वर सांगितलें आहे. उलट जे दैवी वृत्तीचे आहेत ते स्वांतरंगांत वास करणाऱ्या ऐश्वरी ज्योतीला ओळखतात, आणि सर्व कर्में त्याच परमेश्वराला समर्पण करून अनन्यभावानें त्याचीच उपासना करतात.

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते ।**
**एकत्वेन प्रथक्त्वेन बहुधा विश्वतो मुखम् ॥१५॥**

अन्य कांहीं उपासक ज्ञानयज्ञानेंच माझें पूजन करून मला " एकमेव परं ब्रह्म " असें समजून, किंवा अनेक देवतारूपानें कल्पून, अथवा मला बहुविध सर्वतोमुख ( विश्वरूप ) जाणून, माझी ( परमात्म्याची ) उपासना करतात. १५

उपासना उपासकाच्या मनोवृत्तीप्रमाणेंच होत असते. ज्या प्रकारचें ज्ञान, ज्या प्रकारची साधना, त्याच प्रकारची उपासना. ईश्वर एक आहे, अनेकरूप आहे, आणि अनंतरूपहि आहे. रूपें अनेक असलीं तरी "एकमेवाद्वितीयं ब्रह्म," " सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म " हेंच तें परमात्मस्वरूप आहे.

**अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् ।**
**मन्त्रोऽहमहमेवाज्यं अहमग्निरहं हुतं ॥१६॥**

**पिताऽहमस्य जगतो माता धाता पितामहः ।**
**वेद्यं पवित्रमोंकार ऋक् साम यजुरेव च ॥१७॥**
**गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।**
**प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥१८॥**
**तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च ।**
**अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥१९॥**

श्रौतकर्मोपासना ( सकाम यज्ञकर्म ) मीच, स्मार्त यज्ञकर्महि मीच, "स्वधा" म्हणून पितरांना द्यावयाचें अन्न मीच, सर्व प्राण्यांचें पोषण करणाऱ्या वनस्पति (अन्न) मीच, पितृदेवतादींना ज्या मंत्रांनीं हवन करावयाचे ते मंत्र मीच, हविहि मीच, अग्नि मीच, हवन क्रियाहि मीच. १६ मीच या जगताचा पिता, माता, कर्मफलप्रदाता, आणि पितामह आहे. पवित्र ज्ञानविषय, प्रणव, ऋक्, साम, यजुर्वेदहि मीच. १७ कर्मफल मीच, प्राणिमात्राचें पोषण करणारा, स्वामी, सर्वसाक्षी, प्राण्यांचा आधार, आश्रय, हितकर्ता, उत्पत्ति, विलय, स्थिति, जीविकेचा साठा आणि सर्वांचें शाश्वत आदिकारण मीच आहें. १८ सूर्य होऊन मी उष्णता देतों, पाऊस मीच, पुनः जलाचें उद्धरण आणि उत्सर्जन मीच करतों; अमरत्व, मरण, अस्तित्व आणि नास्तित्वहि, हे अर्जुना ! मीच आहे. १९

सर्व उपासनाचे विधि, त्यांचीं द्रव्यें, त्यांचे मंत्र, सर्व कांहीं परमेश्वरच आहे. सर्व उपासना त्यालाच पोहचतात. विश्वांतील सर्व पदार्थ, सर्व व्यापार, सर्व घटना, सर्व संबंध, सर्वगती, सर्वरवी ईश्वराधीन आहेत. हा सर्व ऐश्वरी मायेचा आविष्कार आहे. यांतच ईश्वराचें दर्शन होतें, आणि त्याची उपासनाहि यांनींच करावयाची. एकत्व, बहुत्व आणि सर्वत्व तीनहि प्रकारांनीं ईश्वराचें स्वरूप प्रतीत होत असतें. याच बहुत्वांत आणे सर्वत्वांत परमेश्वराचें ( परमात्म्याचें ) एकत्व पहावयाचें आहे.

**त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते ।**
**ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकम् अश्नन्ति दिव्यान् दिवि देव भोगान् ॥२०।**

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ।**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ॥२१॥**

वेदविहित यज्ञादि कर्मांचें विधिवत् अनुष्ठान करून, (वसुइंद्रादि स्वरूपांत ईश्वराचें) माझें यजन करून, विधियुक्त सोमपानादि कर्मांनीं पापमुक्त होऊन, कर्ममार्गी वेदवित् स्वर्गप्राप्तीची अर्थना करतात; त्यांना तो पुण्य इंद्रलोक प्राप्त होऊन स्वर्गात देवांना मिळणारे दिव्य भोग मिळतात. २० असे ते वेदवित् त्या महान् स्वर्गलोकाचे भोग भोगून, (शेवटीं) पुण्य संपलें म्हणजे या मृत्युलोकास परत येतात. अशा प्रकारें हे वेदविहित धर्मांना अनुसरणारे (केवळ आपल्या इच्छितार्थांच्याच मागें असल्यामुळें) त्यांच्या पदरीं केवळ यातायात (जन्ममरणाचा फेरा) मात्र पडते. २१

वेदविहित सकाम कर्मांची येथें निंदा केली आहे. कर्मठांच्या हातीं नित्य, शाश्वत असें कांहींच लागत नाहीं. राक्षसी अथवा आसुरी वृत्तीचे लोक याहून वेगळे. त्यांना तर अधोगतीच प्राप्त होते. पापाचरणानें अधोगति, पुण्याचरणानें स्वर्ग, पण तो अनित्य; म्हणून पापपुण्याच्याहि पलीकडे जाऊन अनन्यभावानें ईश्वराची भक्ति करणारासच खरी सद्गति मिळू शकते, हेंच येथें मुख्यत्वें सांगावयाचें आहे.

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥२२॥**

(परंतु) जे मद्भक्त अनन्य भावानें माझेंच चिंतन करून माझीच उपासना करतात, त्या मत्पर भक्तांचा योगक्षेम मी चालवितों. २२

योग म्हणजे इच्छिताची प्राप्ति, आणि क्षेम म्हणजे प्राप्त झालेल्याची जोपासना. अनन्यभावानें सर्वस्वीं आपणा स्वतःस ईश्वरास वाहून घेणाऱ्या भक्तांची काळजी त्यालाच आहे. त्यांना जें वाञ्छित तें त्यांना त्याच्या कृपेनें मिळते, आणि मिळाल्यावर त्याच्याच कृपेनें ते टिकतेंहि.

**येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः ।**
**तेऽपि मामेव कौंतेय यजन्त्यविधिपूर्वकम् ॥२३॥**

जे कोणी दुसऱ्या गौण देवतांची श्रद्धापूर्वक उपासना करतात, अर्जुना! ते वस्तुतः माझीच उपासना, परंतु (अजाणपणानें) सदोष विधीनें करतात. २३

खरी श्रद्धापूर्वक भक्ति सर्वसाक्षी अंतर्यामी परमात्म्याचीच भक्ति असते, आणि जशी श्रद्धा असेल तशीच ती उपासना त्या परमात्म्याला पोहचते. हेंच तत्त्व अ. ४ श्लो. ११-१२ आणि अ. ७ श्लो. २१-२२ मध्येंहि सांगितलें आहे. "भाव तसा देव" आणि "बुद्धि तशी सिद्धि" असें हें महत्तत्व आहे.

**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।**
**न तु मामभिजानन्ति तत्वेनातश्च्यवन्ति ते ॥२४॥**
**यान्ति देवव्रता देवान् पितॄन् यान्ति पितृव्रताः ।**
**भूतानि यान्ति भुतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥२५॥**

सर्व श्रौतस्मार्त यज्ञांचा भोक्ता आणि स्वामी मीच आहे, परंतु हे अज्ञ जन मला (तत्त्वतः) यथार्थतेनें जाणत नाहींत, म्हणून ते योग्य कर्मफलाला मुकतात. २४ देवांची उपासना करणारे देवलोकांस, पितृपूजक पितृलोकांस, भूतपूजक भूतलोकांस जातात, आणि माझे भक्तहि माझ्याच पदास पोहचतात. २५

सर्वांतर्यामी परमात्म्यासच सर्व उपासना पोहचतात, आणि श्रद्धेप्रमाणें गति मिळते हेंच स्पष्ट करून सांगितलें आहे. सर्वसाक्षी परमात्मा सर्वांठायी एकच आहे, अनन्य भावानें केलेली उपासना त्यालाच पोंहचते, हें महत्तत्व अज्ञ जनांना कळत नाहीं. सर्वांतर्यामी परमात्मा सर्वांच्या हृदयांत एकच आहे, परंतु ज्याच्या त्याच्या श्रद्धेप्रमाणें आणि भावाप्रमाणें जो तो त्याला जाणतो, आणि तो अंतरात्माहि भक्ताच्या श्रद्धेप्रमाणें आणि भावाप्रमाणें तसाच होतो, आणि त्याच्या उपासनेचें फळहि त्याला त्याच्या श्रद्धेप्रमाणें आणि भावाप्रमाणेंच मिळतें.

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**
**तदहं भक्त्युपहृतं अश्नामि प्रयतात्मनः ॥२६॥**

पान, फूल, फळ, किंवा पाणीहि जो कोणी भक्तीनें मला अर्पण करतो, त्या शुद्धात्म्यानें तें भक्तिपूर्वक अर्पण केलेलें मी ग्रहण करतों. २६

काय अर्पण केलें याचें महत्त्व नसून, कोणत्या बुद्धीनें अर्पण केलें आहे याचें महत्त्व आहे. " देव भावाचा भुकेला " आहे. शुद्ध चित्त आणि अनन्यभाक्ति हींच केवळ परमेश्वरास ( परमात्म्यास ) प्रिय आहेत.

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥२७॥**
**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः ।**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥२८॥**

जीं जीं कर्मे करशील, जे जे भोग भोगशील, जें यजन, दान, किंवा तप करशील तें सर्व, अर्जुना ! मला समर्पण कर. २७ असें केलेंस म्हणजे पापपुण्यरूप शुभाशुभ फल देणाऱ्या कर्मांच्या बंधापासून मुक्त होशील, ( आणि मग ) कर्मसंन्यासानें आणि बुद्धियोगानें युक्त होऊन मुक्त होशील, आणि ( देहांतीं ) माझ्या पदाला येशील. २८

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।**
**ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥२९॥**

मला ( ईश्वराला ) कोणी अप्रिय नाहीं, किंवा प्रिय नाहीं; कारण मी भूतमात्रांत सारखेपणानें आहे. जे भक्तिभावानें माझेच होतात, ते माझ्यातच आहेत, आणि मीहि पण त्यांच्यांत आहे. २९

**अपि चेत् सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥३०॥**
**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति ।**
**कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥३१॥**

बाह्यतः अत्यंत हीनाचार असणाराहि, जर अनन्य भावानें माझी

भक्ति करील, तर त्याला साधूच मानावा, कारण त्यानें सत्कर्माचा उपक्रम केला आहे. ३० असा तो लवकरच पुण्यात्मा होतो, आणि त्याला शाश्वत शांति लाभते. कारण, कौंतेया ! माझ्या भक्तास कधींहि दुर्गति होत नाहीं, हें पक्कें समज. ३१

ज्याचा बाह्याचार हीन किंवा अमंगळ, परंतु जो मनानें पवित्र आणि ईश्वरपरायण आहे, तो खरा साधूच आहे. मानसिक सदाचरणच महत्त्वाचें आहे. बाहेरच्या व्यवहारांत, जातीच्या किंवा अन्य कारणानें, अमंगळता असली तरी, ईश्वराच्या अनन्यभक्तींत त्यानें बाधा पडत नाहीं. " क्षिप्रं भवति धर्मात्मा, " अंतःकरण शुद्ध असल्यास तेथें पापाचें नांवहि राहणार नाहीं. शांति मनावर अवलंबून आहे, बाह्याचारावर नाहीं. ईश्वरभक्ताला पाप तर स्पर्श करूं शकतच नाहीं, पण तो पापपुण्याच्याहि पलीकडे असतो.

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥३२॥**

कारण, हे पार्था ! सर्वस्वीं मत्परायण असे जे कोणी हीन जातीचेहि असतील त्यांना, त्याचप्रमाणें स्त्रिया, वैश्य, आणि शूद्र यांनाहि परम सद्गति लाभेल. ३२

येथें मागील श्लोकांत " सुदुराचार " म्हणून निर्दिष्ट केलेल्यासच " पापयोनी " म्हटलें आहे. हीनजाती मानलेल्या अत्यंजाचा हा निर्देश आहे. पूर्वकर्मामुळें हीन जातींत जन्म पावलेले, परंतु संस्कारानें अंतःकरणाचे शुद्ध आणि ईश्वरभक्त असल्यास, त्यांची जात सद्भक्तीच्या आड येत नाहीं. स्त्रिया, वैश्य, आणि शूद्र यांचा निर्देश मुद्दाम वेगळा करण्याचें कारण असें कीं, त्यांना श्रौत कर्माचा अधिकार नाहीं असें कर्मठ मानतात, आणि त्यांना स्वर्गलोक प्राप्ति नाहीं, असेंहि म्हणतात. नसेल त्यांना स्वर्गलोकाची किंवा पितृलोकाची प्राप्ती, परंतु त्यांना यापेक्षांहि श्रेष्ठ अशा मोक्षाचा मार्ग मात्र खुला आहे. या मार्गांत, जन्मानें आलेला उच्चनीच भाव आड येत नाहीं. कारण या मार्गांत सवच सारखे आहेत. स्त्रिया अबला आणि पुरुषावलंबी म्हणून, वैश्य धनसंचय परायण म्हणून, आणि शूद्रांना केवळ परिचर्येचाच अधिकार आहे म्हणून, या

सर्वांना कमी लेखिलें गेले, पण भक्तिमार्गांत हें कांहींहि आड येत नाहीं; तेथें केवळ अनन्य भक्तीच पाहिजे.

**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।**
**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥३३॥**

( याप्रमाणें जर हीन जातींनाहि सद्‌गति मिळते ) तर मग पुण्यशील ब्राह्मणांची, त्याचप्रमाणें अनन्यभक्त राजर्षींची गोष्टच काय ? ( म्हणून ) या अशाश्वत आणि दुःखमय संसारांत पडल्यावर केवळ माझीच भक्ति कर. ३३

येथें केवळ जातीनें किंवा वर्णानें ब्राह्मण असलेल्यांचा निर्देश नाहीं, तसेंच वर वैश्य आणि शूद्रांचा निर्देश केल्यावर केवळ जातीनें क्षत्रिय असलेल्यांचाहि निर्देश नाहीं. पुण्यशील ब्राह्मण आणि भक्त राजर्षि ( नुसते वर्णानें किंवा जातीनें क्षत्रिय नव्हत ) असें मुद्दाम म्हटलें आहे. गीतेंत जातीला महत्त्व नाहीं. "समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः", अनन्य भक्तांत जात-पात कांहींहि नाहीं.

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यासि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥३४॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**
**राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः**

सतत माझेंच चिंतन कर, माझाच भक्त हो, यजनहि माझेंच कर, आणि मलाच शरण ये. अशा प्रकारें मलाच सर्व समर्पण करून आपलें अंतः-करण माझ्याच ठिकाणीं लीन केल्यास मलाच अंतीं येऊन मिळशील. ३४

" राजविद्या " सांगून हेंच " राजगुह्य " सांगितलें कीं, अनन्य भक्तीच केवळ मोक्षाचें साधन आहे, येथें उच्चनीच भाव नाहीं. केवळ भक्तीनेंच अंतीं सद्गति मिळेल, हेंच महत्तत्त्व प्रतिपादिलें आहे. ईश्वर सर्वसाक्षी, सर्व-भूतांतरात्मा आणि " समःसर्वेषु " आहे, हीच राजविद्या ( परमज्ञान ). सातव्या अध्यायांत सांगितलेलें सविज्ञान ज्ञान येथें अधिक स्पष्ट केलें आहे.

---

# अध्याय दहावा

## विभूति योग

श्रीभगवानुवाच—

**भूय एव महाबाहो श्रुणु मे परमं वचः ।**
**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥१॥**

श्री भगवान म्ह०—हे महाबाहो ! माझें अत्यंत महत्त्वाचें वचन आणखी ऐक. माझें सांगणें तुला फार आवडतें म्हणून तुझें कल्याण व्हावें या इच्छेनें तुला सांगतों. १

"न चाशुश्रूषवे वाच्यम् ;" ऐकण्याची इच्छा असेल, त्याविषयांत ज्याला गोडी असेल, त्यालाच कांहींहि हिताचे दोन शब्द सांगावे, नाहींपेक्षां तो कंठशोष आणि वाग्वादच व्हावयाचा. अर्जुन सच्छिष्याप्रमाणे हें बोधामृत आत्मसात् करीत होता, म्हणूनच त्याला ही राजविद्या आणि हें राजगुह्य सांगितलें.

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।**
**अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥२॥**
**यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।**
**असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥३॥**

माझा प्रभव ( प्रभाव, माहात्म्य ) देवांना आणि महर्षींनांहि कळलेला नाहीं, कारण मी देवांच्या आणि महर्षींच्याहि पूर्वींचा आहे. २ जो कोणी मला अजन्मा, अनादि, आणि सर्वलोकांचा परमस्वामी जाणतो, तो मनुष्य अज्ञान भ्रमांतून सुटून सर्व पापांपासून मुक्त होतो. ३

ईश्वर अनाद्यनंत आहे. "सत्यं ज्ञानमनंतम्" असें परब्रह्माचें स्वरूप आहे. परब्रह्म "अस्तित्वा" चेंच मूलकारण आणि ज्ञानघन आहे. तें "सर्वकारण" आहे. प्रभव म्हणजे प्रभाव किंवा ऐश्वर्य, विस्तार असाहि अर्थ येथें करतां येईल. "माम्" म्हणजे सर्वांतर्यामी सर्वसाक्षी ईश्वराला.

**बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ।**
**सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ॥४॥**
**अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ।**
**भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥५॥**

अंतःकरणाचें पदार्थावबोधनसामर्थ्य, पदार्थावबोध, ज्ञानासंबंधीं जागरूकता, क्षमा, सत्य, इंद्रियनिग्रह, चित्ताची शांति, सुखदुःख, उत्पत्ति-विनाश, भय–अभय, ४ अहिंसा, समता, संतोष, तप, दान, यश–अयश ह्या सर्व जीवांच्या अवस्था आणि मनोवृत्ती मजपासूनच ( ईश्वरनिर्मीतच ) आहेत. ५

या ठिकाणीं काहीं भाव संकलितरूप, कांहीं परस्परोपकारी, कांहीं द्वंद्वरूप, आणि कांहीं विलग असे सांगितले आहेत. सर्व भौतिक आणि अध्यात्मिक भाव ( अवस्था ) त्या अनाद्यनंत सर्वकारण परमात्म्यापासूनच उद्भूत झाले आहेत. शुद्धभाव केवलात्म्याचे, आणि विकृत भाव जीवाचे आहेत.

**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।**
**मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥६॥**

सप्त महर्षी, आद्य चार ( ब्रह्मदेवाचे मानस पुत्र ), मनु ( चौदा ), हे सर्व मजपासून, माझ्याच मूलकारण इच्छेनें उत्पन्न झालेले आहेत, आणि यांच्याचपासून या मनुष्य लोकांत ही स्थावर जंगम सृष्टि उत्पन्न झाली आहे. ६

“स ऐच्छत बहु स्याम् प्रजायेय इति” अशी ही सृष्टि त्याच्याच इच्छेनें झाली आहे.

**एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्वतः ।**
**सोऽविकम्पेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥७॥**

हा असा मजपासून सृष्टीचा विस्तार, आणि माझें हें योगैश्वर्यसामर्थ्य ज्याला परमार्थतः कळेल, त्यालाच माझ्याशीं स्थिर स्वरूपाचें तादात्म लाभेल यात संशय नाहीं. ७

सर्व कांहीं ईश्वरापासून आणि ईश्वररूपच आहे हें ज्याला पटलें, त्यालाच परमात्मतत्त्व तत्त्वतः कळेल, आणि त्यालाच त्या महत्तत्त्वाशीं ऐक्य लाभेल.

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।**
**इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः ॥८॥**
**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम् ।**
**कथयंतश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ॥९॥**
**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥१०॥**
**तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः ।**
**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥११॥**

मीच सर्वांचें उत्पत्तिकारण, आणि सर्व प्रवृत्ति माझ्याचपासून आहे, असें जाणून भक्तिभावयुक्त ज्ञानी मत्पर होतात. ८ आपलें चित्त आणि प्राण मलाच अर्पण करून, एकमेकांत ज्ञानाची चर्चा करून, माझ्याच ऐश्वर्याचें यश गाऊन ( योगी ) संतोष पावतात, आणि आनंदांत मग्न असतात. ९ त्या अत्यंत प्रेमानें मत्पर होणाऱ्या अनन्य भक्तांना मी बुद्धियोग ( सम्यक्ज्ञानयुक्त मत्परायणता ) देतों, त्यानेंच ते मत्स्वरूप होतात. १० त्यांच्यावर कृपाकरण्यासाठींच त्यांच्या अंतःकरणांत वास करून प्रकाशमान ज्ञानदीपानें, ( सम्यक् ज्ञानाच्या आड येणारे ) अज्ञान-तिमिर मींच नाहींसें करतों. ११

भाव म्हणजे भक्ति (निष्ठा), आणि सम्यक्ज्ञान यांच्याच प्रकाशानें परमात्मतत्त्व कळतें, आणि त्याच्याशीं एकरूप होणें शक्य होतें. हाच बुद्धियोग ईश्वर-कृपेनें भक्तांना मिळतो. ध्यान, ज्ञान, कर्म, आणि भक्ति या चारहि मार्गांचें अंतिम साध्य हा बुद्धियोगच आहे. हे चार मार्ग वेगळाले दिसतात, परंतु अंती या बुद्धियोगांतच हे एकवटतात. “अस्मिता” नाहींशी झाली, आणि परमात्म्यांत विलीन होऊन वेगळेपणाची जाणीव गेली, म्हणजेच ज्ञानी मुक्त होतो.

अर्जुन उवाच—

**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।**
**पुरुषं शाश्वतं दिव्यं आदिदेवमजं विभुम् ॥१२॥**
**आहुस्त्वाम् ऋषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।**
**असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥१३॥**

अर्जुन म्ह०—तूं परब्रह्म (परमात्मा), परम तेज, आणि परम पवित्र पद आहेस. सर्व ऋषी, देवर्षि नारद, असित, देवल, व्यास हे सर्व तुला शाश्वत पुरुष, अजन्मा आणि सर्वव्यापी आदिदेव म्हणतात, आणि तूंहि पण स्वतः मला असेंच सांगत आहेस. १२, १३.

अर्जुन श्रीकृष्णाला तूंच परमात्मा, अनादि, अव्यय, शाश्वत पुरुष आहेस, असें म्हणतो. पुढें भगवान् "वृष्णीनां वासुदेवोऽस्मि" असें म्हणतात. वासुदेव श्रीकृष्णच ( योगेश्वर श्रीकृष्ण ) आपल्या प्रिय शिष्यास, सख्यास, भक्तास गीतोपदेश करीत आहेत. योगेश्वर परमज्ञानी श्रीकृष्ण ईश्वररूपच आहेत. "ज्ञानी त्वात्मैव मे मतम्," परमज्ञानी ईश्वराहून भिन्न नाहीं. असित, देवल, व्यास हे सर्व श्रीकृष्णास ईश्वरस्वरूप मानतात, आणि ईश्वरस्वरूप श्रीकृष्णहि तसेंच बोलत आहेत.

**सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।**
**न हि ते भगवन् व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥१४॥**
**स्वयमेवात्मनाऽऽत्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।**
**भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥१५॥**
**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ।**
**याभिर्विभुतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥१६॥**

हे केशवा ! तूं जें जें मला सांगत आहेस तें तें सर्व मी यथार्थ मानतों. तुझें स्वरूप देवांना आणि दानवांनाहि अगम्य आहे. १४ हे पुरुषोत्तमा, भूतकारणा, भूतेश्वरा, देवाधिदेवा, जगदीश्वरा ! तुझें स्वरूप केवळ

तूंच जाणतोस. १५ (तर आतां) ज्या ऐश्वर्योंनीं तूं हें सर्व विश्व व्यापून आहेस, त्या सर्व अलौकिक ऐश्वर्यशक्ती तूं आतां मला साकल्यानें सांगव्या. १६

परमेश्वराचें महान् ऐश्वर्य सर्व विश्वांत ओतप्रोत आहे, हें पूर्वी अनेकदां सांगितलें आहे. त्याच ऐश्वर्याचीं प्रतीकें कोठें कोठें कशीं आहेत, हेंच आतां सांगतील.

**कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिन्तयन् ।**
**केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ॥१७॥**
**विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।**
**भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥१८॥**

हे योगेश्वरा ! तुझें सतत चिंतन करीत असतां मी तुला कसें जाणावें, आणि हे भगवन्ता ! कोणकोणत्या स्वरूपांत तुझें चिंतन करावें ? १७ हे जनार्दना ! तुझें योगैश्वर्य सामर्थ्य आणि माहात्म्य पुनः एकदां विस्तारानें सांग. तुझें अमृततुल्य वचन ऐकून माझी अजून तृप्ति झाली नाहीं. १८

ईश्वराच्या सगुण भक्तीसाठीं, त्याच्या सगुणरूपाचें आपल्या भावनानुरूप चिंतन करावयाचें. "सत्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति," आणि भक्ति ही श्रद्धेला अनुरूपच असते. तेव्हां ज्या ईश्वरस्वरूपाचे चिंतन करावयाचें तें ज्याच्या त्याच्या स्वभावास अनुरूपच असावयास पाहिजे. कोणाला श्रीरामाचें रूप आवडेल, कोणाला श्रीकृष्णाचें, तर कोणाला श्रीशंकराचें आवडेल, कोणाला अक्षर अनिर्देश्य अव्यक्तच आवडेल. या अध्यायांत विभूतिरूपानें परमेश्वराचें विश्वरूपच वर्णिलें आहे. पुढच्या अध्यायांतील विश्वरूप दर्शनाची ही प्रस्तावनाच आहे. अनाद्यनंत विश्वच परमात्म्याचें दृश्यरूप आहे. या विश्वाच्या विस्तारामागचें गूढतत्त्वच जाणावयाचें आहे. विश्व हेंच परमेश्वराची अगम्य अनाकलनीय माया आणि महदैश्वर्य आहे. या विश्वांतच ईश्वराचें दर्शन होतें, विश्वापासून ईश्वर वेगळा नाहीं.

श्रीभगवानुवाच—

**हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।**
**प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्य मे ॥१९॥**

श्रीभगवान् म्ह०—हे कुरुश्रेष्ठा ! बरें तर, माझ्या ऐश्वर्याला (विस्ताराला) अंत नाहीं, पण तुला माझ्या अलौकिक प्रभावाचे आतां मुख्य मुख्य विस्तार सांगतों. १९

ज्या सत्त्वांत ईश्वराचा प्रभाव विशेषप्रकारें दिसतो ती विभूति. ईश्वर तर सर्वाठायीं सारखाच आहे, पण पहाणाराला सृष्टींत कोठें कोठें वैशिष्ट्य दिसतें.

**अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।**
**अहमादिश्च मध्यं च भूतानामंत एव च ॥२०॥**

हे गुडाकेशा ! सर्व भूतमात्राच्या अंतःकरणांत मी प्रत्यगात्मा स्थित आहे. सर्व भूतांचा आदिहेतु, स्थितिहेतु, अवसानहेतु मीच आहे. २०

परमेश्वराची आद्य विभूति, प्राणिमात्रांत वास करून त्यांना चिच्छक्ति देणारा, प्रत्यगात्मा. विश्वातील सर्व व्यवहारास आदिमध्यावसानासहि ईश्वरच कारण आहे.

**आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।**
**मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥२१॥**
**वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ।**
**इंद्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥२२॥**
**रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।**
**वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥२३॥**
**पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ।**
**सेनानीनामहं स्कंदः सरसामस्मि सागरः ॥२४॥**
**महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ।**
**यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥२५॥**

**अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ।**
**गंधर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥२६॥**
**उच्चैश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।**
**ऐरावतं गजेंद्राणां नराणां च नराधिपम् ॥२७॥**
**आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ।**
**प्रजनश्चास्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥२८॥**
**अनंतश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ।**
**पितणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥२९॥**
**प्रन्हादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ।**
**मृगाणां च मृगेंद्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥३०॥**
**पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् ।**
**झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जान्हवी ॥३१॥**
**सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन ।**
**अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥३२॥**

मी आदित्यांत विष्णु, आकाशस्थ ज्योतींत अंशुमान् सूर्य, मरुद्देवतांमध्यें मरीची, नक्षत्रांमध्यें चद्रमा आहें; २१ वेदांमध्यें सामवेद, देवांमध्यें ईद्र, इंद्रियांमध्यें मन, भूतांमध्यें चेतना आहे; २२ रुद्रांमध्यें शंकर, यक्ष आणि रक्षसांमध्यें कुबेर, अष्टावसूमध्यें अग्नि, पर्वतांमध्यें मेरु आहें. २३ हे पार्था ! राजपुरोहितांमध्यें मुख्य बृहस्पति, मी सेनानींमध्यें स्कंद, जलाशयामध्यें सागर आहें. २४ महर्षींमध्यें मी भृगु, वाक्पदांमध्यें ओंकार, यज्ञामध्यें जपयज्ञ, अचलपदार्थांत मी हिमालय आहें. २५ सर्ववृक्षांत अश्वत्थ, देवर्षींमध्यें मी नारद, गंधर्वांत चित्ररथ, सिद्धपुरुषांत मी कपिलमुनी आहें. २६ अश्वांमध्यें उच्चैश्रवा, गजेंद्रांमध्यें मी अमृतमंथनांत निघालेला ऐरावत गज, आणि नरामध्ये मी नरेंद्र आहें. २७ शस्त्रांमध्यें वज्र, धेनूंमध्यें कामधेनू, उत्पादकांमध्यें मदन ( हेच " प्रजनः कंदर्पः" ईश्वराचे सात्त्विक स्वाभाविक रूप आहे, राजसकाम म्हणजे कामुकता

ही ऐश्वरी नाहीं ), सर्पांमध्यें मी वासुकी आहे. २८ नागांत अनंत, जलदेवतांत वरुण, पितृदेवतांत अर्यमा, सर्वांचा संयम ( शेवट ) करणारा मी यम आहें. २९ दितिवंशांत प्रल्हाद, गणना करणारांत मी काल, श्वापदांत सिंह, पक्ष्यांत मी गरुड आहें. ३० गतिमान पदार्थांत वायु, शस्त्रधारी वीरांत श्रीराम, जलचरांत मकर, नद्यांमध्यें मी गंगा आहें. ३१ अर्जुना ! मी सृष्टीचा ( भूतमात्राचा ) आदि, मध्य, आणि अंत आहें. विद्यांमध्यें मी अध्यात्मविद्या, आणि अनेक वादभेदांत मी अर्थनिर्णयवाद आहें. ३२

**अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च ।**
**अहमेवाक्षयः कालो धाताऽहं विश्वतोमुखः ॥३३॥**

अक्षरांमध्यें " अ " वर्ण मी आहें. समासयुक्तांत ( संयोगित्वानें, जोडीनें असणारांत ) द्वंद्व मी आहें, अक्षय ( शाश्वत, अनाकलनीय ) काल मी आहें, आणि सर्व विश्वाचा सर्वतोमुख धारण करणारा कर्मफलांचा विधाता मीच आहें. ३३

" अ " हा शब्दाचा आद्य स्फोट आहे, " अ " वर्णाच्या बीजस्थानी आहे, तेंथूनच वर्णांचा प्रारंभ होतो. सामासिक म्हणजे समासानें, जोडीनें येणारे पदार्थ किंवा भाव. सुख–दुःख, राग–द्वेष, प्रकाश-अंधार, ज्ञान-अज्ञान या जोड्या द्वंद्वरूपानेंच असतात. मागें कलनाचा ( गणनेचा ) काल सांगितला, येथें अनाकलनीय, अनाद्यनंत काल सांगितला आहे. सर्व प्राणिमात्राच्या कर्मफलांचा विधाता आणि संरक्षक, सर्वतोमुख ईश्वरच आहे.

**मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।**
**कीर्तिः श्रीर्वाक् च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥३४॥**

सर्व प्राणिमात्राचा अंत करणारा मृत्यु मीच, आणि उत्पन्न होणाऱ्या सर्व भूतमात्राचें उत्पत्तिकारणहि मीच, ( कृतार्थ करणाऱ्या ) स्त्रीलिंगी भावांत कीर्ति, संपत्, सूनृतावाणी, स्मरणशक्ति, बुद्धि, धारणाशक्ति, आणि क्षमा मीच आहें. ३४

उत्पत्ति आणि मृति हें द्वंद्व, ज्याच्या योगें ही जगताची यातायत चालू आहे तें द्वंद्व, ईश्वररूपच आहे. सप्त स्त्रिलिंगी भाव जे मनुष्यास कल्याणकारी आहेत, तेही ईश्वरी भावच आहेत. कीर्तीच्या इच्छेनेंच सदाचरण होतें, श्रीमध्यें सर्व सद्भाव अनुस्यूत आहेत, वाक् आणि स्मृति तर ईश्वराच्या मोठ्याच उपकारक देणग्या आहेत, बुद्धि आणि धारणा यांनींच मनुष्याला मनुष्यत्व आहे, आणि सर्व जगतांत शांति आणि सुख क्षमाशीलत्वानेंच नांदू शकते.

**बृहत्साम तथा साम्नां गायत्री छंदसामहम् ।**
**मासानां मार्गशीर्षोऽहं ऋतूनां कुसुमाकारः ॥३५॥**
**द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।**
**जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्वं सत्ववतामहम् ॥३६॥**
**वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः ।**
**मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥३७॥**
**दण्डो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ।**
**मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥३८॥**

' सामवेदांतील बृहत्साम मी, छंदांमध्यें गायत्रीछंद मी, मासांत मार्गशीर्ष, आणि ऋतूंत मी वसंत आहें. ३५ फसविणारात द्यूत, तेजस्वी जनांमधील तेज, सत्त्वस्थ योगीजनांत इंद्रियनिग्रह, निश्चय, आणि चित्तस्थैर्य हे गुण मीच आहें. ३६ यादवामध्यें मी वसुदेवसुत श्रीकृष्ण, पांडवांत अर्जुन, मुनिजनांत व्यास, आणि क्रांतदर्शी आचार्यांत शुक्राचार्य मीच आहें. ३७ लोकांना वठणीवर आणणारांची दण्डनीति मी, जयाची इच्छा करणारांची सामदामादि उपाययोजना मीच, गुप्त ठेवण्याच्या उपायांत मौन मी, आणि ज्ञानवंतांत असणारें ज्ञानहि मीच आहें. ३८

यादवात मी वासुदेव आणि पांडवांत मी अर्जुन, हें भगवान् श्रीकृष्ण तटस्थ योगेश्वराच्या भूमिकेवरून सांगत आहेत. तसेंच मी मुनीमध्यें व्यास आहे, हेंहि व्यास ( गीताकार ) बादरायण व्यासासंबंधीं सांगत आहेत.

**यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन ।**
**न तदस्ति विना यत्स्यात् मया भूतं चराचरम् ॥३९॥**

**नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप ।**
**एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥४०॥**
**यद्यद्विभूतिमत् सत्वं श्रीमदूर्जितमेव वा ।**
**तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंशसंभवम् ॥४१॥**
**अथवा बहुनैतेन किं ज्ञानेन तवार्जुन ।**
**विष्टभ्याहमिदं कृत्स्नं एकांशेन स्थितो जगत् ॥४२॥**
**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**
**विभूतियोगो नाम दशमोऽध्यायः**

अर्जुना ! भूतमात्राचें बीज ( आदिकारण ) जें, तें मी आहें. माझ्या-शिवाय असूं शकेल अशी कोणतीहि चर किंवा अचर सृष्ट वस्तु नाहीं. ३९ हे वीरा ! माझ्या अलौकिक विस्ताराला मर्यादा नाहीं, हा माझ्या ऐश्वरी शक्तीचा विस्तार मी तुला केवळ थोडक्यांत सांगितला आहे. ४० जी जी ऐश्वर्ययुक्त, वैभवपूर्ण, आणि सामर्थ्यवान् वस्तु ( किंवा भाव ) आहे, ती ती माझ्याच ऐश्वर्याच्या अंशापासून झाली आहे असें पक्कें समज. ४१ अथवा, हे अर्जुना ! एवढें सर्व जाणण्यांत तरी काय विशेष आहे, ( थोडक्यांत ) मीच हें सर्व विश्व केवळ एकांशानें धारण करून आत्मस्वरूपीं स्थित आहें. ४२

" एतावानस्य महिमा अतो ज्यायांश्च पूरुषः पादोऽस्य विश्वा भूतानि, " " पुरुष एवेदं सर्वं ". जें कांहीं आहे तें परमात्म्याचें ऐश्वर्य आहे. त्या व्यतिरिक्त कांहींहि नाहीं. हा सर्व त्याच्याच योगमायेचा विस्तार आहे.

विभूतिविस्तर म्हणजे विश्वविस्तार, आणि योग म्हणजे विश्वांत विश्वेश्वर आत्मभावानें पाहणें, आणि त्या विश्वात्म्याशीं तन्मय होणें.

ज्या ऐश्वरी विभूतींनीं हे तीनहि लोक व्यापिले आहेत, त्या ध्यानार्थ आपणास सांगाव्या अशी अर्जुनाची प्रार्थना होती. त्रिलोकांत म्हणजे विश्वांत विश्वेश्वराचें स्वरूप ओळखणें, आणि विश्वांत विश्वेश्वराचे ऐश्वर्य पाहणें हें परम ज्ञान. या ज्ञानावर आधारित विश्वेश्वराचें ध्यान करून त्याच्या स्वरूपाशीं तल्लीन तदाकार होणें, हीच परम श्रेष्ठ भक्ति.

पुढील अध्यायांतील विश्वरूप दर्शनाची ही प्रस्तावना आहे.

---

# अध्याय अकरावा

## विश्वरूपदर्शन

अर्जुन उवाच--

**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ।**
**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥१॥**
**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।**
**त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥२॥**
**एवमेतद्यथाऽऽत्थ त्वं आत्मानं परमेश्वर ।**
**द्रष्टुमिच्छामि ते रूपं ऐश्वरं पुरुषोत्तम ॥३॥**
**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।**
**योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥४॥**

अर्जुन म्ह०--माझ्यावर कृपा करून तूं आत्मानात्मविवेकविषयक जो परमगुह्य असा उपदेश मला केलास, त्यानें माझा सर्व भ्रम नाहींसा झाला. १ हे कमलपत्राक्षा! तूं सविस्तर सांगितलेली भूतसृष्टीची उत्पत्ति आणि तिचा विलयहि मी ऐकिला, आणि (परमात्म्याचें) शाश्वत विशालत्वहि ऐकिलें. २ हे परमेश्वरा! तूं आपण स्वतः जशा प्रकारचा आहेस म्हणून सांगत आहेस, तसें आतां तुझें, हे पुरुषोत्तमा! ऐश्वर रूप पाहण्याची माझी इच्छा आहे. ३ हे प्रभो! मला तें पाहणें शक्य आहे, असें जर तुला वाटत असेल, तर योगेश्वरा! तुझें तें शाश्वत रूप मला दाखीव. ४

सातव्या अध्यायांत ज्ञानविज्ञान, आठव्यांत परब्रह्मस्वरूप आणि ब्रह्मस्वरूपाविष्कार, नवव्यांत ब्रह्मविद्या आणि भक्तिमाहात्म्य सांगून दाहव्यांत परब्रह्मस्वरूपाविष्कार (विश्वविस्तार) स्पष्ट केला. असें हें "गुह्यं अध्यात्मसंज्ञितम्" प्रत्यगात्माविष्काराचें सविस्तर वर्णन केल्यावर, आतां विश्वरूपानें ईश्वरस्वरूप दाखवावयाचें आहे. उत्पत्ति आणि विलयासंबंधीं नवव्या अध्या-

याच्या प्रारंभींच सांगितलें आहे, आणि आठव्या अध्यायांतहि श्लो. १८,१९ मध्यें ह्यासंबंधीं सांगितलें आहे. या तत्त्वविवेचनानंतर येथें आतां प्रत्यक्ष विश्वरूपदर्शन दिलें आहे.

श्रीभगवानुवाच—

**पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ।**
**नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥५॥**
**पश्यादित्यान् वसून् रुद्रान् अश्विनौ मरुतस्तथा ।**
**बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥६॥**
**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।**
**मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥७॥**

श्रीभगवान् म्ह०—हे पार्था ! हीं माझीं नाना प्रकारचीं अलौकिक आणि अनेक वर्ण, अनेक आकृतींचीं अगणित अनंत रूपें पहा. ५ हे भारता ! द्वादशादित्य, अष्टावसू, एकादशरुद्र, अश्विनीकुमारद्वय, मरुद्गण ( एकोणपन्नास ), आणखीहि अनेक कधींहि न पाहिलेलीं आश्चर्यकारक दृश्यें माझ्यांत पहा. ६ हे गुडाकेशा ! आज तूं माझ्याच स्वरूपांत येथें एकवटलेलें सर्व चराचर जगत् पहा, आणि दुसरेंहि जें जें म्हणून पाहण्याची तुझी इच्छा असेल, तें तें तुला ( माझ्याच स्वरूपांत ) येथें दिसेल. ७

विश्व हें अनेकविध आहे. रंगांचीं, प्रकाशांचीं, आकारांचीं यांत कल्पनातीत अशीं रूपें आहेत. तेहतीस देवता ( तेहतीस कोटि देव ), सप्तसप्त ( एकोणपन्नास ) मरुत् हे सर्व परमेश्वराच्या स्वरूपांतच आहेत. सर्व विश्व त्याच्यांत आहे, आणि तोच सर्व विश्वाचा आधार आहे.

**न तु मां शक्यसे द्रष्टुम् अनेनैव स्वचक्षुषा ।**
**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥८॥**

पण तुला हें सर्व तुझ्या या चर्मचक्षूंनीं दिसणें शक्य होणार नाहीं, म्हणून तुला आतां मी दिव्यदृष्टि देतों. माझें हें ईश्वरी सामर्थ्य पहा. ८

ज्ञानचक्षूंनींच या विश्वाचें कौतुक पाहतां येईल. बहिरंग डोळयांना दिसेल, त्यापेक्षां या डोळयांना न दिसणारें असें आश्चर्यकारक कितीतरी विश्वांत भरलेलें आहे. तें बुद्धिगम्य आहे आणि बुद्धीसहि अगम्य त्यांत पुष्कळ आहे. भौतिक शास्त्रांना निसर्गाचीं आश्चर्ये आधुनिक यंत्रांच्या साहाय्यानें अनेक दिसतात, पण यांहिपलीकडे अत्यंत आश्चर्यकारक अनंत विश्व आहे.

संजय उवाच—

**एवमुक्त्वा ततो राजन् महायोगेश्वरो हरिः ।**
**दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ९ ॥**

सञ्जय म्ह०—हे राजा धृतराष्ट्रा! इतकें बोलून नंतर त्या महायोगेश्वर श्रीकृष्णानें आपलें तें महान् ऐश्वर विश्वरूप पार्थाला दाखविलें. ९

हें विश्व ईश्वराच्या योगमायेचा आविष्कार आहे. हाच तो ऐश्वरयोग, आणि ईश्वर हाच महायोगेश्वर, ज्याचें अनिर्वाच्य सामर्थ्य विश्वांत प्रतीत होतें.

**अनेकवक्त्रनयनं अनेकाद्भुतदर्शनम् ।**
**अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥१०॥**
**दिव्यमाल्यांबरधरम् दिव्यगंधानुलेपनम् ।**
**सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥**
**दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।**
**यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥१२॥**
**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।**
**अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा ॥ १३ ॥**
**ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः ।**
**प्रणम्य शिरसा देवं कृतांजलिरभाषत ॥ १४ ॥**

अनेक मुखें आणि डोळे असलेलें, अनेक चमत्कारिक स्वरूपांचें, अनेक अलौकिक अलंकार धारण केलेलें, आणि अनेक अलौकिक शस्त्रांनीं सज्ज असलेलें तें विश्वरूप, १० अलौकिक पुष्पें आणि वस्त्रें धारण केलेलें, अलौकिक गंधांची उटी लावलेलें, सर्व आश्चर्यमयवस्तु जेथें एकवटल्या

आहेत असें तें, सर्वव्यापी अनंत विश्वात्म्या परमेश्वराचें रूप (त्याला दाखविलें). ११ आकाशांत सहस्रसूर्यांची प्रभा एकवटून उद्‌भूत झाल्यास, ती त्या महात्म्याच्या (विश्वरूपाच्या) तेजासारखी कदाचित् दिसूं शकेल. १२ अखिल विश्वांत अनेक रूपांनीं प्रतीत होणारें सर्व जगत् एकाच ठिकाणीं त्या देवाधिदेवाच्या स्वरूपांत अर्जुनाला दिसलें, १३ तेव्हां आश्चर्यानें रोमांचित होऊन, त्या विश्वरूपास साष्टांग प्रणिपात करून, हात जोडून अर्जुन म्हणाला. १४

अनेकविध तोंडें आणि डोळे, आणि अनेकविध हात-पाय असलेले असें तें विराट् विश्वरूप आहे. "सहस्रशीर्षाः पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात्" असें तें रूप आहे. येथें ईश्वराच्या (जगदीश्वराच्या) भव्य, अनंत, तेजोमय, अलौकिक रूपाचें वर्णन आहे. मागील चार अध्यायांत ज्या रूपाचें शाब्दिक वर्णन केलें, त्याचेंच येथें साक्षात् दर्शन आहे. व्यक्त विश्व हें अव्यक्त विश्वेश्वराचेंच दृश्यरूप आहे. विश्वांतच सर्वेश्वर, सर्वसाक्षी, सर्वांतर्यामी, सर्वात्मा पाहावयाचा, हेंच विश्वरूप-दर्शनाचें तत्त्व आहे. या विश्वरूपांत अर्जुनानें "जगत्" म्हणजे सारखें परिवर्तन पावणारे विश्वेश्वराचे रूप पाहिलें. विश्व हें विपर्यय—परिवर्तन—विवर्तन-शील आहे, हाच सांगण्याचा आशय आहे.

अर्जुन उवाच—

**पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ।**
**ब्रह्माणमीशं कमलासनस्थं ऋषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥१५॥**
**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम् ।**
**नान्तं न मध्यं न पुनः तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप ॥१६॥**
**किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमंतम् ।**
**पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समंतात् दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥१७॥**

अर्जुन म्ह०—हे देवा! तुझ्या स्वरूपांत सर्व देव, सर्व बहुविध (स्थावर जंगम) सृष्ट पदार्थांचे समुदाय, कमलासनस्थ ब्रह्मदेव, सर्व ऋषिगण, आणि दिव्य (स्वर्गीय) नागहि मला दिसत आहेत. १५

अनेक बाहू, उदरें, तोंडें, डोळे असलेला, सर्वत्र अनंत रूप असा तूं मला दिसत आहेस; हे विश्वेश्वरा, विश्वरूपा! तुझ्या आदि मध्य अंताचें मला आकलन होत नाहीं. १६. किरीटी, गदाचक्रधारी, महातेजस्वी, सर्वदिशांनीं अत्यंत दैदीप्यमान, कोणत्याहि बाजूनें दृष्टीस अगम्य, अत्यंत तेजोमय, अग्नि–सूर्याप्रमाणें प्रभावान्, आणि दुर्ज्ञेय असा मला तूं दिसत आहेस. १७

या तीन श्लोकांत विश्वेश्वराचें भव्य विश्वरूप वर्णिलें आहे. जें जें कांहीं दृश्य आणि अदृश्यहि आहे, तें सर्व ईश्वरस्वरूपांत आहे. सृष्टींतील अनेकविध प्राण्यांचे चमत्कारिक अवयव, ते सर्व त्या ईश्वराचेच अवयव, असा तो " अनेकबाहूदरवक्त्रनेत्र " आहे. प्राणिमात्रांतील जीवनतत्त्व, त्यांच्यांतलि शक्ति, प्रभाव, विभव सर्व कांहीं त्या परमेश्वराचेंच, असा तो सर्वधाता समष्टिरूप आहे. सर्व व्यष्टिजात त्यांच्यांतच वर्तमान आहे. शङ्खचक्रगदाधारी त्याचेंच रूप, आणि विश्वरूप विश्वात्माहि तोच. दुर्निरीक्ष्य असें अत्यंत तेजस्वी अनंत सूर्यांचें तेजहि त्याचेंच, आणि अंधकारहि पण त्याचेंच रूप; अंधकाराशिवाय तेजालाहि रूप नाहीं, कारण सृष्टींतील प्रत्येक वस्तु सापेक्षतेनेंच प्रतीत होते.

**त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।**
**त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वम् पुरुषो मतो मे ॥१८॥**
**अनादिमध्यान्तमनन्तवीर्यं अनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।**
**पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपंतम् ॥१९॥**

( मुमुक्षूंच्या ) ज्ञानाचा परम विषय जें परम अक्षर (परब्रह्म), तें तूंच आहेस, आणि तूंच या विश्वाचें एकच एक आश्रयस्थान आहेस. तूं नित्यस्वरूप, आणि नित्य धर्मांचें रक्षणकर्ता, आणि तूंच सनातन (शाश्वत) पुरुष आहेस असें मी मानतो. १८ आदि–मध्य–अंतरहित, महाप्रतापवान्, अनंतहस्त, चंद्रादित्यनयन, आणि आपल्या दिव्य तेजानें सर्व विश्व प्रकाशित करणारा ज्वलदग्निवदन असा तूं मला दिसतोस. १९

ज्ञानाचा परम विषय तो विश्वेश्वर विश्वात्मा सर्वव्यापी सनातन परमात्मा आहे, आणि आखिल विश्वाचा आधारहि तोच आहे. पुनः पुनः हेंच सांगावयाचें आहे कीं, हें विश्व त्या परब्रह्मांतच दिसतें, किंवा भासमान होतें; शाश्वतधर्मानेंच ह्या विश्वाचें अस्तित्व आणि सातत्य आहे, आणि हें विश्व परब्रह्माचाच आविष्कार आहे हें दृश्य जगत् केव्हां, कसें, आणि कां झालें, हे प्रश्न अनेक रीतींनीं, कांहीं लौकिक तर कांहीं अलौकिक अशा तत्त्वानुसार, चर्चिले गेले आहेत. वस्तुतः " हें झालेंचि नाहीं," " हें आहेच," सनातन अनाद्यनंत आहे. पण ह्याचें बहिरंग मात्र प्रतिक्षण बदलत आहे. शशिसूर्य ईश्वराचे नेत्र म्हटले आहेत. सूर्य अनंत आहेत, आणि चंद्रहि अनंतानंत आहेत. विश्वरूपहि तसेंच अनंत अनाकलनीय आहे.

**द्यावापृथिव्योरिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।**
**दृष्ट्वाऽद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥२०॥**

पृथिवी आणि स्वर्गामधील अंतरिक्ष, आणि दशदिशा तूंच तूं व्यापून आहेस; हे महापुरुषा ! तुझें हें भयंकर आणि विस्मयजनक रूप पाहून तिन्ही लोक भीतीनें घाबरून गेले आहेत. २०

वर स्वर्ग ( द्युलोक ) आणि खालीं पाताल, मध्यें हा भूलोक ( मर्त्यलोक ) असा सर्व साधारण समज आहे. वास्तविक आपला हा मर्त्यलोक इतका क्षुद्ररूप आहे कीं महासागरांतलि एका वालुकाकणाइतकाच तो ह्या अफाट विश्वाच्या मानानें आहे, असें म्हणतां येईल. पण असे अनंत मर्त्यलोक असतील. अनंतत्व हेंच ह्या विश्वाचें रूप. ह्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे आश्चर्यानें, आणि आपल्या क्षुद्रतेच्या जाणिवेनें, चित्त अत्यंत भयाभीत आणि संकुचित होतें. पण या अनेकत्वामागें आणि विविधतेंतहि, एकच एक तत्त्व आहे. हे जीव त्याच एका तत्त्वाचे अंशभूत आहेत, असें समजल्यावर भय तरी कोठून ? आणि कोणाचें ? एकच एक परमात्मा, दुसरें कांहीं नाहींच. भीती नाशाची, पण सर्व एकच एक, नाश तरी कशाचा ?

**अमी हि त्वां सुरसंघा विशन्ति केचिद्भीताः प्राञ्जलयो गृणन्ति ।**
**स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः स्तुवन्ति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः**

**रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।**
**गंधर्वयक्षासुरसिद्धसंघाः वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥२२॥**

हे अनेक देव तुझ्या स्वरूपांतच प्रविष्ट होत आहेत, कांहीं तर भीतीनें हात जोडून तुझी करुणा भाकीत आहेत, महर्षी आणि सिद्धगण जगताचें कल्याण होवो असें म्हणत, अनेक स्तोत्रांनीं तुळा स्तवीत आहेत. २१ एकादशरुद्र, द्वादशादित्य, अष्टावसु, द्वादश साध्यदेव, विश्वेदेव, अश्विनी-कुमारद्वय, सप्तसप्त मरुद्गण, पितृगण, गंधर्व, यक्ष, असुर आणि सिद्धांचे संघ, हे सर्वच तुला आश्चर्यानें पहात आहेत. २२

सर्व देव त्या परमात्म्यांतच आहेत. हे देव परमेश्वराच्या मायेचीं (शक्तीचीं) विविध रूपें आहेत. वायु, सूर्य, अग्नि, इंद्र, यम इत्यादि देव त्याच्या भीतीनेंच आपापलीं कामें चोखपणें करीत आहेत. " भीषाऽस्माद्वातः पवते । भीषोदेति सूर्यः । भीषाऽस्मादग्निश्चेंद्रश्च । मृत्युर्धावति पञ्चम इति । " तै. ब्र. ८. महर्षी आणि सिद्ध हे विशाल विश्वरूप पाहून " सर्वेऽपि सुखिनः सन्तु " म्हणत त्या विश्वेश्वराचें गुणगान करीत आहेत.

**रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ।**
**बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाऽहम् ॥२३॥**
**नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।**
**दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितांतरात्मा धृतिं न विंदामि शमं च विष्णो ॥**
**दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसंन्निभानि ।**
**दिशो न जाने न लभे न शर्म प्रसीद देवेश जगन्निवास ॥२५॥**

हे महाबाहो ! तुझें हें अनेकमुखनयन, अनेक बाहू, अनेक मांड्या आणि पाय, अनेक उदरें, आणि अनेक दाढासुळ्यांनीं विक्राळ दिसणारें महाभयंकर रूप पाहून, सर्व जीवलोक घाबरून गेला आहे, आणि मीहि तसाच घाबरलों आहें. २३ अंतरिक्षास जाऊन भिडणारें, अत्यंत

दैदीप्यमान, अनेकरंगांचें, विस्तारित मुखांचें, तेजस्वी विशाल नेत्रांचें रूप पाहून माझें हृदय भयकम्पित झालें आहे. हे विष्णो ! तुझें हें असें रूप पाहून माझें धैर्य आणि शांति दोन्ही हरपलीं. २४ या दाढासुळ्यांनीं भयानक, आणि प्रलयकालाच्या अग्नीप्रमाणें तळपणारी तुझीं हीं वदनें पाहून माझें दिशांचें भान हरपलें, मला कोठें आश्रय स्थान दिसत नाहीं; हे जगन्निवासा ! आतां माझ्यावर करुणा कर. २५

हें विश्वेश्वराचें रौद्र भयानक विराट स्वरूप आहे. ह्या विराटपुरुषाचीं मुखें, बाहू, माड्या, आणि पाय संसाराची (समाजाची) विविध अंगें आहेत. अनेक उदरें आणि दंष्ट्राकराल मुखें, प्राणिसृष्टींत "जीवो जीवस्य जीवनम्" दाखवितात. सर्वच प्राणी दुसऱ्यांना खाणारे, आणि स्वतः खाल्ले जाणारेहि आहेत. असा हा जीविताचा पसारा आहे. अन्न आणि अन्नाद दोन्ही तेच प्राणी आहेत. या जीवनक्रमात कांहींचा नाश तर कांहींचा परिपोष असें हें सारखें चालूच आहे. हा क्रम पाहून मन भयभीत होतें, पण यावरच जगताची स्थिति आणि सातत्य अवलंबून आहे. कालाचें तोंड सारखें उघडेंच आहे, त्यांत सर्व प्राणी सारखे दिव्यावर पतंगाप्रमाणें पडून गडप होत आहेत, आणि नवे त्यांतूनच निघत आहेत.

**अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसंघैः ।**
**भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथाऽसौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥२६॥**
**वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति दंष्ट्राकरालानि भयानकानि ।**
**केचिद्विलग्ना दशनांतरेषु संदृश्यन्ते चूर्णितैरुत्तमाङ्गैः ॥२७॥**
**यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति ।**
**तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति॥२८॥**
**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा विशन्ति नाशाय समृद्धवेगाः ।**
**तथैव नाशाय विशन्ति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः॥२९॥**

(साहाय्यार्थ आलेल्या) सर्व राजसंघासह हे धृतराष्ट्रपुत्र, भीष्म, द्रोण, कर्ण, आमच्याकडील सर्व मुख्य वीरांसह, २६ तुझ्या दाढासुळ्यांनीं भयंकर अशा ह्या भयानक वदनांत भराभर शिरत आहेत, कांहीं

तर डोक्यांचा चुराडा होऊन दातांच्या सापटींत चिकटलेले दिसत आहेत. २७ ज्याप्रमाणें सरितांचे अनेक धावते लोंढे वेगानें धडकत समुद्रांतच थेट जाऊन भिडतात, त्याप्रमाणें मनुष्यलोकांतील हे सर्व योद्धे तुझ्या धगधगणाऱ्या मुखांत शिरत आहेत. २८ जसे पतंग अत्यंत आवेशानें धगधगित आगींत केवळ आत्मनाशार्थच उड्या घेतात, तसाच हा जीवलोक तुझ्याहि मुखांत महदावेगानें नाशार्थच शिरत आहे. २९

कथानुसंधानास धरून या रौद्ररूपाच्या वर्णनांत, कौरवांकडील वीर (भीष्म द्रोण कर्णासह), आणि पांडवांच्या सेनेंतीलहि महान् योद्धे कसे या काळाच्या मुखांत गडप्प होणार आहेत, हें सांगितलें आहे. कालाच्या तडाख्यांतून तर कोणीच सुटत नाहीं. सर्व नद्यांच्या ओघांचा शेवट जसा समुद्रांत, तसा सर्व प्राण्यांचा शेवट काळाच्या मुखांत अपरिहार्य आहे. त्यांतल्या त्यांत हे अभियोगानें लढणारे वीर तर त्यांच्या युयुत्सुत्वानें आपणच होऊन काळाच्या तोंडांत उडी घेत आहेत, आपणच आपल्या नाशास कारण होत आहेत.

**लेलिह्यसे ग्रसमानः समन्ताल्लोकान् समग्रान् वदनैर्ज्वलद्भिः ।**
**तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासः तवोग्राः प्रतपन्ति विष्णो ॥३०॥**
**आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।**
**विज्ञातुमिच्छामि भवंतमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥३१॥**

तूं आपल्या ज्वलद्वदनांनीं अखिल जगताला खाऊन टाकून, चाटून पुसून नाहीसें करीत आहेस. हे विष्णो ! तुझी ही रौद्र कांति अखिल जगताला तेजानें व्यापून प्रखर तळपत आहे. ३० हे देवेशा ! तुला माझा नमस्कार असो. शांत हो. तूं हा भयानकरूप आहेस तरी कोण ? मूलकारण जो तूं, त्या तुलाच जाणण्याची माझी इच्छा आहे, कारण, तुझ्या या रूपाचा तर अभिप्रायच मला कळत नाहीं. ३१

सर्वांतक काळापुढें कांहींच टिकत नाहीं. अखिल जगताचा विलय त्या महाकालांत होत आहे. त्याच्या प्रखर तेजांत सर्व सृष्टजात वितळून जात आहे. या उग्र महाकालाचें भय कोणास वाटणार नाहीं ? पण यांतच सृष्टीची

उत्पत्ति, अस्तित्व आणि सातत्य आहे. विनाशांतूनच संभूति, आणि ही संभूति चालत राहण्यास विनाशहि आवश्यकच आहे.

श्रीभगवानुवाच—

**कालोऽस्मि लोकक्षयकृत् प्रवृद्धो लोकान् समाहर्तुमिह प्रवृत्तः ।**
**ऋतेऽपि त्वां न भवष्यन्ति सर्वे येऽवंस्थिताः प्रत्यनीकेपु योधाः॥ ३२**
**तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून् भुंक्ष्व राज्यं समृद्धम् ।**
**मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३॥**
**द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान् ।**
**मया हतांस्त्वं जहि मा व्यतिष्ठा युध्यस्व जेताऽसि रणे सपत्नान्॥**

श्रीभगवान् म्ह०—सर्वलोकक्षयार्थ वाढून पसरणारा मी महाकाल आहें. येथें मी लोकसंहार करावयासच सज्ज झालों आहें; तूं आतां कांहींहि केलें नाहीस तरी ह्या दोन्ही सैन्यातील युद्धास प्रवृत्त झालेले हे सर्व लढवय्ये कांहीं जिवंत राहणार नाहींत. ३२ तर यग युद्धास सज्ज हो, जय मिळीव, आणि शत्रूंना जिंकून वैभवपूर्ण राज्याचा उपभोग घे. ह्यांना ( तुझ्या शत्रूंना ) मीं ( महाकालानें ) कधीच मारून टाकलें आहे. हे सव्यसाची ! तूं आतां ( याना मारण्यास ) निमित्त मात्र हो. ३३ द्रोण, भीष्म, जयद्रथ, कर्ण आणखी दुसरेहि लढाऊ वीर मीच (कालानेंच) मारलें आहेत, त्यांना तूं मार. मनांत कांहीं शंका न आणतां लढाईला तोंड दे, तू शत्रूंना रणांत जिकशीलच. ३४

लढाईच्या मैदानावर ईश्वराचें महाकालरूपच प्रगट होत असतें. लढण्यास प्रवृत्त झालेला प्रत्येक वीर मरणाच्या तोंडांतच उडी घालीत असतो. त्यानें स्वतः प्राणार्पण केलें असल्यामुळें त्याच्या हत्त्येचें पातक त्याच्या विरुद्ध बाजूनें लढणाऱ्या वीरास लागत नाहीं. लोभानें, द्वेषानें, नृशंस्यानें घात करणारास पातक लागतें, पण न्याय्य उद्दिष्टासाठीं कर्तव्य बुद्धीनें त्यागपूर्वक कर्म करणारास पाप लागत नाहीं. प्रत्येक योद्धा प्राणपणानेंच लढावयास आलेला असल्यानें, कालपुरुषानें जणूं मारलेलाच होता. आतां त्याला मारण्यास अर्जुन केवळ निमित्त मात्र होणार होता.

संजय उवाच—

**एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृतांजलिर्वेपमानः किरीटी ।**
**नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥३५॥**

संजय म्ह०—श्रीकृष्णाचें हें वचन ऐकून अर्जुन हात जोडून कांपत कांपत श्रीकृष्णाला पुनः पुनः नमस्कार करून भीतभीत गद्गदस्वरानें म्हणाला. ३५

अर्जुन उवाच—

**स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च ।**
**रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति सर्वे नमस्यन्ति च सिद्धसंघाः ॥**

हे हृषीकेशा ! तुझ्याच माहात्म्याच्या संकीर्तनश्रवणानें जगत् आनंदित होतें, आणि तुझ्या ठिकाणीं अनुरक्त होतें, हें योग्यच आहे. दुष्टात्मे तुला भिऊन दशदिशांना पळून जातात, आणि सर्व सिद्धगण तुला नमस्कार करतात. ३६

**कस्माच्च ते न नमेरन् महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।**
**अनन्तदेवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥३७॥**

हे पुरुषोत्तमा ! त्या सिद्धगणांनीं या आदिपुरुष ब्रह्मदेवाच्याहि आदिकर्त्याला कां बरें नमस्कार करूं नये? हे अनन्त देवांच्या ईशा ! जगन्निवासा ! तूंच सत् (मूळ कारण) आणि असत् ( सृष्ट जगत् ) आहेस, आणि ह्याहि पलीकडचें अक्षर ( ब्रह्म ) तूंच आहेस. ३७

आदिकारण ब्रह्मांतच विश्वरूप प्रतीत होतें. प्रत्येक जीव आपापल्यापरी हें जगत् पाहतो. जगत् कसें आहे, परमार्थतः त्याचे रूप काय आहे, हें सम्यक् ज्ञानानेंच कळेल. वस्तुतः हें जगत्, हें क्षणोक्षणीं बदलत जाणारें दृश्य, हें कांहीं विश्वविस्ताराचें खरें स्वरूप नव्हे. हें बाह्य दृश्य आहे. ईश्वराची योगमाया हेंच यांच्या मुळाशीं तत्त्व आहे. सत् आणि असत्, मूलकारण आणि हा दृश्य विस्तार, दोन्ही तो सर्वकारण परमात्माच आहे. व्यक्त जगत् आणि अव्यक्त आदिकारण दोन्ही तोच, पण त्याचें खरें स्वरुप " अक्षरात् परतः परः " असें आहे, तें बुद्धीसहि अनाकलनीय आणि अगम्य आहे.

**त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।**
**वेत्ताऽसि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनंतरूप ॥३८॥**

तूंच सर्वांचा आदिदेव आहेस, तूंच पुराणपुरुष (सर्वांत ज्येष्ठ, श्रेष्ठ, अनादि) आहेस. या विश्वाचा तूंच एकमेव आधार आहेस (सर्व सृष्टजात तुझ्यांतच आहे). ज्ञाता आणि तें ज्ञेय परमपद तूंच आहेस. हे अनन्तरूपा ! तूंच हें सर्व विश्व (अन्तर्बहिः) व्यापून आहेस. ३८

" नासदासीन्नो सदासीत्तदानीम् ", सत्‌हि नव्हतें आणि असत्‌हि नव्हतें, तोच तो एकच एक होता. तर मग तो होता, हें तरी कळलें कोणाला ? कोणीच, कांहींच दुसरें नव्हतें ना ? मग हें असें विधान तरी कोण करूं शकतो? वेत्ताच नव्हता तर वेद्य तरी कसें होतें ? तोच तो होता असा काल तरी होता काय ? तो तरी कसा असेल ? कलनेशिवाय कलनीय काल कसा असूं शकेल ? " अक्षय काल " मात्र होताच. तोच तो अनादि अनाकलनीय विश्वात्मा, त्याचा आदि कोणी पाहिला ? विश्व होतें त्यांतच, आहेहि त्यांतच, आणि त्यापासून वेगळेंहि नाहीं. तो नाहीं असें स्थानच नाहीं. तो वेद्य आहे, पण वेत्ता तरी दुसरा कोण असूं शकेल ? जोंपावेतों अपरोक्ष, प्रत्यक्ष, सानुभव-ज्ञान, तन्मयता, आणि तत्ता नाहीं, तों पावेतोंच ज्ञाता आणि ज्ञेय यांचें वेगळेंपण आहे. खरें प्रत्यक्ष ज्ञान झाल्यावर ज्ञाता, ज्ञेय, आणि ज्ञान सर्व केवलज्ञानांत विलय पावतात. परमात्मा भूतात आहे, भूतांच्या बाहेरहि आहे; वस्तुतः येथें आंत बाहेर असें कांहींच नाहीं. " अंतर्बहिश्च तत्सर्व व्याप्य नारायणः स्थितः" असा हा " सर्वात्मा सर्ववित् सर्वः सर्वगः सर्वभावनः " आहे. देही जीव स्वतःला (व्यक्तीला) जगतापासून वेगळा समजतो, म्हणून त्याच्या ज्ञानाचा विषय जसें जगत्, तसाच तो परमात्माहि त्याच्या ज्ञानाचा (सम्यक् ज्ञानाचा) विषय होऊं शकतो. पण परोक्षता नाहींशी झाल्यावरच तें ज्ञान पूर्ण होतें. तोंपावेतों तें सापेक्ष (अपूर्णच) असते. वेगळेपणा (व्यक्तिमत्व) नाहींसा झाल्यावरच पूर्ण (साक्षात् अपरोक्ष) ज्ञान होईल.

**वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।**
**नमो नमस्तेस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥३९॥**

**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।**
**अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥४०॥**

वायुदेव, यमधर्म, अग्नि, वरुण, चंद्र, ( कश्यपादि ) प्रजापति, आणि पितामहाचा (ब्रह्मदेवाचा) पिताहि तूंच आहेस. तुला सहस्रशः प्रणाम. तुला पुनः पुनः प्रणाम. ३९ तुला सन्मुख नमन, आणि मागूनहि नमन असो. हे पूर्णा ! सर्व दिशांनाच मी तुला नमन करतो. तुझें बल अनंत, पराक्रमहि अनंत आहे. तूंच सर्व व्यापून आहेस, आणि तूंच सर्वत्र भरलेला आहेस. ४०

वायु, यम, अग्नि, वरुण, चंद्र इत्यादि सर्व देवता, प्रजापति, ब्रह्मदेव, सर्वच ईश्वर आहे. जें जे पूजास्थान तें तें ईश्वरचें आहे. भक्त आपल्या श्रद्धेप्रमाणें ईश्वररूप कल्पून त्याचें पूजन करतो. " येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयाऽन्विताः तेऽपिमामेव कौंतेय यजन्त्यविधिपूर्वकम्, " श्रद्धेप्रमाणें उपासकाला फलहि मिळतें. ईश्वरच सर्व कांहीं आहे. मग त्याला नमस्कार तरी कोणत्या दिशेकडे करावयाचा ? तो तर दिक्कालातीत आहे. स्वांतःकरणांत असलेल्याला त्याला आपल्या हृदयांतच नमन होऊं शकतें, तो सर्वांतर्यामी आहे.

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।**
**अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वाऽपि ॥४१॥**
**यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।**
**एकोऽथवाऽप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥४२॥**
**पिताऽसि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।**
**न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः ॥**

तूं माझा मित्र आहेस असें मानून मी आग्रहानें " कृष्णा, अरे यादवा, अरे गड्या " असें जें तुझा महिमा न जाणल्यामुळें, उद्धटपणानें किंवा प्रेमानें, संबोधिलें असेल, ४१ हिंडतां फिरतांना, शयनावर, आसनावर, खातांपितांना, हे अच्युता ! एकांतात किंवा इतरांसमोर ( आपल्या मनां-तच, किंवा प्रत्यक्ष तुझ्या तोंडावर ) थट्टेनें जो तुझा अवमान केला असेल,

त्याबद्दल, हे अविज्ञेया ! तुझी मी क्षमा मागतों. ४२ तूंच चराचर विश्वाचा पिता आहेस, तूंच या जगाचा परमपूज्य श्रेष्ठ गुरु आहेस, या जगतांत तुझ्यासारखा तर कोणीच नाहीं, मग तुझ्यापेक्षां श्रेष्ठतर, अत्यंत प्रभावी, असा दुसरा कोणी कसा असूं शकेल ? ४३

हें विश्वरूप अर्जुनास श्रीकृष्णांनीं आपल्याच ठिकाणीं ज्ञानचक्षूंनीं दाखविलें. सर्व जगताचा श्रेष्ठतर पूज्य गुरु हें कृष्णाचें स्वरूप अर्जुनानें ओळखलें, म्हणून पूर्वीं थट्टेनें केलेल्या अवमानाबद्दल अर्जुन क्षमा याचीत आहे. अर्जुनाने श्रीकृष्णास परमात्मरूपानें पाहिलें. अर्जुन शिष्याच्या नात्यानें श्रीकृष्णाला शरण गेला आहे, आणि पूर्वींचें मित्रत्वाचें बरोबरीचें नातें तो बाजूस करून बोलत आहे.

**तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।**
**पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥४४॥**
**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।**
**तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥४५॥**
**किरीटिनं गदिनं चक्रहस्तं इच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।**
**तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥४६॥**

( असे मी अनेक अपराध केले आहेत ) म्हणून हे परमपूज्य परमेश्वरा ! तुला प्रणाम करून, सर्व शरीर अत्यंत नमवून, तुझी मी करुणा भाकतों. पिता पुत्राच्या, आणि मित्र मित्राच्या कल्याणार्थ, तसा तूं प्रियकरा देवा ! माझ्या कल्याणार्थ मला क्षमा कर. ४४ कधींहि पूर्वीं न पाहिलेलें तुझें हें स्वरूप पाहून माझा देह रोमांचित झाला आहे, तसेंच भयानें मनहि अत्यंत व्यथित झालें आहे, म्हणून हे देवदेवेशा ! जगन्निवासा ! कृपा कर, आणि मला पूर्वींचें तुझें मानुष रूप दाखीव. ४५ मुकुटमंडित चक्रगदाधारी असेंच तुझें पूर्वींचें रूप पाहण्याची माझी इच्छा आहे, हे सहस्रबाहो ! विश्वमूर्ते ! तेंच चतुर्भुज रूप धारण कर. ४६

" प्रियः प्रियाय " म्हणजे " वत्सलः वात्सल्याय यथा तथा ", भक्तवत्सल भगवान् भक्ताच्या प्रेमासाठीं, कल्याणासाठीं, भक्तांचे सर्व अपराध पोटांत

घालतो. ईश्वराचें विश्वरूप अत्यंत संतोषदायक, तसेंच त्याचें रौद्र रूप हृदयास कंप आणणारें आहे. म्हणून भक्ताला "सगुण साजिरें" रूप आवडतें. सर्व भूतहितत्व आणि वात्सल्य (प्रेमळपणा) हींच त्या विश्वरूपाची बाजू भक्ताला हवी. सहस्रबाहु विश्वमूर्तीपेक्षां शङ्खचक्रगदाधारी वनमालाविभूषित रूपच आकलनास सोपें, तें मनास आवडतें आणि चित्तास प्रसन्न करतें. विश्वरूप जाणूनहि त्यांतील स्नेहभावित सगुण रूपच भक्त आपल्या भक्तीचा विषय करतो. त्यापासूनच भक्ताच्या चित्तास प्रसन्नता लाभते. भक्तीचें लक्षण "सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा", "अमृतरूपाच", "यल्लब्ध्वा पुमान् सिद्धो भवति अमृतो भवति तृप्तो भवति" असें आहे. हें सर्व ईश्वराच्या सगुण भक्तीनें प्राप्त होतें.

श्रीभगवानुवाच—

**मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।**
**तेजोमयं विश्वमनंतमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥४७॥**
**न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।**
**एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥४८॥**
**मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ।**
**व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥४९॥**

श्री भगवान् म्ह०--हे अर्जुना! तुझ्यावर प्रसन्न होऊन, (अनुग्रह करण्यासाठीं) हे महान् दिव्य(प्रकाशमय), सर्वव्यापी, अनाद्यनंत असे विश्वरूप, तुझ्यापूर्वीं कोणीच न पाहिलेलें, मी तुला आपल्या ऐश्वर्याच्या सामर्थ्यानें दाखविलें. ४७ हे कुरुवीरा! केवळ वेदाध्ययनानें, यज्ञयागानें, शास्त्राध्ययनानें, दानक्रियेनें, विहितकर्माचरणानें, किंवा खडतर तपश्चर्येनेंहि या मानव लोकांत असें हें विश्वरूप तुझ्याशिवाय कोणासहि पाहतां येणें शक्य नाहीं. ४८ माझें असें हें भयंकर रौद्र रूप पाहून व्यथित होऊं नकोस (भिऊन जाऊं नकोस), आणि चित्ताला व्यामोह होऊं देऊं नकोस, भीति सोडून प्रसन्न चित्त होऊन, आतां पुनः माझें तेंच पूर्वींचें (मानुष किंवा शंखचक्रधारी) रूप पहा. ४९

परमात्मस्वरूपाचें सम्यक् ज्ञान झाल्यावरच परमेश्वराचें विश्वरूपदर्शन होऊं शकेल. सर्वांठायीं तो एकच परमात्मा वास करीत आहे, ही आत्मप्रतीति झाल्यावरच विश्व आणि विश्वेश्वर एकच हें पटेल, आणि विश्वांतच विश्वेश्वराचें दर्शन झाल्यावर, आपणहि ह्या विश्वांतच असल्यामुळें, आपला अहंभाव नाहींसा होऊन, सर्वत्र एकच एक परमात्मा दिसूं लागेल; या विश्वरूपदर्शनानें द्वंद्वच शिल्लक राहणार नाहीं. मग अंधकारास जागाच नाहीं, सर्वच अखंड प्रकाश, एकच अनाद्यनंत परब्रह्म. श्रीभगवद्गीतेची ही विशिष्ट मौलिक शिकवण आहे. दुसऱ्या मार्गांनीं सद्गति मिळेल, परंतु हें ज्ञानाधिष्ठान याच विश्वरूपदर्शनानें प्राप्त होईल. या रौद्र विश्वरूपदर्शनानें भीति वाटेल, परंतु सर्व कांहीं एकच एक झाल्यावर भीतीला तरी अवकाश कोठचा ? अन्न आणि अन्नाद दोन्ही तोच परमात्मा, हा सृष्टिक्रम विश्वाच्या सातत्याला अपरिहार्यच आहे. अन्नाशिवाय जीवन नाहीं, आणि अन्नहि पण जीवनातच. हें ज्ञान झाल्यावर ईश्वरासंबंधीं वैषम्यनैर्घृण्याचा आरोपहि आपोआपच गळून पडतो. हें रौद्र विश्वरूप भावनेला आणि उपासनेला मात्र आवडणार नाहीं भक्तीला सौम्य प्रेमळ भावच पाहिजे, म्हणूनच तें "सगुण साजिरें" शङ्खचक्रगदाधारी रूप भक्तासाठीं अवतरलें आहे. प्रेमळ भक्ताला हेंच गोजिरें रूप आवडणारें आहे. ज्ञानाच्या दृष्टीनें रौद्र गंभीर विश्वरूप, परंतु भक्तिभावासाठीं परमेश्वर, भक्ताच्या आवडीप्रमाणें, तेंच शात प्रेमळ सौम्य सगुण रूप धारण करतो.

संजय उवाच—

**इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भुयः ।**
**आश्वासयामास च भीतमेनं भुत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥५०॥**

संजय म्ह०—ह्याप्रमाणें असें बोलून श्रीवासुदेवानें पुनः अर्जुनाला निजरूप ( श्रीकृष्णरूप ) दाखविलें, आणि पूर्ववत् सौम्यरूप श्रेष्ठ पुरुष होऊन त्या भ्यालेल्या अर्जुनाचें चित्त शांत केलें. ५०

अर्जुन उवाच—

**दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।**
**इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥५१॥**

अर्जुन म्ह०—हे जनार्दना ! हें तुझें शांत (प्रसन्न) मानवरूप पाहून, आतां माझें चित्त ठिकाणावर आलें, आणि मी माझ्या स्वाभाविक स्थितीवर आलों. ५१

श्रीभगवानुवाच—

**सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।**
**देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ॥५२॥**
**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।**
**शक्य एवंविधो द्रष्टुम् दृष्टवानसि मां यथा ॥५३॥**
**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**
**ज्ञातुं द्रष्टुंच तत्त्वन प्रवेष्टुं च परंतप ॥५४॥**

श्री भगवान म्ह०— हें जें माझें पाहावयास अलभ्य असें रूप तूं आतां पाहिलेस, देवहि त्याचें ( विश्वरूपाचें ) दर्शन व्हावें म्हणून सदैव आतुर असतात. ५२ ज्या विश्वरूपांत तूं मला पाहिलेस, तें रूप वेदाध्ययनानें, तपश्चर्येनें, दानपुण्यकर्मानें, किंवा यजनानेंहि दिसणें शक्य नाहीं. ५३ केवळ एका अनन्य भक्तीनेंच मला ( विश्वेश्वराला ) अशा विश्वरूपानें जाणणें, ( अपरोक्षज्ञानानें ) पाहणें, आणि हे वीरा ! त्याच स्वरूपात तत्त्वतः विलीन होणें ( तद्रूप होणें ) शक्य आहे. ५४

पुनः पुनः हेंच सांगितलें आहे कीं ईश्वराचे ठिकाणीं अनन्यपरायणता, अनन्यभक्ति आणि तद्रूपता कोणत्याहि बाह्य साधनांनीं मिळणें शक्य नाहीं. ही अंतःकरणवृत्ति अंतरंगाच्या नितांत समर्पणानेंच साध्य होऊं शकते. विश्व. रूपांत ईश्वरदर्शन, अंतरंगांतच तद्रूपता प्राप्त झाल्याशिवाय होणार नाहीं. सरूपता, सलोकता, समीपता, सायुज्यता अशी ही उत्तरोत्तर वरच्या कोटीची भक्ति अंतरंगाच्या अधिकाधिक शुद्धतेनें आणि तन्मयतेनेंच प्राप्त होऊं शकते. प्रथम तत्त्वावबोध, त्यानंतर अपरोक्षानुभूति आणि शेवटीं परमगति अशी ही परंपरा सांगितली आहे. सर्व साधनांत भक्ति हेंच ईश्वरप्राप्तीचें श्रेष्ठ साधन आहे.

**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः ।**
**निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥५५॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**
**विश्वरूपदर्शनं नाम एकादशोऽध्यायः**

सर्व कर्में केवळ मदर्थ करणारा, मीच परमगति अशी श्रद्धा असणारा, माझ्या अनन्य भक्तीनें मत्परम झालेला, ऐहिक विषयांत आसक्त नसणारा, कोणत्याहि प्राण्याविषयीं मनांत द्वेष नसलेला, असा जो तोच मत्पदाला येऊन मिळतो. ५५

श्री गीताशास्त्राचें सारभूत तत्त्व येथें सांगितलें आहे. कर्म, ज्ञान, भक्ति, तिन्ही मार्ग त्या परम पदाला पोहचवितात. समबुद्धि, सर्वभूतहितरत, निर्वैर, अनासक्त, आणि अनन्य भक्तच त्या परम पदाला पोंहचतो. सर्व साधनात भक्ति हेंच श्रेष्ठ साधन आहे. विश्वांत विश्वात्मा पाहून तन्मय झाल्यानेंच तत्पदाची प्राप्ति होईल.

विश्वरूपदर्शन म्हणजे विश्वांत विश्वेश्वराचें दर्शन, हें गीतेतील एक विशिष्ट महत्तत्त्व आहे. ह्याचा उल्लेख समारोपांत, आठराव्या अध्यायांत, संजयाच्या तोंडून पुनः विशेष रूपानें केला आहे. विश्व हें स्थलकालनिरपेक्ष अनंत अव्यय आहे. “ विश्व ” “ अनंत ” या कल्पनांचे आकलन केवळ बुद्धीनें होऊं शकत नाही. अधुनिक दूरदर्शिकेला शतकोटि प्रकाश वर्षांच्या अंतरावरील तेजोमेघ पाहणें शक्य झालें आहे. हें अंतर सहस्रावधि परार्ध मैल आहे. याच्याहि पलीकडे विश्वविस्तार आहेच. असा हा विश्वविस्तार अनंत आहे, आणि त्या विश्वेश्वराचा महिमाहि अनंत आणि अपार आहे. असें हें सच्चितानंद स्वरूप “ सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म ” या विश्वांतच पाहावें ही गीतेची शिकवण आहे.

---

## ध्याय बारावा

## भक्तियोग

अर्जुन उवाच—

**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते**
**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥१॥**

अर्जुन म्ह०—जे भक्त अहर्निश त्वत्परायण होऊन या रूपानें तुझें ध्यान करतात, आणि जे अक्षर ( निरुपाधिक ) आणि इंद्रियांना अगोचर अशा परब्रह्माचें ध्यान करतात, त्यांच्यांत श्रेष्ठतम योगवित् कोण ? १

योग म्हणजे परमेश्वराशीं, परमात्माशीं, विश्वेश्वराशीं,विश्वात्म्याशीं तादात्म्य आणि तन्मयता. ह्यासंबंधीं ज्ञान ( सानुभव ज्ञान, प्रतीति ) ज्यांना आहे ते योगज्ञ ( योगवित् ). येथें योगवित्तमः म्हटलें आहे, योगवित्तरः असें म्हटलें नाहीं. सर्वश्रेष्ठ योगज्ञ कोण ? असा प्रश्न आहे. सततयुक्त आणि विश्वांतच विश्वेश्वर पाहणारा भक्त योगवित्, आणि अक्षर अव्यक्ताची उपासना करणारा ( ध्यान करणारा ) ज्ञानी योगवित्, यांत अधिक चांगला कोण असा प्रश्न नसून, अशा सर्वांत श्रेष्ठ योगवित् कोण ? असा आहे. मागील अध्यायाच्या शेवटच्या श्लोकांत " मत्कर्मकृत् मत्परमो मद्भक्त. " असा, सङ्गवर्जित आणि निर्वैर असल्यास मत्पदाला येतो असें म्हटले आहे. असा हा विश्वांत विश्वेश्वर विश्वात्मा पाहणारा ज्ञानी भक्त मागील अध्यायाच्या शेवटीं सांगितला आहे. त्यापूर्वींच्या अध्यायांत अक्षर अव्यक्त ब्रह्माची उपासना करणारा भक्तच विवक्षित आहे. आतां या अध्यायांत सर्वश्रेष्ठ भक्त कोण, आणि तो कसा असतो हें सांगावयाचें आहे.

श्रीभगवानुवाच—

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।**
**श्रद्धया परयोपेताः ते मे युक्ततमा मताः ॥२॥**

श्रीभगवान् म्ह०—जे परमश्रद्धेनें युक्त, सर्वस्वीं मलाच आपलें चित्त समर्पण करून, अहानश मत्परायण होऊन, माझी उपासना करतात तेच श्रेष्ठ योगी आहेत, असें मी मानतों. २

पूर्णतया आत्मचित्तसमर्पण, अनन्यभाव, आणि परमश्रद्धा हींच योगज्ञाचीं मुख्य लक्षणें सांगितलीं आहेत. उपासना, सगुणरूप परमेश्वराची असो, किंवा अक्षर अव्यक्त परब्रह्माची असो, ती अनन्यभावानें आणि श्रद्धायुक्त असावयास पाहिजे. श्रद्धा म्हणजे संप्रत्यय ( विवेकनिर्णीत निश्चयबुद्धि ), संप्रतीति ( सम्यक्ज्ञान ), आस्तिक्यबुद्धि, श्रद्धेयाविषयीं आदर, आणि पूर्णनिष्ठा, हीं उपासनेस आवश्यक आहेत. हे केवळ सगुण उपासनेविषयींच सांगितलेलें नाहीं, निर्गुण उपासनेंतहि परम श्रद्धा, आणि अनन्ययोग आवश्यकच आहेत.

**ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते**
**सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥३॥**
**सन्नियम्येंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः**
**ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ॥४॥**
**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम्**
**अव्यक्ता हि गतिर्दुःखम् देहवद्भिरवाप्यते ॥५॥**

परंतु जे योगी, अनिर्वाच्य ( शब्दांस अगोचर ), इंद्रियांस आणि मनास अनाकलनीय, सर्वग, चिंतनास अगम्य, परमश्रेष्ठ, स्थिर (अबाधित), आणि नित्य ( सनातन ), अशा अक्षर ब्रह्माची उपासना, ३ सर्वेंद्रियांचें नियनम करून, सर्वांठायीं समत्वबुद्धि ठेवून करतात, ते सर्व भूतमात्राच्या हिताविषयीं तत्पर असणारे ( योगी ) मत्पदालाच येऊन मिळतात. ४ परंतु, अव्यक्त ब्रह्माची उपासना करणारांना फार आयास होतात, कारण देहधारी मानवास अव्यक्त अवस्था ( देहाभिमानत्याग ) प्राप्त होणें फार कठीण आहे. ५

विश्वांत विश्वेश्वर पाहणें हेंच सत्यदर्शन, पण हें अत्यंत कष्टसाध्य आहे. आपला जगताशीं संबंध हाच सर्व संवेदनांचा पाया आहे. विश्व हें त्या विश्वे-

श्वराचेंच व्यक्तरूप आहे, हें समजलें तरी या विश्वापलीकडे असलेलें अक्षर नित्य परब्रह्म समजणें कठीण आहे, आणि तें बुद्धीला पटणें तर त्याहूनहि कठीण आहे. जोंपावेतों आपलें व्यक्तित्व बुद्धीआड होत नाहीं, तोंपावेतों अव्यक्तोपासना शक्य नाहीं, पण ज्यांना हें शक्य झालें आहे, ते ज्ञानी त्या परमात्म्याच्या परमपदाला जाऊन मिळतात.

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥६॥**
**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात्**
**भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥७॥**

परंतु जे कोणी सर्व कर्में मलाच समर्पण करून, माझ्यापेक्षां श्रेष्ठ दुसरें कांहीं नाहीं अशा बुद्धीनें, अनन्यभावानें, माझेंच ध्यान करून उपासना करतात, ६ अशा सर्वस्वी मलाच आपलें चित्त अर्पण करणारांना, मी, विलंब न लागतां, मृत्यु आणि संसाराच्या सागरांतून बाहेर काढतों. (त्यांची जन्ममृत्यूच्या फेऱ्यांतून सुटका करतों). ७

अव्यक्तोपासना करणारे तर परमपदाला पोहचतातच, परंतु अनन्यभावानें ईश्वरपरायण होऊन संसारांत आपली सहज आणि विहित कर्में करीत राहणारे भक्तहि ह्या जन्ममृत्यूच्या फेऱ्यांतून, "न चिरात्" म्हणजे लवकरच (क्रमानें), या उपासनेनें परमभक्त होऊन नंतर मुक्त होतात.

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।**
**निवशिष्यासि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥८॥**

(म्हणून) आपलें मन मलाच अर्पण कर, बुद्धीहि माझ्याच ठिकाणीं लाव, म्हणजे देहपातानंतर तुला माझ्या पदांतच स्थान मिळेल, यांत संदेह नाहीं. ८

महत्त्व त्यागबुद्धीचें, ईश्वरपरायणतेचें, समत्वबुद्धीचें, आणि अनन्यभक्तीचें आहे. अहंता, ममता, व्यक्तिता हीं नाहींशीं झाल्यास मोक्ष हा सहजच मिळेल.

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।**
**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥९॥**

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।**
**मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि ॥१०॥**
**अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः**
**सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥११॥**

मन आणि बुद्धि माझ्या ठिकाणीं स्थिर करणें तुला शक्य होत नसेल, तर मग, हे धनंजया ! पुनः पुनः प्रयत्नानें ( आणि ध्यान धारणादि मार्गांनीं ) मच्चित्त होण्याची इच्छा कर. ९ हा अभ्यासयोगहि जमत नसेल तर जीं जीं कर्में करशील, तीं केवळ ईश्वरार्पण बुद्धीनेंच कर; ईश्वरार्पणबुद्धीनेंच कर्में करूनहि तुला सिद्धि प्राप्त होईल. १० हेंहि तुला घडत नसेल, तर अनन्यभावानें, चित्ताचा निरोध करून, कोणत्याहि कर्म-फलाविषयीं आसक्ति धरूं नकोस, ( म्हणजे तुला क्रमानें सिद्धि प्राप्त होईल ). ११

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासात् ज्ञानात् ध्यानं विशिष्यते**
**ध्यानात् कर्मफलत्यागः त्यागाच्छांतिरनंतरम् ॥१२॥**

अभ्यासानें ( सतत प्रयत्नानें ) उत्तम ज्ञान प्राप्त होतें, ज्ञानपूर्वकच ध्यान श्रेष्ठ असतें, ध्यानानें सहजच कर्मफलत्याग साधतो, आणि त्यागा-नंतरच शांति लाभते. १२

चित्त स्थिर होण्यास " अभ्यासयोग " हाच उपाय आहे, असें वर श्लोक ९ मध्यें सांगितलें आहे. या उपायानें ज्ञानधारणा सिद्ध होते. तसेंच ज्ञानाची जोड ध्यानास अवश्य पाहिजे. स्थिर चित्त नेहमीं ईश्वराच्या ध्यानांत मग्न राहिल्यास, कर्मफलाची लालसाच उत्पन्न होणार नाहीं, आणि लालसाच नसल्यावर चित्तक्षोभ होणार नाहीं, आणि शांति मिळेल.

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥१३॥**
**संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥१४॥**

कोणाचाहि द्वेष न करणारा, भूतमात्राचा मित्र, दयार्द्र अंतःकरणाचा, ज्याला आपपर कांहीं नाहीं असा, अहंत्व ज्याचें पूर्णपणें लयास गेलें आहे असा, सुखात किंवा दुःखांत केव्हांहि मनाची समता ढळूं न देणारा, कोणाविषयींहि मनांत तेढ न बाळगणारा, १३ नेहमीं संतुष्टवृत्तीनें असणारा, इंद्रियें, मन, बुद्धि यांवर ज्यानें पूर्ण जय मिळविला आहे असा, निश्चयापासून कधींहि न ढळणारा, आणि मन आणि बुद्धि ज्यानें पूर्णपणें ईश्वरास समर्पण केलीं आहेत असा जो माझा भक्त तो मला प्रिय आहे. १४

भक्ताचीं लक्षणें या दोन श्लोकांत सांगितलीं आहेत. ज्यानें आपलें चित्त सर्वस्वीं ईश्वरास अर्पण केलें, तोच भक्त. भक्ति सगुण परमेश्वराची असो, अथवा अव्यक्त अक्षर ब्रह्माची असो, ईश्वर परायणत्व, अहंतेचा अभाव, सर्वत्र समत्वबुद्धि, भूतमात्राविषयीं कारुण्यबुद्धि, हींच भक्ताचीं लक्षणें. देह आहे तोंवर कर्म आहेच, पण कर्म असो वा नसो, ईश्वरपरायणत्व हेंच भक्ताचें मुख्य लक्षण. विभक्ततेची भावना असेल तर तो भक्त नाहीं. ज्याला ईश्वराशिवाय दुसरें कांहींहि इष्ट नाहीं तोच खरा भक्त. योगयुक्त म्हणजेच परम भक्त.

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।**
**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥१५॥**
**अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।**
**सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥१६॥**
**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥१७॥**

ज्याच्यापासून लोक कंटाळून दूर जात नाहींत, किंवा जो स्वतः लोकांपासून कंटाळून दूर जात नाहीं, जो लाभानें हुरळून जात नाहीं, मनांत कोणाविषयींहि द्वेषभाव धरीत नाहीं, ज्याला कशाचेंहि भय वाटत नाहीं, आणि जो नेहमीं प्रसन्नचित्त असतो, तो मला प्रिय आहे. १५ जो कोणापासून कशाचीहि अपेक्षा करीत नाहीं, मनानें आणि शरीरानें

नेहमीं शुद्ध असतो, जो नेहमीं सत्कार्याविषयीं दक्ष असतो, कोणत्याहि विषयांत गुरफटून राहत नाहीं, आणि दुःखानें व्यथित होत नाहीं, जो काम्य कर्मापासून दूर असतो, असा माझा भक्त मला प्रिय आहे. १६ जो हर्षानें वेडावून जात नाहीं, द्वेषानें चिडून जात नाहीं, जो कांहींहि गेल्याच्या शोकानें पीडित होत नाहीं, कशाचीहि हांव धरीत नाहीं, जो पुण्य अपुण्य दोन्हीं कर्में सोडून केवळ मद्भक्तिपरायण असतो, तो मला प्रिय आहे. १७

जो भक्त लोकांतच राहून समचित्तत्वानें वागतो, ज्याला लाभ झाल्यास हर्ष नाहीं,हानि झाल्यास दुःख नाहीं,ज्याला कोणाविषयीं किंवा कशाविषयीं आसक्ति अथवा कोणाविषयीं किंवा कशाविषयीं द्वेषहि नाहीं, ज्याला कोणाचेंही किंवा कशाचेंहि भय नाहीं, जो कोणापासून कशाचीहि अपेक्षा करीत नाहीं पण जो आत्मकल्याणाविषयीं अत्यंत दक्ष असतो; जो कोणत्याहि कार्यात अत्यंत आसक्त होत नाहीं, आणि कशानेंहि, कोणत्याहि प्रसंगीं दुःखी होत नाहीं तोच खरा ईश्वराचा प्रियभक्त. कर्मयोगी भक्त असा असतो. जनसंमर्दापासून दूर न जातां, जनांतच राहून जो उदासीन आणि शुद्ध निरपेक्ष वृत्तीनें वागून, आत्मकल्याण आणि पर्यायानें जनतेचेंहि कल्याण करीत असतो, असा भक्त ईश्वरास अत्यंत प्रिय असतो.

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः ॥१८॥**
**तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित् ।**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥१९॥**

शत्रु–मित्र, मानापमान, शीतोष्ण, सुख–दुःख या सर्व द्वंद्वांत जो समचित्त असतो, जो कोणत्याहि कर्मांत आसक्त होत नाहीं, १८ ज्याला निंदा स्तुति दोन्हीं सारखींच, जो अधिक बोलत नाहीं, आणि जो कोणत्याहि परिस्थितींत संतोषवृत्तीनें असतो, जो कसल्याहि आश्रयाची अपेक्षा करीत नाहीं, आणि ज्याची बुद्धि कधींहि चलित होत नाहीं, असा भक्त मला प्रिय आहे. १९

जनसंमर्दापासून दूर राहणाऱ्या संन्यासी योग्याचें हें वर्णन आहे. तोहि ईश्वरभक्त आहे. अव्यक्त अक्षर परब्रह्माची उपासना ध्यानयोगानें करणारा योगी, परमात्म्याचा परम भक्तच आहे. जो "सङ्गविवर्जित अनिकेत" भक्त आत्मोद्धारासाठीं आणि कैवल्य प्राप्तीसाठीं, एकांतांत परम अक्षर ब्रह्माचें ध्यान करून आत्मोन्नति साधतो, तोहि पर्यायानें लोककल्याणकारीच असतो. त्याच्या नुसत्या दर्शनानेंच संसारी जीव पुनीत होऊन जातात.

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।**
**श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥२०॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः ॥**

जे कोणी या धर्मभावन अमृताचे ( मोक्ष साधनाचे ) परम श्रद्धेनें, आणि मीच (परमात्माच) परमगति आहे अशा अनन्य भावानें, यथावत् अनुष्ठान करतात, तेच भक्त मला अत्यंत प्रिय आहेत. २०

भक्ति सगुणरूपाची, ईश्वराच्या विश्वरूपाची, किंवा अक्षर अव्यक्त परब्रह्माची, कोणत्याहि परमेश्वर स्वरूपाची असो, श्रद्धा, अनन्यभाव, तादात्म्य यांशिवाय भक्त तदाकार होऊन अहंता, अस्मिता विसरणार नाहीं. योग ( ईश्वराशीं एकरूपता ), भक्ति, संन्यास, ज्ञाननिष्ठा, सर्वांचें अंतिम एकच. योग म्हणजे तादात्म्य, आणि भक्ति म्हणजे सर्वात्मसमर्पण. "ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न काङ्क्षति । समःसर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्वतः । ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥ " अशा प्रकारें कर्मांची, कर्म संन्यासाची आणि ज्ञाननिष्ठेची परिपूर्णता भक्तींत ( सायुज्यतेंत ) होते. भक्तीचा मार्ग जाति–लिङ्ग–परिस्थिति–व्यवसाय निरपेक्ष असून सर्व अनन्य भक्तांना खुला आहे. येथें सर्वच समानतेनें अधिकारी आहेत. सर्वकर्मांची परिसमाप्ति जशी ज्ञानांत, तशी सर्वज्ञानाची परिसमाप्ति भक्तींत होऊन, भक्त त्या निरवद्य परमपदाला पोहचतो.

---

# अध्याय तेरावा

## क्षेत्रक्षेत्रज्ञविभाग

श्रीभगवानुवाच—

**इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते ।**
**एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥१॥**

श्रीभगवान् म्ह०—हे कौंतेया ! ह्या शरीरालाच क्षेत्र असें म्हणतात, आणि ह्या क्षेत्राला जो जाणतो त्याला, याविषयीं जाणणारे ज्ञानीजन क्षेत्रज्ञ असें म्हणतात. १

अध्याय सात मध्यें ईश्वराची संसाररूप अष्टधा अपरा प्रकृति, आणि ईश्वरात्मिका जीवरूप परा प्रकृति, अशा दोन ईश्वराच्या प्रकृती सांगितल्या. आतां याच प्रकृती, क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ अशा रूपानें सांगत आहेत. मागील अध्यायांत ईश्वराच्या परम भक्तांचीं लक्षणें सांगितलीं. आतां त्याच्या निष्ठेसंबंधीं सांगत आहेत. क्षेत्र म्हणजे पुण्यस्थान किंवा शेत. शरीर हें जीवाला आत्मकल्याणसाधनार्थ पुण्यक्षेत्र आहे. तसेंच, जसें पेरावें तसें फळ मिळतें या न्यायानें, शरीर हें जीवाचें कर्मक्षेत्र आहे. या शरीरास जाणणारा, त्याला वागविणारा, आणि प्रेरणा करणारा जीव हा क्षेत्री किंवा क्षेत्रज्ञ आहे. क्षेत्राचा मोठा अर्थ घेतल्यास हा संसार हें क्षेत्र आहे, आणि त्याला वागविणारा ( उत्पति–स्थिति–लयाचें नियंत्रण करणारा ) ईश्वर हा क्षेत्रज्ञ आहे.

**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥२॥**
**तत् क्षेत्रं यच्च यादृक् च यद्विकारि यतश्च यत् ।**
**स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥३॥**

**ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक् ।**
**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥४॥**

हे भारता ! सर्व प्राणिमात्राच्या शरीरांत क्षेत्रज्ञ मीच (परमात्माच) आहे, हे नीट समज. क्षेत्र (शरीर) आणि क्षेत्रज्ञ (त्याला वागविणारा जीव, किंवा सर्व क्षेत्रांना वागविणारा ईश्वर) या दोहोंसंबंधीं ज्ञान म्हणजेच मजविषयीं (परमात्म्याविषयीं) ज्ञान, असें मी मानतों. २ तें क्षेत्र काय आहे, कसें आहे, त्याचे विकार कोणते, त्याची उत्पत्ति कोठून, हा सर्व संसार ज्याचें ऐश्वर्य आहे तो (परमात्मा) कोण, हें सर्व थोडक्यात तुला सांगतों, ऐक. ३ हें (ज्ञान) पूर्व ऋषींनीं वारंवार, वेगळाल्या वेदमंत्रांनीं अनेक प्रकारें, आणि ब्रह्मज्ञानोपपादक वाक्यांनीं युक्तियुक्त आणि निश्चितरूप असें गाइलें (सांगितलें) आहे. ४

क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांसंबंधीं ऊहापोह, आणि निश्चित तत्त्वविवेचन, अनेक ऋषींनीं आणि वेदमंत्रांनीं केलें आहे. हेंच क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाचें ज्ञान म्हणजे आत्मानात्मविवेक, आणि परमात्मस्वरूपाचें ज्ञान होय.

**महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।**
**इंद्रियाणि दशैकं च पञ्च चेंद्रियगोचराः ॥५॥**
**इच्छा द्वेषः सुखं दुखं संघातश्चेतना धृतिः ।**
**एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥६॥**

सूक्ष्म पञ्चमहाभूतें, अहंप्रत्यय, ज्यायोगें जगत्प्रत्यय होतो आणि अहंप्रत्यय होतो ती बुद्धि (महत्), जेथून (ज्या शक्तीनें) ह्या जगताचा आविष्कार झाला तें अव्यक्त (प्रकृति, ईश्वरीमाया), पञ्च ज्ञानेंद्रिये, पञ्च कर्मेंद्रियें, मन (अकरावें इंद्रिय), ज्ञानेंद्रियांचें पांच विषय, ५ रागद्वेष सुखदुःखादि (विकार), या सर्वांचा एकीभाव (शरीर), यांत अभिव्यक्त होणारी चेतना (अंतरिंद्रियें, स्फुरण प्राणनादि), आणि या सर्वांना एकत्रित ठेवणारी धारणा, असें हें थोडक्यांत विकारासह क्षेत्र म्हणून सांगितलें आहे. ६

पांच महाभूतांचे सूक्ष्मांश म्हणजे पञ्च तन्मात्रें, अहंत्व हें महाभूतांचें कारण, आणि अहंत्वाला कारण अविद्यारूप बुद्धि, आणि मन अशी ही अष्टधा अपरा प्रकृति, पूर्वी ७ व्या अध्यायात सांगितली आहे. तेथें जीवभूत परा प्रकृति सांगितली, आणि त्या परा प्रकृतीनेंच अपरा प्रकृतीच्या साहाय्यानें हें सर्व चराचर जगत् निर्माण झालें आहे म्हणून सांगितलें. येथें आतां २४ तत्त्वें सांगितलीं आहेत. पञ्च महाभूतांचे सूक्ष्मांश, अहंत्व ( जीवाचें मूलतत्त्व ), बुद्धि ( ज्यायोगें जगत्प्रतीति होते ती अविद्या ), अव्यक्त ( अघटितघटना-पटीयसी ईश्वरीमाया ), पञ्च बुद्धींद्रियें ( श्रोत्रादि ), पञ्च कर्मेंद्रियें (हस्तपादादि), मन ( बुद्धि आणि दशेंद्रियांना जोडणारा दुवा ), आणि शब्दस्पर्शादि पांच बुद्धींद्रियांचे विषय, अशीं हीं २४ तत्त्वें म्हणजे ही प्रकृति. रागद्वेष, सुखदुःखादि जीवाचे विकार, २४ तत्त्वांचें एकवटून झालेलें हें शरीर, त्याबरोबरच ज्यायोगें संज्ञा उत्पन्न होते आणि जी आत्मचैतन्याच्या आभास रसानें ( तप्त लोहपिंडा-तील अग्नीप्रमाणें ) जीवास व्यापून आहे ती चेतना, आणि या सर्व विस्खळित वाटणाऱ्या घटकांना समुच्चयानें ग्रथित करून वागविणारी धारणा, ह्या सर्वांना मिळून क्षेत्र असें येथें म्हटलें आहे.

**अमानित्वमदंभित्वं अहिंसा क्षांतिरार्जवम् ।**
**आचार्योपासनं शौचम् स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥७॥**
**इंद्रियार्थेषु वैराग्यं अनहंकार एव च ।**
**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥८॥**
**असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ।**
**नित्यं च समचित्तत्वं इष्टानिष्टोपपत्तिषु ॥९॥**
**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।**
**विविक्तदेशसेवित्वं अरतिर्जनसंसदि ॥१०॥**
**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्वज्ञानार्थदर्शनम् ।**
**एतज्ज्ञानामिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥११॥**

नम्रता, निष्कपटता, अहिंसा ( कोणासहि न दुखविणें ), क्षमा, सरळ-

पणा, गुरुशुश्रूषणा, अंतर्बाह्य निर्मलता, चित्ताची स्थिरता, मनोनिग्रह, ७ विषयांसंबंधीं अनासक्ति, निरभिमानता, जन्म–मृत्यु–जरा–व्याधि–दुःख या सर्व दोषांची जाणीव, ८ अनासक्ति, पुत्र-स्त्री-घरदार इत्यादिविषयीं वैराग्य, इष्ट होवो वा अनिष्ट होवो कोणत्याहि परिस्थितींत चित्ताची समता, ९ ईश्वराच्या ठिकाणीं कधींहि न ढळणारी अनन्यभक्ति, एकांत-वासाची गोडी, जनसंमर्दाविषयीं अप्रीति, १० नेहमीं अध्यात्मज्ञानांत गढून राहणें, आणि तत्त्वज्ञानाकडे ( आत्मानुभूतीकडे ) प्रवृत्ति, यास ज्ञान म्हणतात; ह्यांच्या उलट तें सर्व अज्ञान. ११

येथें ज्ञान म्हणजे ज्ञान्यांचीं लक्षणें सांगितलीं आहेत. हीं लक्षणें दिसतील तेथेंच खरें ( सम्यक् ) ज्ञान आहे म्हणावयाचें; एरव्हीं तें केवळ शाब्दिकच ज्ञान. ज्ञाता आणि ज्ञानाचा विषय हीं एकरूप झाल्याशिवाय खरें ज्ञानच नाहीं, ज्ञानाच्या विषयाचें विषयत्व गेल्याशिवाय प्रत्यय नाहीं, आणि आत्म-प्रत्यय नाहीं म्हणजे खरें ज्ञान नाही. मन, बुद्धि, अहंत्व या सर्वांना व्यापून राहील तेंच ज्ञान, म्हणूनच ज्ञान म्हणजे ज्ञान्याचीं लक्षणें येथें दिलीं आहेत.

**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते ।**
**अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥१२॥**
**सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।**
**सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥१३॥**
**सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् ।**
**असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥१४॥**
**बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च ।**
**सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत् ॥१५॥**
**अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।**
**भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥१६॥**
**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।**
**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥१७॥**

ज्याचें ज्ञान झालें म्हणजे अमृतत्व प्राप्त होतें, तें ज्ञेय काय तें सांगतों. तें, ज्यास मूळ कारण नाहीं असें, सर्वश्रेष्ठ ब्रह्म आहे, त्याला आहे असेंहि म्हणतां येत नाहीं, किंवा नाहीं असेंहि म्हणतां येत नाहीं; १२ त्याचे हस्त, पाद, नेत्र, शिर मुख सर्वत्रच आहेत, त्याचे श्रोत्रहि सर्वत्र आहेत, आणि ह्या विश्वांत तें सर्वत्र व्यापून आहे; १३ सर्व इंद्रियशक्तींच्या गुणाचा आभास तेथें आहे, पण त्याला कोणतींच इंद्रियें नाहींत; सर्वांपासून अलिप्त, पण तें सर्वांना धारण करणारें आहे; तें गुणातीत आहे, पण गुणांची परिपूर्तीहि त्याचेंच ठिकाणीं आहे; १४ तें भूतमात्रांना अंतर्बाह्य व्यापून आहे; तें चरहि आहे, आणि अचरहि आहे; तें सूक्ष्म असल्यामुळें ज्ञानाचा विषय होऊ शकत नाहीं; तें दूरहि आहे आणि अगदीं जवळहि आहे; १५ तें अविभक्त (एकच एक) असूनहि भूतसृष्टींत विविधरूपानें असल्यासारखें दिसतें; सर्व भूतमात्राला आधारभूत, सर्वभूताच्या लयाचें, आणि उत्पत्तीच कारणहि तेंच (ज्ञेय) आहे; १६ अत्यंत प्रकाशमान ज्योतींची ती परमज्योती आहे; तें (ज्ञेय) तमाच्या (अंधकाराच्या, अज्ञानाच्या) पलीकडे आहे, असें म्हटलें आहे. (वर सांगितलेलें) ज्ञान, आणि ज्ञानानें प्रतीत होणारें हें ज्ञेय सर्वांच्याच हृदयांत अधिष्ठित आहे. १७

परमज्ञेय परब्रह्माचें वर्णन करणें शक्यच नाहीं. लक्षणेनें तें दिग्दर्शित करतां येईल, " सत्त्वासत्त्वाभ्यामनिर्वचनीयम् " असें तें आहे. " अन्यदेव तद्विदितादथो अविदितादधि, " तें सत् ( जें दिसतें भासमान होतें असे ) नाहीं, असत्‌हि ( अभावरूपहि ) नाहीं, परंतु " निष्कलं निष्क्रियं शातं निरवद्यं निरंजनम् " अशा " नेति नेति " शब्दांनींच तें सूचित करावें लागतें. असें तें आहे म्हणावयास शब्दच नाहींत. तें ज्ञानघन आहे, परंतु व्यावहारिक ज्ञानाच्या ( इंद्रियगम्य ज्ञानाच्या ) पलीकडे आहे. " सहस्रशीर्षाः पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् " " पुरुष एवेदं सर्वं " अशा शब्दांनीं त्याचें व्यापकत्व दर्शविलें आहे. सर्व भूतमात्रांना तें आधारभूत आहे. परंतु भूतांत ( दृश्य जगतांत ) तें प्रतीत होत नाहीं. तें त्रिगुणातीत आहे. जें जें दिसतें, अनुभवाला येतें, तें गुणांमुळें, परंतु तें ( परमज्ञेय ) या सर्वांच्या पलीकडचें आहे. तें सर्व आहे,

विभु आहे, नित्य आहे. तें प्राण्यांच्या आंत आहे कीं बाहेर आहे हा प्रश्नच उद्भवत नाहीं, कारण जें कांहीं " आहे " तें तेंच आहे. " अणोरणीयान् " ( सूक्ष्माहून सूक्ष्म ) आणि " महतो महीयान् " ( मोठ्याहून मोठें ) असें तें आहे. सूक्ष्म आणि मोठे हे शब्दहि त्याला लागूं नाहींत. भूतमात्रांत तें विविध-रूपानें दिसतें, पण तें सर्वव्यापी एकच एक आहे भूतमात्राची उत्पत्ति, स्थिति आणि लय त्यांतच आहेत. जेथें प्रकाश तेथें छाया आहेच, पण या प्रकाशाला छाया नाहीं, कारण त्याशिवाय दुसरें काहींच नाहीं. तें " तमसः परम् " आहे, तेथें " तमस् " नांवालाहि नाहीं. " सत्यं ज्ञानमनन्तं " असें त्याचें वर्णन आहे. तें ज्ञान असें आहे कीं तेथें ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान हीं तीनहि एकरूप होतात. तें शब्दांनीं जाणण्याचें नसून, हृदयानें, बुद्धीनें ओळखावयाचें आहे. तें ज्ञानाचा विषय नाहीं, प्रत्यक्ष ज्ञानच आहे.

**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।**
**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥१८॥**

ह्याप्रमाणें क्षेत्र, ज्ञान, ज्ञेय, हीं तुला थोडक्यांत सांगितलीं. ह्यांचें ज्ञान यथार्थतेनें झाल्यास, माझा भक्त मद्रूप होण्यास योग्य होतो. १८

क्षेत्र–क्षेत्रज्ञ, प्रकृति–पुरुष, क्षर–अक्षर, शरीर–जीव यांचें यथार्थ ज्ञान झालें, आणि तें अंगीं बाणलें, आणि मग ज्ञेय काय हें नीट समजलें, आणि भक्त तद्रूप झाला, आणि त्याचें अहंत्व नाहीसें झालें, म्हणजे तो मुक्तच झाला. क्षेत्र ( शरीर ), प्रकृति ( जगत्, संसार ), क्षर ( भूतसृष्टि ) हा सर्व ईश्वराच्या योगमायेचा आविष्कार आहे. जाणावयाचें जें ज्ञेय ( ईश्वरस्वरूप ) तें अक्षर ब्रह्म. जीव ईश्वराचा अंश, पण अलग अंश नव्हे, तो उपाहित असा अंश आहे; ज्ञानानें त्याला उपाधिरहित स्वरूपांत ओळखावयास पाहिजे. त्याला लागलेल्या गुण–विकारादि उपाधी त्याचें खरें स्वरूप झांकून टाकून त्याला प्रकृतीशीं एकरूप झालेला दाखवितात. पण, तसा तो वास्तविक नाहीं, हेंच ओळखावयास पाहिजे.

**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।**
**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥१९॥**

प्रकृति आणि पुरुष दोन्ही अनादी आहेत, हें नीट समजून घे. विकार आणि गुण हे प्रकृतिपासून उद्भवतात, हेंहि पक्कें समज. १९

" नासदासीन्नो सदासीत्तदानीम्. " पूर्वी कांहींच नव्हतें, पण कशाच्या पूर्वी ? कालगणनेला आरंभ झाल्याशिवाय, पूर्वी आणि नंतर तरी काय ? आणि कांहींच नाहीं, तेथें गणना तरी कसली ? वास्तविक जें आपणास दिसतें, ज्याची कल्पना करतां येतें, तें अनादि " आहेच. " प्रकृति म्हणजे हें विश्व, जगत्, संसार. ह्याचें अस्तित्व नव्हतें, अशी कल्पनाच होऊं शकत नाहीं. पुरुष म्हणजे जीव, तोहि अनादीच आहे. दोहोंचें अस्तित्व एकमेकांवर अवलंबून आहे. जीव आहे, म्हणून संसार आहे; आणि संसार आहे, म्हणूनच जीव आहे; आणि हीं दोन्हीं अनादीच आहेत. विकार आणि गुण यानींच संसाराला संसारत्व येतें. निर्गुण निर्विकार तो संसारच नव्हे. हे विकार किंवा गुण कोठून बाहेरून येऊन प्रकृतीला चिकटत नाहींत. विश्व आणि विश्वेश्वर दोन्ही एकच आहेत, तसेंच संसार आणि जीव दोन्ही एकच आहेत. जीवानेंच संसार रचला आहे, आणि संसारानेंच जीवाला गुणसङ्गी आणि विकारवश केला आहे.

**कार्यकरणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥२०॥**

कार्य ( म्हणजे शरीर ) आणि करणें ( म्हणजे दशेंद्रियें, मन, बुद्धि अहंकार ) यांच्या कर्तृत्वाला प्रकृति कारण आहे, असें म्हणतात; आणि खदुःखाच्या भोक्तृत्वाला पुरुष ( जीव, क्षेत्री ) कारण आहे, असें म्हणतात. २०

कार्य अथवा शरीर म्हणजे प्रकृतीचे विकार ( पञ्च स्थूलमहाभूतें आणि प्रकृतिसम्भव पंचविषय, एकंदर १० ), करणें (एकंदर १३, पञ्चज्ञानेंद्रियें, पञ्चकर्मेंद्रियें, मन, बुद्धि, आणि अहंकार ), यापासूनच प्रकृतिसम्भव सुखदुःखादि गुण, या सर्वांचें कर्तृत्व प्रकृतिकडेच आहे. पुरुषास ( क्षेत्रज्ञास, जीवास ) प्रकृतीच्या सङ्गानें, प्रकृतिविकार जें शरीर त्यासंबंधीं आसक्ति उत्पन्न होते, आणि करणत्रयोदशापासून उत्पन्न होणारे गुण त्याला चिकटतात, आणि त्यांचा

परिणाम त्याला सुखदुःखादि भोगणें प्राप्त होतें. " कार्यकारणकर्तत्वे " असाहि पाठ आहे. तेथें षोडश विकार ( ५ ज्ञानेंद्रियें, ५ कर्मेंद्रियें, ५ स्थूल महाभूतें, १ मन ) हें कार्य, आणि सप्त प्रकृतिविकृती ( महत् अथवा बुद्धि, अहंकार आणि ५ तन्मात्रें ) हें कारण, यांच्या कर्तृत्वाला कारण ( हेतु ) प्रकृति आहे, असें म्हणावयाचें. या सर्वांची प्रेरणा प्रकृतिकडून होते, आणि पुरुष हा प्रकृतिसंगानें भोक्ता होतो. पुरुषच सुखदुःखाचा उपभोक्ता अविद्येनें होतो, आणि अशा रीतीनें ही संसाराची मांडणी होते.

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते प्रकृतिजान् गुणान् ।**
**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥२१॥**

कारण, पुरुष ( जीव ) केवळ प्रकृतिसंगामुळेंच प्रकृतिसंभव गुण ( म्हणजे त्यांपासून होणारे सुखदुःखादि भोग ) भोगतो. तसेंच त्याला बऱ्या वाईट योनींत जन्माला येण्यास, या ( हीनोत्तम ) गुणांशीं संबंध हेंच कारण असतें. २१

**उपद्रष्टाऽनुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।**
**परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन् पुरुषः परः ॥२२॥**

मानव देहांत वास करणारा हा परम ( श्रेष्ठ ) पुरुषच सर्व प्रवृत्तींचा साक्षी, सर्व प्रवृत्तींना अनुमोदन देणारा, चैतन्यरूपानें शरीराचें धारण करणारा, आणि सुखदुःखादिकांचा भोक्ता आहे, आणि तोच (शुद्ध स्वरूप) सर्वेश परमात्मा आहे, असें म्हटलें आहे. २२

"क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु" हाच क्षेत्रज्ञ ( जीव ) महेश्वर परमात्मा आहे, असें वर सांगितलें आहे. क्षेत्रज्ञ ( प्रत्यगात्म ) क्षेत्रसंयोगानें जीवरूप आणि संसारी होतो, आणि देहाशीं एकरूप होऊन देहाचें भरण पोषणादि करून देहस्थित भोगहि भोगतो. परंतु वस्तुतः तो शुद्ध बुद्ध स्वतंत्र आनंद-घन अशा परमात्माचाच अंश आहे.

**य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥२३॥**

याप्रकारें ज्याला पुरुष, प्रकृति आणि प्रकृतीचे गुण, यांचें सम्यक्ज्ञान झालें, तो कसाहि वागला तरी (त्यानें कर्मसंन्यास केला, किंवा कर्महि केलें तरी) त्याला पुनरावर्तन नाहीं (तो मुक्तच झाला आहे.) २३

पुरुष आणि प्रकृति, अक्षर आणि क्षर, क्षेत्रज्ञ आणि क्षेत्र, परा आणि अपरा प्रकृति अशा वेगवेगळ्या पदांनीं अव्यक्त आणि व्यक्त ऐश्वरी योग-मायेचा प्रभाव वर्णन केला आहे. हा आविष्कार त्या निरामय शुद्ध आनंदघन ज्ञानघन परब्रह्माचा आहे. व्यक्त आविष्कार म्हणजे विविधता, आणि ती गुणाधिष्ठित आहे. अशा प्रकारें ज्याला तें आद्यतत्त्व, आणि त्याचा विश्वरूपी आविष्कार परमार्थतः कळला, ज्याला त्यांतील सत्य पटलें, आणि अंगीं बाणलें, तो मुक्तच आहे. त्याला एका परमात्म्याशिवाय दुसरें कांहीं सत्य दिसतच नाहीं. "ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति," परमार्थतः जाणणें, म्हणजे प्रत्यक्ष अनुभवणें, आणि तेंच होणें. ज्ञेयाशीं एकरूप झाल्याशिवाय खरें ज्ञान नाहींच अशी परब्रह्माची जाणीव झाली म्हणजे मोक्ष कांहीं वेगळी अवस्था नाहीं. असें परम ज्ञान ज्याना झालें, तें लोकाचारांत कसें वागतात याला महत्त्व नाहीं, ते पूर्णपणें जीवन्मुक्तच आहेत. ते ध्यानयोगी असोत, ज्ञानी (संन्यासयोगी) असोत, किंवा कर्मयोगी असोत, ते सम्यक्ज्ञानानें शुद्ध निर्मलचित्त झाल्यामुळें, आतां त्यांना पुनर्जन्म नाहीं.

**ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना ।**
**अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥२४॥**
**अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वाऽन्येभ्य उपासते ।**
**तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥२५॥**

कोणास आत्मसाक्षात्कार ध्यानयोगानें स्वांतःकरणांत (किंवा बुद्धींत) आत्मदर्शनानें होतो, कोणास सांख्ययोगानें (विश्लेषणरूप ज्ञानानें), आणि कोणास कर्मयोगानें (सर्व कर्में ईश्वरार्पण बुद्धीनें केल्यानें) होतो. २४ पण ज्या कोणास ह्यांपैकीं कांहींच कळत नाहीं, ते दुसऱ्या ज्ञानवंतानीं सांगितलेलें (परमात्मस्वरूप) ऐकूनच त्याची उपासना करतात,

आणि त्या ऐकलेल्यावर पूर्ण श्रद्धा ठेवूनच जन्ममृत्यूच्या फेऱ्यांतून मुक्त होतात. २५

शब्दादि विषयांपासून श्रोत्रादि परावृत्त करून त्यांचा मनांत लय करणें, आणि मन प्रत्यगात्म्याच्या ठिकाणीं एकाग्र करून तच्चिंतन करणें, हें ध्यान. सांख्ययोगांत २४ मूलतत्त्वें, आणि पुरुष यांचें विश्लेषणात्मक ज्ञान आहे. सहज प्राप्तकर्में ईश्वरार्पण बुद्धीनें करून, अनासक्तीनें अहंभावाचा लय करणें, हा कर्मयोग. ह्या तीनहि मार्गांत ज्ञान आवश्यक आहे. तीहींच्या विशिष्ट प्रक्रिया आणि साधना आहेत. त्या ज्यांना साध्य होणें शक्य नाहीं, त्यांना चौथा मार्ग गुरुपरंपरेचा, श्रद्धेचा, आणि भक्तीचा आहे. या मार्गानेंहि ईश्वरोपासना केल्यास साधकास सिद्धि मिळेल, आणि तो जन्मबंधविनिर्मुक्त होईल.

**यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजंगमम् ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥२६॥**

जें जे म्हणून निर्जीव किंवा सजीव सत्त्व निर्माण होतें, तें तें, हे भरतश्रेष्ठा ! क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ याच्या संयोगानेंच होतें हें पक्कें समज. २६

सजीवांत तर जीव आहेच, पण आपण ज्याला निर्जीव म्हणतो त्यांतहि सूक्ष्म प्रमाणांत कां होईना, पण जीव आहेच. जीव हा ईश्वराचा अंश, आणि ईश्वर सर्वव्यापी असल्यामुळें जीवहि ( चैतन्य तत्त्व ) सर्व सृष्ट पदार्थांत आहेच. " पुरुष एवेदं सर्व. " प्रत्येक अणूचे ठिकाणीं चैतन्य आहे, आणि हे अणु सर्व सजीव निर्जीव पदार्थाचे घटक आहेत. विश्वांत निर्जीव ( ज्यांत ऐश्वर भाव नाहीं असें ) कांहींच नाहीं. जीव म्हणजे काय हेंच अद्याप अधुनिक भौतिक शास्त्रें निश्चितपणें ठरवूं शकलीं नाहींत. जीवनाचें स्फुरण, उपचय, इत्यादि अर्थ केले जातात, परंतु यापेक्षाहि गूढ अतर्क्य असा जीवनाचा अर्थ आहे. सूक्ष्मांत सूक्ष्म असा जो प्रत्येक जडाजड सृष्ट पदार्थाचा घटक अणु, त्यांतहि जीव आहे, हें आतां स्पष्ट झालें आहे. या सूक्ष्मतम अणूपासून ब्रह्मांडापावेतों सर्वत्र स्फुरण आहे, उपचय-अपचय आहे, प्रवर्तन-परिवर्तन आहे, गति आहे, चेतना आहे, जीवहि आहे. सृष्टींत स्थिर नित्य असें कांहींच नाहीं. चैतन्य शक्तीनें ( ऐश्वरी मायेनें ) सर्व जगत् भ्रमत आहे. याच शक्तीच्या एका

रूपाला जीव ही संज्ञा आहे. ही ज्याची शक्ति ( किंवा माया ) तो मात्र नित्य, निष्कल, आनंदघन, चैतन्यघन आहे.

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् ।**
**विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति ॥२७॥**
**समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥२८॥**

अखिल भूतसृष्टींत समानतेनें विद्यमान असणारें, आणि विनाश पावणाऱ्या ( विलयनशील ) अशा प्रत्येक वस्तूंत अविनाशि ( नित्य ) असें परमात्मतत्त्व जो यथार्थतेनें पाहतो, तोच खरा पाहणारा ( सम्यग्ज्ञानी ) आहे. २७ कारण, अशा प्रकारें सर्व भूतमात्राचें ठिकाणीं समत्वानें वास करणाऱ्या परमात्म्याचें सम्यग्दर्शन झालेला पुरुष केव्हांहि आत्मघातकी होणार नाहीं (आपल्या खऱ्या कल्याणापासून वञ्चित होणार नाहीं), आणि तदनंतर ( आत्मकल्याण साधल्यावर ) त्याला परमगति प्राप्त होईल. २८

समत्वबुद्धि हीच परमात्मज्ञानाची परमसिद्धि. हें ठिकठिकाणीं प्रतिपादिलें आहे. समदर्शन हीच ज्ञानाची पराकाष्ठा असेंच सांगितलें आहे. " इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः । निर्दोषं हि समं ब्रह्म तस्मात् ब्रह्माणि ते स्थिताः " अशी समत्वबुद्धि प्राप्त झाली म्हणजे जन्माचें सार्थक झालें यांत संशय नाहीं. ईशावास्योपनिषदांत " आत्महनो जनाः " असुर्य लोकाला जातात म्हटलें आहे. " मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति " बृ. उ. अ. ४. अनात्मज्ञ भेदबुद्धीनें आत्मघ्न होतात आणि सद्गति पासून वञ्चित होतात. ईश्वर सर्वांठायीं समत्वानें वास करीत आहे, म्हणून कोणास दुखवूं नये, सर्वांभूतीं समत्व बुद्धि ठेवावी, कोणाचा अवमान करूं नये, किंवा कोणाचा द्वेष करूं नये.

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।**
**यः पश्यति तथाऽऽत्मानमकर्तारं स पश्यति ॥२९॥**

सर्व कर्मे सर्वस्वीं प्रकृतीच्या प्रेरणेनेंच घडत आहेत, आणि आत्मा

केवळ अकर्ता आहे, असें जो पाहतो ( अशी ज्याची दृढभावना असते ) तोच यथार्थतेनें पाहतो ( खरें तत्त्व जाणतो ). २९

वर श्लोक २०, २१, २२ मध्यें पुरुषाचें स्वरूप सांगितलें, आणि कर्तृत्व सर्वस्वी प्रकृतीचें आहे, आत्मा केवळ साक्षीभूत आहे, असें प्रतिपादिलें आहे. तेंच येथें पुनः स्पष्ट केलें आहे. येथें आत्मा म्हणजे अंतरात्मा (प्रत्यगात्मा), आपणा स्वतःकडे कर्तृत्व–भोक्तृत्व ओढून घेणारा सोपाधिक जीव नव्हे.

**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति**
**तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥३०॥**

जेव्हां ज्ञानी ही विविधरूप भूतसृष्टि एकाच परमतत्त्वांत पाहतो, आणि त्यापासूनच हा सर्व पसारा झाला आहे असें जाणतो, तेव्हांच त्याला ब्रह्म आणि विश्व यांच्या ऐक्याचे ज्ञान होते. ३०

सर्व वस्तुमात्राच्या ठिकाणीं चराचरात तें परमात्मतत्त्व आहे. नाश पावणाऱ्या वस्तूंतहि नाश न पावणारें, असें तें परम तत्त्व आहे. नाश खरोखर कशाचाहि होत नाहीं, केवळ रूपपरावृत्ति होते, त्यांतील सत्त्व कधींच नष्ट होत नाहीं. अशी ही अविनाशी ऐश्वरी चिच्छक्ति सर्वत्र समत्वानें भरलेली आहे. त्यांत कमी अधिक प्रमाण कोठेंहि नाहीं. भेद दृश्यरूपांत आहे, आद्य तत्त्वांत नाहीं. पुरुष, क्षेत्रज्ञ, आत्मा कधींच नाश पावत नाहीं, तो समत्वानें सर्वत्र सारखाच आहे.

**अनादित्वान्निर्गुणत्वात् परमात्मायमव्ययः ।**
**शरीरस्थोऽपि कौंतेय न करोति न लिप्यते ॥३१॥**

हा नित्यस्वरूप परमात्मा अनादि आणि निर्गुण असल्यामुळें, हे कौंतेया ! तो शरीरांत असूनहि अकर्ता आहे, आणि संसारापासून अलिप्त आहे. ३१

गुण हे प्रकृतीचे, आणि त्यांपासून हा जगाताचा विस्तार होतो, बदल होतो, आणि लयहि होतो. परमात्मा नित्य स्वरूप असल्यानें, कधींच बदलत नाहीं, कारण तो गुणातीत आहे. क्षेत्रांत ( शरिरांत ) वास करणारा क्षेत्री सर्व भूतमात्रांत एकच आहे, पृथग्रूप नाहीं. "असणें" एवढेंच त्यासंबंधीं

म्हणता येतें, तेथें " होणें " नाहीं. तेथें कर्तृत्व-भोक्तृत्व नाहीं, म्हणून लिप्तताहि नाहीं.

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।**
**सर्वत्रावस्थितो देहे तथाऽऽत्मा नोपलिप्यते ॥३२॥**

अत्यंत विरल असल्यामुळें सर्वगत ( विभु, वस्तुमात्रांत ओतप्रोत भरून असणारें ) असें आकाश ज्याप्रमाणें त्या वस्तूंशीं संसक्त होत नाहीं, त्याचप्रमाणें सर्व वस्तुमात्रास आधारभूत, अशा आत्मतत्त्वाला देहाच्या संपर्कानें कसलाहि गुण ( अथवा उपाधि ) चिकटत नाहीं ( कर्तृत्व किंवा भोक्तृत्व येत नाहीं ). ३२

आकाश ( अवकाश ) हा सामान्य स्थलवाचक शब्द आहे. हेंच खं, शून्यं, अनन्तम्, विरलांत विरल असें आकाश तत्त्व. याला गुरुत्व नाहीं. कांहीं तत्त्वज्ञानांत आकाश हें तत्त्वच मानीत. परंतु तें आहे, कारण त्यांतच सर्व वस्तूंची स्थिति आणि गति आहे. हें इतकें विरल आहे कीं, सूक्ष्मातिसूक्ष्म वस्तूंतहि तें आहे. तें सर्वव्यापक, अनंत आणि एकच एक आहे. त्याचे भाग होत नाहींत, आणि त्याची संततीहि दुसऱ्या कोणत्याहि वस्तूनें बाधित होत नाहीं. तें वितत, अनंत, अव्यय, नित्य, विभु आहे. कोणत्याहि वस्तूशीं संलग्न झाल्यानें त्या वस्तूचे गुण त्याला लागत नाहींत. आत्मा विभु, अनंत, अनादि, अव्यय, नित्य आहे. तो चैतन्यघन आहे. चैतन्य अनेकरूपांनीं व्यक्त होतें. उष्णता, प्रकाश, ध्वनि, वेग, विद्युत्, आकर्षण, प्राण, इंद्रियांचें स्फुरण, अंतरिंद्रियांचे व्यापार अशीं अनेक जडरूपें चैतन्य शक्तीचीं आहेत. संवित्, ज्ञान, बुद्धि, मनाचे व्यापार हे चैतन्यशक्तीचेच आविष्कार आहेत. आत्मा देहांत आहे, पण तो देहाचा नाहीं. तो अंतर्बहिः सर्वत्र आहे. तो अखंड चैतन्यस्वरूप आहे. तो कोणत्याहि देहास बांधलेला ( परिच्छिन्न ) नाहीं, तो एकच एक आहे.

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥३३॥**

हे भारता ! जसा एकटा सूर्यच हें सर्व जगत् प्रकाशित करतो, तसाच क्षेत्री ( क्षेत्रज्ञ, आत्मा ) हे सर्व क्षेत्र ( सर्व संसार, विश्व ) प्रकाशित करतो ( पृथक् क्षेत्रांना वागविणारा क्षेत्री सर्वात्मा एकच आहे ). ३३

सूर्यावरच जगताचे सर्व व्यापार अवलंबून आहेत. "सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च." अखिल वस्तुजाताचा सूर्य आत्मा आहे. वस्तूंचें अस्तित्व, प्रकाशानें प्रतीत होतें, त्याप्रमाणेंच विश्वाचें अस्तित्व, आत्म्याचेंच तें आविष्करण असल्यानें, आत्म्यानेंच प्रतीत होतें. सूर्याच्या प्रकाशाप्रमाणेंच ईश्वराची माया आहे. प्रकाश दिसत नाहीं, प्रकाशित वस्तु दिसतात. माया दिसत नाहीं, मायेचा पसारा दिसतो. प्रकाशित पदार्थांवरून प्रकाशाचें अस्तित्व आणि सूर्याचेंहि अस्तित्व कळतें, त्याचप्रमाणें विश्वरूप दर्शनानेंच ऐश्वरी शक्ति ( योगमाया ) आणि ईश्वर, यांविषयीं कल्पना होते. सूर्य सर्व जगताला प्रकाशित करतो, आणि हें प्रकाशित जगत् पाहणारांचीं इंद्रियें, मन, बुद्धि, हीं देखील त्याच सूर्यामुळें प्रकाशित होतात, त्याचप्रमाणें परमात्म्याच्या चैतन्यशक्तीनेंच संवेदित जीवात्मा ( क्षेत्री ) वस्तुतः हें क्षेत्र ( आपलें शरीर आणि जगत् ) अनुभवतो, आणि त्याचा उपभोग घेतो. संवित् जीवाची, पण तिचा उगम त्या मूलकारणांतूनच झालेला आहे.

**क्षेत्र क्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा ।**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥३४॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**
**क्षेत्रक्षेत्रज्ञविभागो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥**

अशा प्रकारें क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांमधील भेद, आणि भूतप्रकृतीचें ( अविद्यारूप अव्यक्ताचें ) पारमार्थिक असत्त्यत्व ज्यांनीं सम्यक्ज्ञानानें पूर्णत्वानें जाणलें, त्यांनाच परमात्म्याच्या त्या परम पदाची प्राप्ति होते ३४

नामरूपाचें, मायेचें, अविद्येचें पटल बाजूला झालें म्हणजेच ब्रह्म साक्षात्कार होईल. हें असें आत्मज्ञान ध्यान, ज्ञान, कर्म, भक्ति, यांपैकीं कोणत्याहि मार्गानें होईल. ज्या ज्ञानानें भूतप्रकृति म्हणजे अविद्या नाहींशी होऊन शुद्ध परमात्मस्वरूपाची प्रतीति होईल, तें ज्ञान येथें सांगितलें आहे. प्रकृति अव्यक्तरूप आहे, तिचा परिणाम, जो संसाराचा पसारा तो, अनित्य ( असत्य ) असून, सत्य काय तें एक परमात्मतत्व आहे, असें आत्मज्ञान होणें हाच भूतप्रकृतिपासून पुरुषाचा मोक्ष, आणि हीच परमात्मपदाची प्राप्ति.

---

# अध्याय चौदावा

## गुणत्रयविभाग

श्रीभगवानुवाच —

**परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।**
**यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥१॥**
**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः**
**सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ॥२॥**

श्रीभगवान् म्ह०—ज्या ज्ञानाच्या योगें सर्व मुनी ( ज्ञानी ) या संसारांतून ( मुक्त होऊन ) परमसिद्धीच्या पदाला गेले ( मुक्त झाले ), तें सर्वज्ञानांत परमश्रेष्ठ ज्ञान मी तुला पुनः सांगतों. १ याच ज्ञानाच्या आधारें मत्स्वरूप झालेले ( ज्ञानी, मुनी ) आद्य विसर्ग कालीं जन्मास येत नाहींत, आणि महाप्रलयकालीं त्या पदापासून ढळतहि नाहींत ( कारण, ते परमात्मस्वरूपच झालेले असतात ). २

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहम् ।**
**संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥३॥**
**सर्वयोनिषु कौंतेय मूर्तयः संभवन्ति याः ।**
**तासां ब्रह्ममहद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥४॥**

माझी ( ईश्वराची, क्षेत्रज्ञाची ) योनि ( जगताच्या, क्षेत्राच्या उत्पत्तीचें स्थान ) महद्ब्रह्म ( प्रकृति ) असून त्यांत, हे भारता ! मी ( जगदुत्पत्तीचें ) बीज स्थापितों, आणि तेथूनच भूतमात्राची उत्पत्ति होते. ३ सर्वच उत्पत्तिस्थानांतून, हे कौंतेया ! जी अनेक प्रकारची सृष्टि उत्पन्न होते, तिचे उत्पत्तिस्थान महद्ब्रह्मच ( प्रकृतीच ) आहे, आणि बीजदाता ( आद्यकारण ) पिता मीच आहे. ४

क्षेत्रज्ञ, आत्मा; जीव हा क्षेत्राच्या उत्पत्तीचे कारण आहे. द्रष्टा असेल तेव्हांच दृश्य उत्पन्न होईल, आणि तेव्हांच दर्शन होईल. जीव प्रकृतींत जगत् उत्पन्न करतो. अध्याय ७ मध्यें अपरा आणि परा प्रकृति सांगितली. तीच क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ, प्रकृति आणि पुरुषरूपानें मागील अध्यायांत सांगितली. परमात्मा ( पुरुषोत्तम ) शुद्ध, अव्यय, ज्ञानघन असा, आणि माया " सत्वासत्वाभ्यामनिर्वचनीय " अशी आहे. परमेश्वराच्या योगमायेचा ( चैतन्यशक्तीचा ) विलास हें आपणास दिसणारें, अनुभवास येणारें विश्व ( जगत् ) आहे. आत्मा आत्मपसाऱ्याचाच अनुभव घेत असतो. हेंच पूर्वी वेगळया प्रकारें सांगितलें, आता नव्या रूपानें सांगितलें आहे. ह्याचें वर्णन अनेक ऋषींनीं वेगवेगळया प्रकारांनीं केलें आहे. " एकं सद्विप्राः बहुधा वदन्ति ". तत्व एकच, मांडणी वेगळाली. जीवात्म्याचें, विश्वाचें, आणि विश्वात्म्याचे यथार्थ ज्ञान झालें ( एकाच सत्याची हीं वेगळालीं दर्शनें आहेत ), आणि जीवात्म्याचें विश्वात्म्यात (परमात्म्यांत) अस्तित्व विलीन झालें, म्हणजेच मोक्ष. अर्धनारी नटेश्वर या कल्पनेंत, ईश्वर आणि त्याच्या मायेची, पुरुष आणि प्रकृतीची, विश्वेश्वर आणि विश्वाची एकता हेंच सत्य अभिप्रेत आहे. प्रकृति माता, पुरुष पिता, आणि ही मातापिता दोन्ही एकच, वेगळीं नाहींत. सृष्टि अनादिच आहे, कारण ती अनादि परमात्म्याहून वेगळी नाहीं. ज्ञानचक्षूंनीं या सृष्टजगताच्या पलीकडे पाहिलें, म्हणजे केवळ एकच एक परमात्मतत्त्व दिसेल.

**सत्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।**
**निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥५॥**

हे वीरा ! प्रकृतिपासून उत्पन्न होणारे सत्त्व, रज, तम हे तीन गुण, अविनाशी ( शाश्वत ) अशा देहीला ( जीवात्म्याला, क्षेत्रज्ञाला, पुरुषाला) देहांत ( शरिरांत, क्षेत्रांत, प्रकृतींत) डांबून ठेवितात. ५

निर्गुण आत्मतत्वांत गुणप्रभव होतो, आणि सृष्टीला प्रारंभ होतो. प्रकृतिमातेपासून सत्त्व, रज, तम हीं अपत्यें होतात, आणि मुलें जशीं मातापित्यांचे संबंध अधिक घनिष्ट करतात, त्याचप्रमाणें गुण, आणि त्यांपासून होणारा सृष्टीचा पसारा, जीवाला देहाशी, क्षेत्रज्ञाला क्षेत्राशीं एकरूप करतात.

**तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।**
**सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ ॥६॥**
**रजो रागात्मकं विद्धि तृष्णाऽऽसङ्गसमुद्भवम् ।**
**तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसङ्गेन देहिनम् ॥७॥**
**तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनम् सर्वदेहिनाम् ।**
**प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥८॥**

यापैकीं, हे भारता ! सत्त्वगुण शुद्धरूप असल्यामुळें, प्रकाशरूप आणि निर्दोष असून, आत्म्याला देहाशीं सुखाच्या आणि ज्ञानाच्या बंधनानें बांधून ठेवितो. ६ हे कौन्तेया ! रजोगुण इच्छारूप असून लोभ आणि आसक्ति-पासून उद्भवतो, हें पक्कें समज; तो त्या देहीला कर्मबंधनानें बांधून घालतो. ७ तमोगुण तर अज्ञानोद्भवच असून, सर्व देहींच्या मतीचा भ्रम करणारा आहे; तो देहीला मौर्ख्यानें, आळसानें, आणि निद्रेनें बद्ध करून ठेवितो. ८

आत्मा शुद्ध चिदानंदरूप, ज्ञानघन, आनंदघन आहे. हें त्याचें अव्यक्त अविकृत, अनाविष्कृत स्वरूप. आविष्कृत रूपांत त्याच्या अगदीं जवळचा गुण सत्त्व; तेथें ओढ ज्ञानाची, आणि सुखाची. मूळ सृष्टीच ज्ञानापासून बुद्धिरूपानें, आणि आनंदापासून सुखरूपानें होते. मूळ अविद्या तीच संवित्‌रूप बुद्धिरूप असून, एकाला अनेकत्वाने, अद्वैताला द्वैतरूपानें, पाहण्याची वृत्ति आहे. मूळ प्रवृत्तीहि सुखाची इच्छा. ही जाणीव, आणि सुखेच्छा निर्मल निर्दोष आहेत तों पोवेतों, आत्मा शुद्ध स्वरूपापासून दूर असत नाहीं. त्याच्या पुढची पायरी, अहंत्वा-नंतर ममत्वाची, येथें तृष्णा सुरू होते; हें हवें, तें नको, अशी हेयाहेय बुद्धि उद्भवते. येथें संतुष्ट शांतरूप जाऊन हांव उत्पन्न झालेलें असंतुष्ट व्यग्र रूप जीवाला येतें. सुख दूर पळतें, सुखाच्या मागें केवळ धांव सुरू होते. ह्याच्या पुढची पायरी, तमोगुणाची. अतृप्ति, असंतुष्टता वाढत जाऊन सुखोपभोगासाठीं प्रमाद करण्याकडे प्रवृत्ति होते, आणि ज्ञानाच्या जागीं अज्ञान, प्रकाशाच्या जागीं अप्रकाश, कर्तृत्वाच्या जागीं आळस, आणि शांति आणि संतोषवृत्तीच्या

जागीं निद्रेचा प्रभाव दिसूं लागतो. अशी ही शुद्धसत्त्वापासून तमोगुणापावेतोंची घसरगुंडी आहे.

**सत्त्वं सुखे सञ्जयति रजः कर्माणि भारत ।**
**ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे सञ्जयत्युत ॥९॥**

सत्त्वगुण देहीला सुखासक्त करतो, रजोगुण कर्मप्रवृत्त करतो, आणि तमोगुण ज्ञानाला दाबून टाकून देहीला कुमार्गप्रवण करतो. ९

सत्त्वगुणानें सुखेच्छा, रजोगुणानें त्याकरितां धडपड, आणि तमोगुणानें इच्छित प्राप्त होण्यासाठीं दुष्कृत्य करण्याचीहि प्रवृत्ति होते.

**रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत ।**
**रजःसत्त्वं तमश्चैव तमःसत्त्वं रजस्तथा ॥१०॥**

रजोगुण आणि तमोगुणांवर कोठें सत्त्वाचा उत्कर्ष, कोठें रजोगुण आणि सत्त्वगुणांवर तमोगुणाचा पगडा, तर कोठें तमोगुण आणि सत्त्वगुणावर रजोगुणाचें प्रावल्य असतें. १०

शुद्धरूपानें सत्त्व, रज, किंवा तम फार क्वचित् दिसतात. कोठें सत्त्वाचा, तर कोठें तमोगुणाचा, तर कोठें रजोगुणाचा आविष्कार प्राण्याच्या स्वभावांत आधिक्यानें दिसतो. सृष्टि अनेकरूप विविध आणि मिश्र आहे.

**सर्वद्वारेषु देहेऽस्मिन् प्रकाश उपजायते ।**
**ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥११॥**

सर्व ज्ञानेंद्रियांत ( आणि मनांत, बुद्धींत ) विवेक ( आत्मप्रकाश ) प्रकाशला आणि आत्मवृत्ति ज्ञानप्रवण झाली, म्हणजे सत्त्वाची वृद्धि झाली असें समजावें. ११

**लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा ।**
**रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ ॥१२॥**

अर्थ संचयाची हांव, विषयलालसा, कर्माविषयीं लगबग, अशांति आणि लिप्सा हीं चिन्हें रजोगुणाचें प्राबल्य झाल्यास, हे भरतश्रेष्ठा ! उद्भत होतात. १२

**अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ।**
**तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनन्दन ॥१३॥**

अविवेक, आळस, अविचार, आणि मूढता हीं लक्षणें, हे कुरुनन्दना ! तमोगुणाच्या प्राबल्यानें उत्पन्न होतात. १३

**यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ।**
**तदोत्तमाविदां लोकानमलान् प्रतिपद्यते ॥१४॥**
**रजसि प्रलयं गत्वा कर्मसङ्गिषु जायते ।**
**तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥१५॥**

सत्त्वगुणाचें प्राधान्य असतां देही देह सोडून जाईल, तर परमज्ञान्यांना जी परम शुद्ध गति मिळते तीच त्याला प्राप्त होईल. १४ रजोगुणाचा भर असतां मरण आले, तर कर्मासक्त लोकांत पुनः जन्म येईल, तसेंच तामसी वृत्तींत असतां देहांत झाला, तर मूर्ख (पशुतुल्य) योनींत पुनर्जन्म होईल. १५

"यं यं वापि स्मरन् भावम् त्यजत्यन्ते कलेवरम् । तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः", "अन्ते मतिः सा गतिः", ज्या प्रकारचा स्वभाव अंतकाळीं पर्याप्त (दृढ) असेल,त्याला अनुसरूनच पुनः जन्म येईल. मनुष्य आपल्या बरोबर केवळ आपला स्वभाव घेऊन जातो. "यच्चाप्युत्क्रामतीश्वरः गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात." हें सर्व पूर्वजन्मीचें अर्जित घेऊन जीव पुनर्जन्म घेतो. ही अंतकाळींची वृत्ति स्वभावनिर्बद्ध असते. जन्मभर केलेली कर्मे, हृदयांत साठविलेल्या आशा आकाङ्क्षा, अंतकाळीं समोर येऊन उभ्या राहतात. त्या आपल्या म्हणून उराशीं बाळगलेल्या असतात, त्यासंबंधीं विशेष अभिनिवेश असतो, म्हणूनच तो "ईश्वर" त्यांचा स्वामी, त्या सर्वांना आपल्याबरोबर घेऊन जाऊन दुसरा जन्म घेतो.

**कर्मणः सुकृतस्याहुः सात्विकं निर्मलं फलम् ।**
**रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥१६॥**

सात्त्विक कर्माचें फल निर्दोष पुण्यपावन असें सांगितलें आहे, पण

राजसकर्मांचा परिणाम दुःख, आणि तामसकर्मांचा मूढता हाच परिणाम होतो. १६

सुकृतस्य म्हणजे सात्विकस्य. "कर्मणः सात्विकस्याहुः निर्मलं सुकृतं फलम्" सात्विक कर्ता जें कर्म करतो, तें निर्दोष सुकृत ( सत्कृत्य ) असतें, राजस कर्ता जें करतो तें अंतीं त्याच्या दुःखाला कारण होतें, आणि तामस कर्ता तर अत्यंत मूढतेचीं आणि प्रमादपूर्ण अशींच कर्में करतो.

**सत्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।**
**प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥१७॥**

सात्विकवृत्तीपासून ज्ञानप्रवणता होते, राजसवत्तीपासून विषयलालसा, आणि तामसवृत्तीपासून उन्माद, मूढता, आणि अज्ञान हींच होतात. १७

**ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः ।**
**जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः ॥१८॥**

सात्त्विकवत्तींचे लोक देवलोकाला ( उच्च गतीला ) जातात, राजसवृत्तींचे या संसारातच राहतात,आणि नीच गुणवृत्तींचे तामस,अधोगतीला जातात. १८

**नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टाऽनुपश्यति ।**
**गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥१९॥**

जेव्हां ज्ञानी पुरुष कर्तृत्व हें केवळ गुणांचें ( आत्म्याचें नाहीं ) असें जाणतो, आणि गुणातीत परमात्मस्वरूप ओळखतो, तेव्हां तो मद्रूप ( मुक्त ) होतो. १९

**गुणानेतानतीत्य त्रीन् देही देहसमुद्भवान् ।**
**जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥२०॥**

या देहाशींच निगडित असलेल्या या त्रिगुणापासून सुटका झाली म्हणजे, पुरुष ( जीव ) जन्म, मृत्यु, वार्धक्य इत्यादींच्या दुःखद फे-यांतून सुटतो, आणि अमृतत्त्वाची प्राप्ति त्याला होते ( मुक्त होतो ). २०

अर्जुन उवाच—

**कैर्लिङ्गैस्त्रीन् गुणानेतानतीतो भवति प्रभो ।**
**किमाचारः कथं चैतांस्त्रीन् गुणानतिवर्तते ॥२१॥**

अर्जुन म्ह०—हे प्रभो ! त्रिगुणातीत झालेल्याचीं लक्षणें कोणचीं ? त्याचा आचार कसा ? आणि तो गुणातीत होतो तरी कसा ? २१

श्रीभगवानुवाच—

**प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव ।**
**न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥२२॥**
**उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।**
**गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेङ्गते ॥२३॥**
**समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः ।**
**तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः ॥२४॥**
**मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः**
**सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥२५॥**

सत्त्वगुणाचा प्रकाश ( ज्ञानप्रवणता, उत्साह ), रजोगुणाची कर्मप्रवृत्ति ( मनाची लगबग ), आणि तमोगुणाची चित्तभ्रांति ( आळस ), ह्यांपैकीं कांहीं आलें तरी, त्याचा ज्याला तिटकारा नाहीं, किंवा यांपैकीं कांहीं गेलें तरी पुनः यावेत अशी ज्याला आकांक्षा ( उत्कंठा ) नाहीं, २२ जो सर्वदा तटस्थाप्रमाणेंच स्वस्थ चित्त असल्यानें, त्रिगुणांचा ज्याच्या मनावर परिणामच होत नाहीं; ( कार्यकरणविषयरूप ) गुणांची केवळ गुणांवरच क्रिया होत आहे असें जाणून, जो नेहमीं शांतचित्त असतो, ( आत्मस्वरूपापासून ) जो किंचित्‌हि विचलित होत नाहीं, २३ सुखाच्या किंवा दुःखाच्या कोणत्याहि अवस्थेंत ज्याच्या चित्ताची समता ढळत नाहीं, जो स्वात्मारामांत मग्न असतो; माती, दगड, सोनें, हीं सर्व ज्याला सारखींच; प्रिय आणि अप्रिय दोन्ही ज्याला समान, ज्याचें चित्त कशानेंहि चलित होत नाहीं, ज्याला निंदा आणि स्तुति दोन्ही सारखींच; २४ मान आणि अपमान दोन्ही ज्याला सारखेच, मित्रपक्षास आणि शत्रुपक्षास दोहींना जो सारखाच, आणि जो कोणत्याहि कामास आसक्तीनें झटत नाहीं, त्याला गुणातीत म्हणतात. २५

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।**
**स गुणान् समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ॥२६॥**
**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाऽहम् अमृतस्याव्ययस्य च ।**
**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च ॥२७॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे गुणत्रयविभागो नाम चतुर्दशोऽध्यायः**

जो कोणी ( सर्वभूतहृदयांतर्वासी अशा ) मलाच केवळ अनन्यभक्ति-भावानें भजतो, तोच या त्रिगुणांना जिंकून ब्रह्मपदप्राप्तीस योग्य होतो. २६ कारण, अमृत ( अविनाशी ) अव्यय ( अविकारी ) परमात्म्याचें, शाश्वत ( नित्य ) धर्माचे ( धर्मज्ञानाचे ), आणि अव्यभिचारी आनंदरूप सुखाचें प्रतिष्ठान (एकायतन) केवळ मीच एक ( सर्वभूताशयस्थित प्रत्यगात्माच ) आहे. २७

गुणातीतता संपन्न होण्यास एकच एक मार्ग सांगितला आहे, आणि तें अनन्य भक्ति. " अहमात्मा गुडाकेश सर्व भूताशयस्थितः " हा प्रत्यगात्मा नेहमीं सन्निध आहे. त्याच्या सान्निध्याची जाणीव सतत ठेऊन सर्व कायिक, वाचिक, मानसिक प्रवृत्ती तदर्थ करणें, हाच त्रिगुणांच्या विकारांपासून दूर राहण्याचा एकमेव मार्ग आहे. " यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं शंभो तवाराधनं " अशी वृत्ति अढळ झाल्यास, त्रिगुणाचा आणि संसाराचा ताप होणार नाहीं. हाच शाश्वत सुखाचा आणि परमपदप्राप्तीचा एकच एक मार्ग आहे. अमृत, अव्यय, परब्रह्म आपणापासून दूर नाहीं, तें येथेंच आहे, पण त्यावर आपल्या अज्ञानाचें आवरण आहे, तें बाजूस सारलें गेलें म्हणजेच त्याचें यथार्थ दर्शन होईल. शाश्वत धर्म म्हणजे सन्मान्य अनवद्य विचार आणि आचार ( विवेक, वैराग्य, सम्यक्ज्ञान, सदाचार, अनन्यभक्ति ), आणि याचें अंतिम साध्य ( परम गति ) परमात्मदर्शन हेंच आहे. एकांतिक सुख म्हणजे शुद्ध निर्दोष सुख ( आनंद ). आपल्या सांसारिक सुखांत अनेक विकाराची भेसळ असते, आणि म्हणून तें शुद्ध निरवद्य सुख नसतें. एकांतिक सुख आत्मस्वरूपसाक्षात्कारांतच आहे. शाश्वतधर्म आणि निरतिशय आत्यंतिक सुख ( परमानंद ) स्वात्मारामांतच आहेत, आणि सदासर्वदा सन्निधच आहेत.

---

# अध्याय पंधरावा

## पुरुषोत्तम योग

श्रीभगवानुवाच—

**ऊर्ध्वमूलमधःशाखं अश्वत्थं प्राहुरव्ययम् ।**
**छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥१॥**

श्रीभगवान् म्ह०—ज्याचा पर्णविस्तार वेद आहेत, अशा या अव्यय (सनातन) अश्वत्थाचें (विश्वविस्ताराचें) मूळ (आदिकारण) वर (परब्रह्म) आहे, आणि शाखा खालीं (जगतांत) आहेत, असें म्हटलें आहे. ज्याला ह्याचें (या अश्वत्थाचें) मर्म कळलें, त्याला सर्व वेदांचें मर्म कळलें. १

या विश्वरूप वृक्षाचें मूळ वर आणि शाखा खालीं असा हा नवलाईचा वृक्ष आहे. मूळ वर म्हणजे श्रेष्ठस्थानापासून परब्रह्मापासून, आणि विस्तार "अधः", म्हणजे निम्न, ह्या मृत्युलोकांत, जगतांत आहे. अश्वत्थ म्हणजे सतत अविश्रांतपणें परिवर्तन पावणारा, पण हा अव्यय म्हणजे अविनाशी, शाश्वत, सनातन आहे. सतत गतिशील, परिवर्तनशील, परंतु नाहींसा कधींच न होणारा असा हा अश्वत्थ आहे. ज्ञानरूप वेद ह्या विश्वविस्ताराचें पल्लवित आहे, म्हणजे त्याचें वैभव आहे. ह्या अश्वत्थाचें मर्म (गूढ) ज्याला कळलें, त्याला सर्व ज्ञान आत्मसात् झालें . म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. "अश्वत्थ" हा विश्वविस्तार, किंवा थोड्या मर्यादित दृष्टीनें पहावयाचें झाल्यास, हा संसारच आहे. विचार करणाऱ्या जीवाला मर्यादित प्रमाणांत त्याच्या भोंवतीच्या संसाराच्या पसाऱ्याचाच विचार करावयाचा असतो.

**अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखाः गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।**
**अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबंधीनि मनुष्यलोके ॥२॥**

त्रिगुणांनी पोसलेल्या, भोग्यविषयरूपी कोवळी पालवी ज्यांना फुटली आहे अशा याच्या ( अश्वत्थाच्या ) शाखा, वर ( श्रेष्ठ लोकाकडे ) तसेंच खालीं ( हीन लोकाकडे ) देखील पसरल्या आहेत, आणि या मनुष्यलोकांत कर्मानुबंधानें उत्पन्न होणारी याचीं मुळें देखील खाली ( हीन लोकाकडे ) पोहचलेलीं आहेत. २

हा संसार त्रिगुणांनींच उत्पन्न झाला आहे. भेद, विषमता हेंच संसाराचें मूळ आहे. देहधारी जीव आणि त्याचे भोग्य विषय, असा हा संसाराचा पसारा आहे. जसा ईश्वरापासून हा संसाराचा विस्तार झाला आहे, तसेंच त्यातील कांहीं सुकृती जीव परत वर ईश्वराकडे जातात, तर कांहीं हीनकर्माचरणानें अधोगतीलाहि जातात. हा मृत्युलोक कर्मभूमी आहे. जसें कर्म करावें तशी गति मिळते.

**न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्न च संप्रतिष्ठा ।**
**अश्वत्थमेनं सुविरूढमूलं असङ्गशस्त्रेण दृढेन छित्वा ॥३॥**
**ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन् गता न निवर्तन्ति भूयः**
**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥४॥**

या अश्वत्थाचें खरें मर्म कळतच नाहीं; याचा अंत कोठें, उद्भव कोठून, याची स्थिति कोठें, यांचें नीट आकलन होत नाहीं. या दृढमूल अश्वत्थाला अनासक्तीच्या प्रभावी खड्गाने तोडून काढून, ३ नंतर, ज्या पदाला पोहचलेल्यांना पुनरावर्तन नाहीं, तें पद प्राप्त करण्याचा यत्न करावा, आणि जेथून हा विश्वाचा अनादि पसारा आविर्भूत झाला, त्या परमपुरुषाला ( परमात्म्याला ) अनन्य भावानें शरण जावें. ४

हा विश्वाचा पसारा ( जगत्, संसार ) मानवी बुद्धीला अगम्य आणि अनाकलनीय अशा ऐश्वरी योगमायेचा विलास आहे. या पसाऱ्याविषयीं " कां, कसें, कोठून " हें कांहींच कळणें शक्य नाहीं; " केव्हां " हा प्रश्नच या संबंधीं करितां येत नाहीं. " आहे, भासतें, बुद्धीला प्रतीत होतें " एवढेंच यासंबंधीं म्हणतां येतें. संसारांत " जन्म मृत्युजराव्याधिदुःखदोष " आहेत, यांपासून जीवाची मुक्तता कशी करावयाची आणि त्याला त्याच्या शुद्ध

चिदानंद स्वरूपाची प्राप्ति कशी व्हावयाची, हें सम्यकज्ञानानें दर्शित केलें आहे. अनासक्ति, समता, संतोषवृत्ति, हे उपाय या शुद्ध, बुद्ध, परम पदाला पोहचण्याचे आहेत. अनन्यभक्तीनें, अनन्यपरायणतेनें, आत्मभावानें ही वृत्ति साध्य होऊन, परमपद प्राप्त होईल.

**निर्मानमोहा जितसङ्गदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।**
**द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत् ॥**

ज्यांचा गर्व आणि मतिभ्रम नाहींसा झाला आहे, आसक्तिदोष ज्यांनीं जिंकला आहे, आत्मज्ञानाविषयीं जे नेहमीं तत्पर आहेत, कामवासनांपासून जे सर्वस्वीं परावृत्त झाले आहेत, सुखदुःखरूप द्वंद्वापासून जे मुक्त आहेत, तेच मोहरहित ( ज्ञानी ) त्या अव्यय ( शाश्वत ) परमात्मपदाला पोंहचतात. ५

येथें थोडक्यांत भक्तांचीं आणि ज्ञान्यांचीं लक्षणें सांगितलीं आहेत. संगदोष म्हणजे संगोद्भव दोष,—काम, क्रोध, लोभ इत्यादि. या दोषांमुळेंच मनुष्य संसारांत अधिकाधिक गुरफटतो. ज्ञान लक्षणांत "अध्यात्मज्ञाननित्यत्वं" असें अ० १३ मध्यें सांगितलें. त्याप्रमाणेंच येथेंहि "अध्यात्मनित्याः" असे ज्ञानी पुरुषांना म्हटलें आहे. ज्ञानी भक्तांनाच परम पदाची प्राप्ती होते, हेंच येथें थोडक्यांत सांगितलें आहे.

**न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ।**
**यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥६॥**

त्या पदाला सूर्य, चंद्र, किंवा अग्नि प्रकाशित करूं शकत नाहींत; ज्यां पदाला पोहचल्यावर पुनरावर्तन नाहीं, तेंच माझें तेजोमय परम पद आहे. ६

सर्व वस्तु सूर्यप्रकाशानेंच दृश्य होतात, पण त्या सूर्याचेंहि तेज त्याच्याच ( परमात्म्याच्या ) तेजानें प्रतीत होतें. शशाङ्क तर परप्रकाशितच आहे, आणि अग्नीचें तेजहि त्या परब्रह्मानेंच प्रकाशित आहे. त्याच्या परम तेजापुढें सर्व तेजोमय वस्तु निस्तेज आहेत. " न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकं नेमा विद्युतो

भान्ति कुतोऽयमग्निः । तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा विश्वमिदं विभाति ॥" कठ २-२-१५ मु. २-२-१० श्वे. ६-१४.

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।**
**मनःषष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥७॥**
**शरीरं यदवाप्नोति, यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ।**
**गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात् ॥८॥**

माझाच शाश्वत अंश जेव्हां संसारांत जीवरूपानें शरीरधारी होतो तेव्हां तो प्रकृतिस्थ पञ्चेंद्रियें आणि सहावें मन यांना ओढून घेऊन आपल्या कामीं लावतो, ७ आणि जेव्हां तो देह सोडून जातो, तेव्हां तो समर्थ ( देहाचा स्वामी ) असल्यानें, जसा वायु गंधस्थानांतून गंध घेऊन जातो, तसा तो या सर्वांना काढून घेऊन निघून जातो. ८

सूर्यापासून निसृत होणारीं तेज, उष्णता, ओज ( प्राणशक्ति ) हीं जशीं पृथ्वीवरील प्राण्यांना आणि वनस्पति इत्यादिकांना जीवन देतात, त्याचप्रमाणें ईश्वरांश जीव, शरीर धारण करणाऱ्या प्राण्यांना चेतना, प्रवृत्ति, प्रेरणा देतो. सूर्यापासून मिळणारें तेज जसें सूर्याचा अंश, त्याचप्रमानें जीवतत्त्वहि ईश्वराचें अंशभूत आहे. तेज जसें अखंड, अविभाज्य आहे, पण वेगळेपणानें वेगवेगळ्या पदार्थांना दृश्यरूप करतें, तद्वतच हें जीवतत्त्व सनातन, शाश्वत, अखंड, अविभाज्य आहे, आणि विशिष्ट शरीरांत त्या त्या शरीराच्या विशिष्ट धर्माप्रमाणें प्रतीत होतें. हें वैशिष्ट्य त्या त्या प्राण्याच्या व्यक्तित्वांत आणि अस्मितेत असतें. जीवभूत परा प्रकृति, अष्टधा अपरा प्रकृतीशीं ससंक्त होऊन शरीरी होते. शरीरी होऊन जीव कर्ता भोक्ता होतो, आणि मनाला आणि इंद्रियांना आपल्या उपभोगार्थ राबवितो. तसेंच, जीव एक शरीर सोडून देऊन दुसरें घेतो, तेव्हां या मनइंद्रियादिशक्तींनाहि काढून घेऊन जातो. स्वभाव हेंच त्याचें पूर्वार्जित, पूर्वसंचित. वास्तविक या विश्वांत जीवतत्त्व हें ओतप्रोत भरलेलें आहे. तें जेथें नाहीं असा अवकाशच नाहीं. कोठें तें दृश्य आणि स्पष्ट असतें, कोठें अत्यंत सूक्ष्मतेनें अस्पष्टहि असतें. पदार्थांचें बहिरंग बदलणारें आहे, पण अंतस्तत्त्व एकच एक सनातन अविनाशी आहे. देहनाशानंतर व्यष्टिजीव

दुसऱ्या ( आपणास इष्ट अशा ) देहांत प्रवेश करतो, पण क्वचित् काष्ठ लोष्ट होऊन देखील पडतो. काष्ठलोष्टांतहि जीवभूत ईश्वरांश आहेच.

**श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।**
**अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥९॥**

श्रोत्र, नेत्र, स्पर्शेंद्रिय, जिव्हा, नासिका, आणि मन यात राहून हा ( जीवभूत ईश्वरांश ) इंद्रियार्थांचा उपभोग घेतो. ९

हा ईश्वरांश, ऐश्वरी शक्ति, सर्व चराचरांत व्यापून आहे. आंत बाहेर सर्वभरच ही शक्ति आहे. सर्वव्यापी अनंत अशी ही शक्ति एकच एक आहे. व्यक्तित्व नामरूपांत ( दृश्यात ) आहे, सर्वव्यापी चैतन्यांत नाहीं. चैतन्य तर सर्वगत आहेच, त्याला व्यक्तित्व नाहीं, जा-येहि नाहीं. अहंता, अस्मिता ही येते जाते, तिला कर्तृत्व भोक्तृत्व आहे. असा हा ईश्वरांश, जीवरूपानें पञ्चेंद्रियांच्या आणि मनाच्या द्वारें, जगतांतील विषयांचें सेवन करतो. सोपाधिक अस्मितावुद्धीच विषयोपसेवन करते. शरीराची उपाधि लागून पुरुष जीवरूप झाला, म्हणजे तदनुषंगिक विषयहि त्याला येऊन चिकटतात.

**उत्क्रामंतं स्थितं वाऽपि भुञ्जानं वा गुणान्वितम् ।**
**विमूढा नानुपश्यन्ति पशन्ति ज्ञानचक्षुषः ॥१०॥**
**यतन्तो योगिनश्चैनं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम् ।**
**यतन्तोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः ॥११॥**

एक देह सोडून दुसऱ्या देहांत जाणारा, देहांत जीवरूपानें वास करणारा, किंवा भोग भोगणारा हा जीवभूत ईश्वरांश, त्रिगुणांच्या उपाधींनीं झांकलेला असल्यामुळें, संसाराच्या मोहजालांत फसलेल्या जीवांना त्याच्या वास्तविक अशा विशुद्ध स्वरूपांत दिसत नाही; ज्याना ज्ञानदृष्टि आहे त्यांनाच तो त्याच्या केवल शुद्ध स्वरूपांत दिसतो. १० आत्मज्ञानार्थ प्रयत्न करणाऱ्या योगीजनांना तो स्वातःकरणांत प्रतीत होतो; परंतु ज्यांची बुद्धि सुसंस्कृत नाहीं, अशा अविवेकी जनांना तो प्रयत्न करूनहि दिसत नाहीं. ११

देहांत राहणारा, वागणारा, एक देह सोडून दुसऱ्या देहांत जाणारा हा जीव ईश्वरांश आहे, हे संसारी अज्ञ जनांना समजत नाहीं. त्यांना वरचें केवळ आवरण दिसतें, आणि त्या दृश्य आवरणाला ते देही असें मानतात. परंतु या दृश्याच्या मुळाशीं एक शुद्ध, नित्य, अखंड, अनश्वर असें तत्त्व आहे हें केवळ मुक्तसंग ज्ञान्यांनाच कळतें. हें जाणण्याला केवळ बुद्धीच पुरेशी होत नाहीं. बुद्धीच्याहि पलीकडे हें चैतन्यतत्त्व असल्यामुळें त्या अव्यय सनातन परमात्म्याशीं तादात्म्यानें एकरूप झाल्याशिवाय तो परमात्मा ( आत्मा तोच परमात्मा ) बुद्धीला प्रतीत होत नाहीं. त्याला तपश्चर्या लागते. इंद्रियें, मन, बुद्धि यांच्या निग्रहाशिवाय इंद्रियातीत तत्त्व कसें दिसणार? अतींद्रियदृष्टि स्वतः अतींद्रिय होण्यानेंच येऊं शकते.

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।**
**यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥१२॥**
**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।**
**पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥१३॥**
**अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनाम् देहमाश्रितः ।**
**प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥१४॥**

सर्व जगताला प्रकाशित करणारे हें जें आदित्याचें तेज, जें तेज चंद्रांत आणि अग्नींतहि आहे, तें तेज माझेंच ( परमात्म्याचेंच ) आहे, हें जाण. १२ पृथ्वींत वास करून जीवनशक्तीनें सर्वभूतमात्राचा आधार मीच होतों, आणि रसात्मा ( सर्व रसांचा आकर ) सोम होऊन मीच सर्व वनस्पतींचें ( आणि अन्नादिकांचें ) पोषण करतों. १३ मीच प्राण्यांच्या शरीरांत वास करणारा प्राणात्मा ( जाठराग्नी ) होऊन प्राण आणि अपान या दोहोंच्या संयोगानें चतुर्विध अन्नाचें पाचन करतों. १४

तेज हें महत्तत्त्व जगतांत, विश्वांतहि, एकच एक आहे. "सोमार्काग्निमयं तेजो या च तारामयी द्युतिः दिवि संजायते तेजः (विद्युत्)" हें सर्व एकाच तेजस्तत्त्वाचें पृथक् आविर्भाव आहेत. तपस् ( तेज, उष्णता, तपश्चर्या ) हेंहि तेजस्तत्त्वच आहे. हीं सर्व एकाच ऐश्वरीं तेजाचीं वेगळालीं रूपें आहेत. सर्वांत आद्य आणि

प्रभावी शक्ति तेजोरूपच आहे. या तेजाचेंहि तेज, या ज्योतीचीहि ज्योति, सर्व शक्तींची शक्ति, सर्व बुद्धींची बुद्धि, सर्व जीवाजीवांचा आधार, जीवनशक्ति, प्राणशक्ति, उत्पादनशक्ति, प्रवर्धनशक्ति, तीच ऐश्वरी योगमाया आहे. त्यांतच सर्व उत्पन्न होतें, राहतें, वाढतें, लयालाहि त्यांतच जातें. भूतधारणा करणारें पृथ्वीचें सामर्थ्य पृथ्वीला त्याच शक्तीनें प्राप्त होतें. सोम म्हणजे चंद्रमा, हाच सर्व उद्भिदांना रस देऊन पोषण करणारा आहे, असें मानतात. वैश्वानर किंवा विश्व हा अन्नप्राणमनोमय कोष, आणि जागरित हें त्याचें स्थान आहे; हें "पुरुषा" चें क्षर रूप आहे. या ठिकाणीं अन्नाचें पाचन करणारा वैश्वानर म्हटलें आहे, तो जाठराग्नि असाच अर्थ येथें घ्यावयास पाहिजे. "अयमग्निर्वैश्वानरो योऽयमंतः पुरुषे येनेदमन्नं पच्यते" बृ. ५·९

**सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।**
**वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदांतकृद्वेदविदेव चाहम्॥१५॥**

सर्वांच्या अंतःकरणात मीच (परमात्मा) अधिष्ठित आहे. स्मृति (स्वात्मानुबोध), सिद्धांतदर्शन, आणि शंकानिवृत्ति मजपासूनच उद्भवतात. सर्व वेदज्ञानाचा विषय मीच आहे. ब्रह्मविद्येचा प्रतिपादक मी, आणि ब्रह्मविद्या जाणणाराहि मीच आहे. १५

ज्ञानघन, चिद्घन, आनंदघन परमात्मा प्राणिमात्राच्या हृदयांत (बुद्धींत) आहे. प्रथम (आद्य) प्रेरणा बुद्धि, आणि तेथूनच संसाराचा, जगतांतील अनुभवाचा प्रारंभ होतो. स्मृति आणि ज्ञान दोन्ही बुद्धीपासूनच उद्भवतात. बुद्धीला सम्यकज्ञान झालें (म्हणजे आत्मस्वरूपाचें ज्ञान झालें) तर त्यानें ज्ञात्याला परमपदाची प्राप्ति होते. कैवल्योपनिषदांत "अहं विजानामि विविक्तरूपो। न चास्ति वेत्ता मम चित्सदाऽहम्। वेदैरनेकैरहमेव वेद्यो। वेदान्तकृद्वेदविदेव चाहम्॥" असा समानार्थी श्लोक आहे. स्मृति ही परमेश्वराचा फार मोठी देणगी आहे. स्मृतीनेंच सर्व व्यवहार चालू शकतात. स्मृतिभ्रंश झाल्यास विनाश हा ठेवलेलाच. स्मृतिप्रमाणें विस्मृतिहि संसारांत पुष्कळ प्रसंगीं अत्यंत हितकारक होते. विस्मृति नसेल तर मनुष्य नेहमीं दुःखी कष्टि राहील, आणि आत्मोद्धाराची आशाहि अनेकांना दिसणार नाहीं. सम्यक्ज्ञानाचा उपदेश, तसेंच सम्यक्ज्ञानाचा उपदेशक, आणि त्या ज्ञानाचें ग्रहण

करणारा, ह्या सर्वांची एकरूपता झाली म्हणजेच आत्मस्वरूपाचें (परमात्म-स्वरूपाचें) ज्ञान होऊं शकतें अंतरंगांतील सत्तत्वच आत्मज्ञानोपदेशानें जागृत होतें. ज्ञान बाहेरून येत नाहीं.

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।**
**क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥१६॥**
**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।**
**यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥१७॥**

या जीव लोकांत ( जगतांत ) क्षर आणि अक्षर असे दोन पुरुषभेद आहेत; सृष्टजात ( भूतसृष्टि ) क्षर ( विनाशी ) आहे, आणि कूटस्थ ( अव्यक्त, जीवात्मा ) अक्षर ( अविनाशी ) आहे, असें म्हटलें आहे. १६ या व्यातिरिक्त (या दोहोंच्या पलीकडे असणारा ) उत्तम पुरुष आहे त्याला परमात्मा असें म्हणतात, जो सनातन परमेश्वर तीनहि लोक व्यापून त्यांचें धारण करीत आहे. १७

पुरुष ( परमात्मा ) क्षर आणि अक्षर दोन्ही रूपांनीं जगतांत आहे. विनाशी किंवा नित्य बदलणारें सृष्टजात क्षर रूपानें ( क्षेत्र ), आणि अविनाशी, अव्यय, कूटस्थ ( गूढरूप ) अक्षर रूपानें ( क्षेत्रज्ञ, जीवात्मा ) सर्व सृष्टि व्यापून आहे. जें जें कांहीं आहे तें पुरुषच. "पुरुष एवेदं सर्वं." क्षर अक्षर, पुरुषोत्तम हे भेद मानवाच्या बुद्धीला परमात्म्याचें ज्ञान होण्याकरितांच केवळ मानलेले आहेत, वस्तुतः सर्व एकच एक सत्य आहे.

**यस्मात्क्षरमतीतोऽहं अक्षरादपि चोत्तमः ।**
**अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥१८॥**

मी ( परमात्मा ) क्षराच्या पलीकडे आणि अक्षरापेक्षांहि अत्यंत श्रेष्ठ असल्यामुळें, मला या संसारांत, आणि वेदांतहि पुरुषोत्तम मानलें आहे. १८

सृष्ट जगताच्या ( चेतनाचेतनाच्या ) पलीकडे तो पुरुषोत्तम ( परमात्मा ) आहे. "स भूमिं विश्वतो वृत्वा अत्यतिष्ठत् दशाङ्गुलम्" असें वेदांत वर्णन आहे.

**यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।**
**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥१९॥**

**इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयाऽनघ ।**
**एतद्बुद्ध्वा बुद्धिमान् स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥२०॥**
**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**
**पुरुषोत्तमयोगो नाम पञ्चदशोऽध्यायः**

संसारभ्रमनिर्मुक्त जो ज्ञानी माझें हें पुरुषोत्तमस्वरूप यथार्थतेनें जाणतो, तोच सर्वज्ञ माझा अनन्य भावानें भक्त होतो. १९ असें हें परमरहस्य गीताशास्त्र, हे निष्पाप अर्जुना ! तुला मी सांगितलें. हे भारता ! हें यथार्थतेनें समजलें म्हणजे बुद्धिमान पुरुष कृतकृत्य ( परम संतुष्ट ) होतो. २०

या अध्यायांत सांगितलेलें हेंच गीताशास्त्र. हें समजून घेऊन त्याप्रमाणें वागावें हा गीतेचा आदेश आहे. “ सर्वं खल्विदं ब्रह्म, ” सर्व कांहीं तें परब्रह्मच आहे, हें गुह्य तत्त्व वेगळाल्या मतमतांतरांचा परामर्ष घेऊन पुनः पुनः स्पष्टतेनें मांडलें आहे. “ वासुदेवः सर्वम् ” हें यथार्थतेनें समजून घेऊन, त्याप्रमाणें ज्ञानपूर्वक वर्तन करून, भक्तीनें, अनन्यभावाने, श्रद्धेनें परमेश्वराशीं एकरूप होणें, हें श्रीगीतेचे योगशास्त्र आहे. अशा ज्ञानाचा ज्याच्या बुद्धीवर संस्कार झाला, ज्याला हें परमगुह्य पूर्णपणें समजले, त्याला सर्व कांहीं समजलें, त्याचे सर्व भाव ईश्वराशीं एकरूप होतील, त्याला ईश्वराशिवाय दुसरें कांहींच उरणार नाहीं. मग त्याला इच्छा नाहीं, आकांक्षा नाहीं, राग-द्वेष, सुख-दुःख, हेयाहेय, प्रियाप्रिय हीं द्वंद्वेहि नाहींत. हेंच सर्वांत श्रेष्ठ शास्त्र, आणि हाच सर्व धर्मांचा समन्वय. त्याप्रमाणें समजून जो वागेल तो मुक्तच झाला, त्यानें जें करावयाचें तें केलें, जाणावयाचें तें जाणलें,आणि मिळवावयाचे तें सर्व मिळविलें. हा गीतेंतला मौलिक अध्याय मानला आहे. दुसऱ्या अध्यायापासून, सांख्य आणि बुद्धियोग, कर्मांची अपरिहार्यता आणि आवश्यकता, कर्माला ज्ञानाची जोड, कर्मसंन्यास, ध्यानयोग, सविज्ञान ज्ञान, परब्रह्मस्वरूप, जीवात्मा आणि परमात्मस्वरूप, ऐश्वरी विभूती, विश्वरूपदर्शन, भक्तियोग, क्षराक्षर–क्षेत्रक्षेत्रज्ञ विचार, प्रकृतिगुणभेद, अशा पायरी पायरीनें, गीता शास्त्राच्या सारभूत तत्त्वांचें विवेचन येथपावेतों झालें.

# अध्याय सोळावा

## दैवासुरसंपत्

श्रीभगवानुवाच—

**अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।**
**दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥१॥**
**अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम् ।**
**दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥२॥**
**तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।**
**भवन्ति सम्पदं दैवीमभिजातस्य भारत ॥३॥**

श्रीभगवान् म्ह०—अभीरुता, शुद्धात्मकता, आत्मज्ञानाप्ति आणि (ध्यान धारणादि उपायांनीं) स्वात्मसंवेद्यतावाप्ति याविषयीं निष्ठा, परार्थ त्याग, इंद्रियदमन, ईश्वरोपायन, वेदाध्ययन, तपश्चर्या, सरलता, १ कोणासहि पीडा न देणें, यथार्थ भाषण, क्रोधराहित्य, वैराग्य, शांतचित्तता, दुसऱ्याचें व्यंग न काढणें, भूतमात्राविषयीं दया, निर्लोभिता, स्वभावाचा गोडपणा, विनय, स्थिरस्वभाव, २ करारीपणा, क्षमाशीलत्व, उत्साह, अन्तर्बाह्यशुचिता, अनसूया, निगर्वीपणा, (हे गुण) दैवी (सात्त्विक) भाग्य असणारांना जन्मानेंच प्राप्त असतात. ३

सात्त्विक वृत्ति (किंवा राजसी, तामसी वृत्ति) सामान्यतः जन्मजातच असते. कित्येकांचे ठिकाणीं ती जन्मजात असूनहि संसाराच्या प्रलोभनांनीं दबलेलीहि असते, परंतु हळूं हळूं उचंबळणाऱ्या कामक्रोधादि वृत्ती थंड पडल्यावर, ती स्वाभाविक वृत्ति स्पष्ट दिसूं लागते. शुद्ध सात्त्विक वृत्ति, म्हणजे दैवी संपत्, ही पूर्वजन्मार्जित (अभिजातंच) असते. ती पूर्वकर्माप्रमाणें कमीअधिक प्रमाणांत असते. वर सांगितलेले सर्वगुण, आपण ज्यांस सात्त्विक

वृत्ति म्हणूं, ते सर्वच सात्त्विक माणसांत सांपडतील असें नाहीं. पण यांपैकीं कांहीं थोड्याफार प्रमाणांत सांपडतील. शुद्ध सात्त्विक वृत्तीच्या ज्ञानी जनांत मात्र हे सर्वच गुण असावयास पाहिजेत. अध्याय ९ श्लोक १२ मध्यें राक्षसी आणि आसुरी प्रकृतीविषयीं उल्लेख आहे. त्याविषयींचें विस्तृत वर्णन आतां या अध्यायांत आहे. पहिला आणि मुख्य दैवी गुण अभय. शुद्ध सात्त्विक सत्त्वाला कशाचेंच भय नाहीं "आनंदं ब्रह्मणो विद्वान्न बिभेति कुतश्च न।" तै. २-९ जो सर्वांशींच समत्वानें वागतो त्याला भय कसलें ? सर्वांत मोठें भय मरणाचें पण मरण केवळ शरीराचेंच, जीवात्म्याला मरण नाहीं असें समजलें, आणि तें बुद्धीला पटलें म्हणजे मरणाचें भयहि वाटणार नाहीं, किंवा निदान कमी होईल यांत संशय नाहीं. सत्त्वसंशुद्धि म्हणजे शरीर, मन, बुद्धि सर्वांचीच शुद्धता ( शुद्धात्मकता ). शास्त्राध्ययनानें आणि आचार्यांपासून मिळावयाचें तें आत्मज्ञान, आणि अभ्यासानें ध्यानधारणादिकांनीं सानुभव आत्मप्रतीति तो योग, यांविषयीं दृढनिष्ठा ती ज्ञानयोगव्यवस्थिति. दान, हें सत्पात्रीं आणि निरपेक्ष बुद्धीनें देणें. दम म्हणजे इंद्रियमनोनिग्रह. ईश्वरार्पण बुद्ध्या त्याग-बुद्धीनें केलेलें कर्म, तो यज्ञ. आत्मज्ञानार्थ वेदाध्ययन, तो स्वाध्याय. इंद्रियांचें आणि मनाचें अध्यात्मोन्नत्यर्थ विनयन, तें तप. स्वभावांत आणि आचरणांत ऋजुता ( सरलता ), आणि बाहेरून एक अंतरंग दुसरेंच असें नसणें, तें आर्जव. कोणासहि शारीरिक किंवा मानसिक पीडा न देणें, आणि सर्वभूतांशीं समत्वानें असणें, ती अहिंसा. सत्यस्वरूप परमेश्वराला स्मरून वागणें, तें सत्य. कोणाविषयींहि मनांत द्वेषभाव न धरणें, कोणासहि शब्दानें किंवा कृतीनें न दुखविणें, हा अक्रोध. कोणताहि लोभ मनांत न धरतां, केवळ सर्वभूत-हितार्थच कर्म करणें, किंवा आत्मसमर्पण करणें, तो त्याग. कोणत्याहि परिस्थितींत चित्ताचें स्वास्थ्य ढळूं न देणें, ही शांति. कोणाचेंहि उणें न काढणें, आणि मनांत कोणाचेंहि अहित न चिंतणें, हें अपैशुन. दया, भूतमात्राविषयीं. यदृच्छालाभसंतुष्ट आणि विमत्सर, तो अलोलुप. मृदुभाषण आणि प्रेमळवर्तन, हें मार्दव. ही म्हणजे विनयशीलता ( "ह्रिया देयम्" असें म्हटलें आहे ). स्थिर स्वभाव आणि विचारपूर्वक वर्तन, हें अचापल. पाणीदारपणा, बाणेदार-पणा, शौर्य, हें तेज. प्रतिकार करण्याचें पूर्ण सामर्थ्य असतांहि, मनःसंयमन

करून, दुसऱ्याचें अपराध पोटांत घालणें, ही क्षमा. कोणत्याहि परिस्थितीत धीर न सोडतां, आपलें कर्तव्य करीत राहणें, ही धृति. अंतर्बाह्य ( मानसिक, बौद्धिक, शारीरिक ) शुचिता, हें शौच. कोणाचाहि, कोणत्याहि कारणास्तव, द्वेष न करणें, निर्मत्सर असणें, हा अद्रोह. मानपानाविषयीं हट्ट न धरणें, ही नातिमानिता. हे सर्व सात्त्विक दैवी गुण आहेत.

**दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ।।४।।**

हे पार्था ! आसुरी भाग्यानें जन्मास आलेल्या माणसांत, ढोंगीपणा उद्धटपणा, वृथा गर्व, रागीटपणा, निष्ठुरता, मूर्खता हे दुर्गुण आढळतात. ४

आसुरी प्रकृतीला राक्षसीहि म्हटलें आहे. सत्त्वगुणप्रधान ती दैवी संपत्. विकृत दुष्ट राजसी किंवा तामसी, ती आसुरी किंवा राक्षसी संपत्. कोणताहि गुण ( सत्त्व, रज, तम ) एकान्त शुद्ध कोठेंच आढळत नाहीं. गुणांचें सर्वत्र मिश्रण असतें. जो गुण उत्कटतेनें प्रादुर्भूत होतो, त्याला अनुसरूनच वृत्ति किंवा स्वभाव, सात्त्विक, तामस, राजस, दैवी, आसुरी असें म्हणावयाचें.

**दैवी संपत् विमोक्षाय निबंधायासुरी मता ।**
**मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि भारत ।।५।।**

दैवी संपत् संसारबंधापासून मुक्त होण्यास, आणि आसुरी अधिकाधिक बद्ध करण्यास कारणीभूत होते, असें मानिलें आहे, पण अर्जुना ! तूं कष्टी होऊं नकोस, तुला जन्माने दैवी संपत् प्राप्त झाली आहे. ५

**द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन् दैव आसुर एव च ।**
**दैवो विस्तरशः प्रोक्तो आसुरं पार्थ मे शृणु ।।६।।**
**प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।**
**न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ।।७।।**
**असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।**
**अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ।।८।।**

या जीवलोकांत सृष्टि दोन प्रकारची आहे, दैवी आणि आसुरी.

दैवी विस्तारानें सांगितली. आतां आसुरी सांगतों, पार्था ! ऐक. ६ आसुरी वृत्तीच्या माणसांना कशाकडे प्रवृत्ति असावी, निवृत्ति कशापासून असावी, हें नीट कळत नाहीं; शुचिता, सदाचार, सत्यनिष्ठा हीं त्यांच्यांत नसतात. ७ ह्या जगांत सत्य नाहीं, स्थैर्य किंवा निश्चितपणाहि नाहीं, याला कोणी शास्ता नाहीं, येथे व्यक्तींचा एकमेकांशीं कांहीं जिव्हाळ्याचा संबंध नाहीं, एवढेंच नव्हे, हें जगत् केवळ कामोपभोगार्थच आहे असें हे आसुरवृत्तीचे लोक मानतात. ८

सत्कर्माकडे प्रवृत्ति आणि दुष्कर्मापासून निवृत्ति हा सदाचार. दुर्योधन म्हणाला—" जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः । जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः ॥' स्वभावाला औषध नाहीं. जन्मतःच प्राणी आपला स्वभाव बरोबर घेऊन येतो. परिस्थितीनें, संगतीने, संस्कारानीं, शिक्षणानें त्यांत बदल होऊं शकतो, पण मूळ बीजांत बदल तपश्चर्येशिवाय होत नाहीं. स्वभाव हेंच पूर्व जन्मार्जित. त्याचा परिणाम आयुष्यावर झाल्याशिवाय राहत नाहीं. संसाराचें स्थैर्य सत्यावर आधारलेलें आहे. परंतु, आसुरीवृत्तीच्या माणसाला संसारांत खोटे, पणानें वागूनच इष्ट प्राप्ति होते, असें वाटतें. येथें सन्मार्गाचे नियम शाश्वत आहेत, असें त्यांना वाटत नाहीं. खोटें बोलावें आणि लबाडीनें वागावें-फसवाफसवी करावी, आणि चैन करावी, ही त्यांची वृत्ति या जगाचा कोणी नियंता ( शास्ता ) आहे, असें ते मानीत नाहींत. संसारांत परस्पर ऋणानुबंध कांहीं नाहींत, सर्व कांहीं आपल्या चैनीकरिता आहे, आपण कोणाचें कांहीं लागत नाहीं, आपलें कांहीं कर्तव्य असें नाहीं, असें ते समजतात. " परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ " हा उपदेश त्यांना पटत नाहीं. एक आपली चैन, या शिवाय दुसरें कांहींहि त्यांना दिसत नाहीं. संभूत म्हणजे भावित ( अनुबद्ध ); " परस्परसंभूत " म्हणजे एकमेकाशीं उत्तरदायित्वानें संबंधित; अपरस्परसंभूत म्हणजे परस्पराशीं ऋणानुबंध नसलेले. आपण कोणाचें कांहीं लागत नाहीं, आपलें कर्तव्य असें कांहीं नाहीं, आपण स्वतंत्र, स्वाधीन, स्वयंसिद्ध आहोंत, आणि स्वैर वागावयास कांहींच प्रत्यवाय नाहीं, असें आसुरी स्वभावाचे लोक समजतात. आपण जें कांहीं आहोंत, आपणापाशीं जें कांहीं आहे, तें आपण केवळ आपल्याच सामर्थ्यानें मिळविलेलें नाहीं, तें

आपणास मातापित्यापासून, संबंधींजनांपासून, कुलापासून, समाजापासून, पूर्वपरंपरेनें मिळालेलें आहे, आणि यासाठीं आपण या सर्वांचें ऋणी आहोंत, आपण या ऋणाची फेड यथाशक्ति यथायोग्य मार्गानें करावयास पाहिजे, ही जाणीव प्रत्येक विचारी माणसास असावयास पाहिजे. “ ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्। तेन व्यक्तेन भुंजीथा मा गृधः कस्यस्वित् धनम्॥ ” “ ईश,”वर सांगितलेल्या अनेकरूपांनीं प्राण्याच्या जीविताला उपकारक होतो. त्या उपकारांची फेड योग्य स्थानीं त्यागबुद्धीनें आपलें यत्किंचित् प्राप्त यथाशक्ति देऊनच करणें अवश्य आहे. गुरुजनांची सेवा, संबंधींजनांचा योग्यादर, कुलहितदक्षता, सत्पात्रीं दान, ज्ञानोपासना, कर्तव्यदक्षता, आणि ईश्वरार्थ सर्वकर्मसमर्पण या मार्गांनींच ह्या उपकारांची फेड थोडीबहुत होऊं शकते, म्हणून “ ह्रियादेयम् ” असें सांगितलें आहे. ईश्वरास निवेदन (नैवेद्य) करूनच जसें अन्न भक्षण करावयाचें, तसेंच परार्थ यथाशक्ति देऊनच भोगांचें सेवन त्यागबुद्धीनें करावयाचें, ही सनातन वैदिक धर्माची मौलिक शिकवण आहे.

**एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः।**
**प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥९॥**
**काममाश्रित्य दुष्पूरं दंभमानमदान्विताः।**
**मोहाद्गृहीत्वाऽसद्ग्रहान् प्रवर्तन्तेऽशुचिव्रताः ॥१०॥**
**चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः।**
**कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥११॥**
**आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः।**
**ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥१२॥**

अशा प्रकारची आपली ( विकृत ) समजूत करून घेऊन, हे दुष्ट स्वभावाचे, घोर कर्में करणारे, सर्वांचे शत्रु, जगताच्या नाशाला उद्युक्त होतात. ९ कधींहि तृप्त न होणारी हांव धरून, हे ढोंगी, गर्विष्ठ, उन्मत्त, अमंगळ कर्में करणारे, मूर्खपणानें भलतेच खोटे आग्रह धरून, दुष्कर्मास

प्रवृत्त होतात. १० अमर्याद आणि केवळ मरणानंतरच संपणारी अशी काळजी वाहणारे, कामोपभोग हीच एक जीविताची इतिकर्तव्यता समजणारे, जें कांहीं आहे तें येथें ( या संसारांतच ) आहे असें निश्चयानें मानणारे, ११ शेंकडों आशा–आकाक्षांच्या जाळ्यांत गुरफटलेले, काम क्रोधांतच केवळ चूर असलेले, असे ते ( आसुरी वृत्तींचें लोक ) आपले इच्छित भोग उपभोगण्यासाठीं अन्याय्य मार्गांनीं धनसंचय करण्याची इच्छा करतात. १२

**इदमद्य मया लब्धमिदं प्राप्स्ये मनोरथम् ।**
**इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥१३॥**
**असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।**
**ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान् सुखी ॥१४॥**
**आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।**
**यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥१५॥**
**अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः ।**
**प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ ॥१६॥**

हें आज मला मिळालें, आता माझी ही इच्छा पूर्ण होईल, हें माझें आहेच, आतां तेंहि धन माझेंच होणार आहे; १३ माझ्या या शत्रूला मी नाहींसा केला, आतां इतरांनाहि नाहींसें करीन; मी समर्थ आहे, मला सर्व भोग प्राप्त आहेत, मी परिपूर्ण आहें, बलवान आहें, मला सर्व सुखें उपलब्ध आहेत; १४ मी श्रीमान् आहें, उच्च कुलाचा आहें, माझ्या सारखा दुसरा कोण आहे? मी यजन करतों, दान देतों, आनंद उपभोगतों या अशा मूर्खकल्पनांनीं वाञ्चित, १५ अनेक कुकल्पनांनीं गोंधळलेले, भ्रमांत सांपडलेले, विषयोपभोगांत बुडलेले ते ( आसुरी वृत्तीचे लोक ) अत्यंत निंद्य अशा नरकांत पडतात. १६

विषयलंपट मनुष्याच्या महत्त्वाकांक्षांना मर्यादाच असत नाहीं. “ न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥ ”. दुष्ट स्वभावाचे लोक इतरांना आपले दास बनविण्यासाठीं लबाडीनें आणि अन्या-

यानें धनसंचय करतात, आणि गरीबांच्या तोंडचें अन्न काढून घेतात. वित्त साठविण्यांत अनर्थ, आणि नंतर त्याच्या उपयोगांत तर त्यापेक्षांहि मोठें अनर्थ होतात. काम आणि त्याचें अधिक विकृत रूप लोभ, ह्यांचें बीज आणि आधार वित्तांतच आहे. कामानंतर, तितकाच अन्यायास प्रवृत्त करणारा क्रोध आहे. तोच दीर्घ काळ टिकला म्हणजे अधिक विकृत होऊन द्वेष रूपानें मनाचा ताबा घेतो. सर्व भोग आपणासच असावें, सर्वांनीं आपल्यापुढें लवावें, ही दुष्ट-बुद्धि सर्वांना दुःख देणारी, पण शेवटीं आपल्याच नाशाला कारण होते, हें विजयाचे भरांत जेत्याला समजत नाहीं, पण त्याच्या अशा वर्तनानें तो सर्वांनाच आपले वैरी करून घेऊन आपल्याच नाशाचीं बीजें पेरीत असतो. तो यजन करतो, दानहि करतो, पण हें सर्व आपला बडेजाव वाढविण्या-करितां करतो. त्याचा आनंद, चैन, नाचरंग त्याच्या पायाखालची जमीन कापीत असतात, पण विजयाच्या भरात त्याला हें कळत नाहीं, आणि या सर्वांचा शेवट त्याच्या समूळ नाशांतच होतो.

**आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।**
**यजन्ते नामयज्ञैस्ते दम्भेनाविधिपूर्वकम् ॥१७॥**
**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।**
**मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः ॥१८॥**
**तानहं द्विषतः क्रूरान् संसारेषु नराधमान् ।**
**क्षिपाम्यजस्रमशुभान् आसुरीष्वेव योनिषु ॥१९॥**
**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।**
**मामप्राप्यैव कौंतेय ततो यान्त्यधमां गतिम् ॥२०॥**

अहंमन्य ( आपणच आपली प्रौढी मिरविणारे ), गर्विष्ठ, धनाची आणि मानाची धुंदी चढलेले, शास्त्रविधी सोडून नाममात्र यज्ञानीं ढोंगी-पणानें ते देवताराधन करतात. १७ आत्मप्रौढी, दांडगाई, उन्मत्तता, काम-भोगेच्छा, आणि क्रोध या दुर्गुणांनीं परिपूर्ण असे हे लोक, आपल्या आणि दुसऱ्यांच्याहि देहांत वास करणाऱ्या ( अंतरात्म्याला ) मला द्वेषानें खोटेच दोष लावतात. १८ अशा माझ्याशीं ( सर्वांतर्यामी सर्वसाक्षी

परमेश्वराशीं ) वैर करणाऱ्या क्रूर पापी नराधमांना मी पुनः पुनः आसुरी ( राक्षसी ) जन्मालाच घालतो. १९ हे कौंतेया ! असे हे मूर्ख ( सन्मार्गापासून वञ्चित झालेले ) जन्मोजन्मीं आसुर योनीलाच जाऊन, माझी प्राप्ति कधींहि न होतां अत्यंत नीच कोटीला पोंह्चतात. २०

जेथें केवळ बाहेरच्या धार्मिक मानलेल्या देखाव्याला महत्त्व आहे, तेथें कामवासना अशा ढोंगी धार्मिकतेचेंच रूप घेतात. हें धर्माचें नाममात्र आडंबर आत्यंतिक अधर्मपूर्णच असतें. ढोंग हें तर सर्वांत हीन पाप त्यांत परवंचनाबरोबर आत्मवंचनहि पूर्णपणें असतें, आणि म्हणून त्यापासून सुटका होणें कठीण. सर्वांतर्यामी परमेश्वरास असे लोक ओळखत नाहींत. सर्वभूतांतर्यामी परमेश्वर आहे, म्हणून सर्व प्राणिमात्राचा द्वेष करणें, आपल्या उपभोगाकरितां त्यांना हीन मानणे, हा परमेश्वराचा द्वेष करणें आहे. आपल्या अंतरात्म्याला हीनबुद्धीनें लेखणं म्हणजे ईश्वराचाच द्वेष करणें आहे. " ममैवांशो जीवलोके जीवभूत सनातनः " हा जीव रूप धारण करणारा ईश्वरांश जो ओळखत नाहीं, तो " आत्मैव रिपुरात्मनः " आत्म शत्रूच आहे. जीवात्मा एक शरीर सोडून दुसऱ्या शरीरांत जातो तेव्हां आपलें अर्जित ( आपला स्वभाव ) घेऊन जातो. आणि तदनुरूप पुनः जन्म घेतो. असे दुष्ट लोक व्याघ्र सिंह सर्पादि योनींत जन्म घेतात, किंवा घाणेरडे वृक्ष किंवा दगड होऊन पडतात. त्यांचा स्वभावच त्यांना हीन योनीला घेऊन जातो. त्यांत कांहीं आशेचा किरण असेल तरच त्यांचा उद्धार होणें शक्य होईल.

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।**
**कामः क्रोधः तथा लोभः तस्मादेतत् त्रयं त्यजेत् ॥२१॥**
**एतैर्विमुक्तः कौंतेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।**
**आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥२२॥**

काम, क्रोध आणि लोभ हे तीन स्वात्मनाशाला आणि अधोगतीला नेणारे मार्ग आहेत, म्हणून यांचा सर्वस्वीं त्याग करावा. २१ या तीन पापमार्गांपासून दूर राहिल्यास मनुष्य स्वात्मकल्याणाच्या मार्गाला लागेल, आणि हे कौंतेया ? नंतर त्याला उत्तम गति प्राप्त होईल. २२

" महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् " असें कामाविषयीं सांगितलें आहे. पण काम हा जीवाचा धर्म आहे. आणि " धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि " असेंहि म्हटलें आहे. जीवित धरणाला अवश्य काम प्राणिमात्राला आहेच. पण तोच वाढत जाऊन विकृत होऊन क्रोध किंवा लोभ या रूपांनीं आपल्या आणि दुसऱ्यांच्याहि जीवितालाच मारक झाला, तर मग मात्र तो अधोगतीला आणि स्वात्मनाशाला कारण होतो. अतृप्त काम क्रोधाचें रूप धारण करतो, आणि अनियमित काम लोभरूप होऊन परस्वापहरण, धनसंचय इत्यादि प्रवृत्ति उत्पन्न करून असंतोष, अशांति, आणि दुःखाला कारण होतो.

**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।**
**न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥२३॥**
**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥२४॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे दैवासुरसंपाद्विभागो नाम षोडशोऽध्यायः**

जो कोणी शास्त्रविहित ( गीताशास्त्रविहित ) मार्ग सोडून स्वेच्छाचारानें वागतो त्याला कृतकृत्यता नाहीं, खरा आनंद नाहीं, आणि सद्गतीहि नाहीं. २३ म्हणून तुला कर्तव्याकर्तव्य निर्णयास हें शास्त्रच प्रमाण मानावयास पाहिजे. ज्ञानाधिष्ठित आणि शास्त्रविधियुक्त कर्मच या संसारात तुला करणें योग्य होईल. २४

तर्कशुद्ध, बुद्धिगम्य, औपनिषदिक वेदांततत्त्वज्ञानावर अधिष्ठित, असें हें गीताशास्त्रच कार्याकार्य-निर्णायक होऊं शकतें. निर्मानमोह होऊन अनासक्त योगानें सर्व कर्में ईश्वरार्पण बुद्धीनें आचरून, " वासुदेवः सर्वम् " असें समजून साम्यबुद्धीनें वागणें, हेंच परम कर्तव्य आहे. असें वागण्यानेंच मनुष्यास आपलें निश्रेयस साध्य करून घेतां येईल, आणि कर्मबंधापासून मुक्त होतां येईल.

---

# अध्याय सतरावा

## श्रद्धा

अर्जुन उवाच—

**ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयाऽन्विताः ।**
**तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्वमाहो रजस्तमः ॥१॥**

अर्जुन म्ह०—( मागील अध्यायाच्या शेवटीं सांगितल्या प्रमाणें ) जे कोणी शास्त्रविहित आचरण न करितां, केवळ श्रद्धेनें यजन ( ईश्वरपूजन) करतात, त्याची ती निष्ठा ( श्रद्धा ) सात्त्विक, राजस, का तामस ? हें श्रीकृष्णा ! ( मला सांग ). १

श्रीभगवानुवाच—

**त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ।**
**सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥२॥**
**सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।**
**श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥३॥**

श्रीभगवान् म्ह०—श्रद्धा तीन प्रकारची, ती देहस्वामीच्या (जीवाच्या) स्वभावाप्रमाणें सात्त्विक, राजस, किंवा तामस असते, ( ती कशी तें ) सांगतों, ऐक. २ हे भारता ! श्रद्धा ज्याच्या त्याच्या सत्वानुरूप ( स्वभावानुरूप ) असते, पुरुष (जीव) हा श्रद्धेनेंच बनलेला आहे; जशी ज्याची श्रद्धा तसाच तो ( त्याचा स्वभाव ) असतो. ३

कार्याकार्यव्यवस्थितीला गीताशास्त्रच प्रमाण असावें, आणि त्या शास्त्राचें सुतरां ज्ञान करून घेऊन, तदनुरोधानें कर्माचरण करावें म्हणून मागील अध्यायांत सांगितलें. पण हें ज्ञान आत्मसात् करण्याइतकी बुद्धि नसेल, चित्त परमेश्वराच्या स्वरूपीं स्थिर राहत नसेल, त्याला उपाय म्हणून सांगितलेल्या

अभ्यास योगाचा विधि अवगत नसेल, किंवा अभ्यासयोग साध्य होत नसेल, कर्म योगाच्या विधीप्रमाणें सर्व कर्मे ईश्वरार्पण बुद्धीनें करणें आणि सर्वकर्मफलत्याग जमत नसेल, तर मग श्रद्धेनें यजन (देवतार्चन) केल्यास सद्गति मिळेल, किंवा नाहीं? " ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना । अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥ अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वाऽन्येभ्य उपासते । तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥". श्रद्धायुक्त उपासनेनेंहि आत्मोद्धार होईल. पण उपासना कोणत्या दैवताची, आणि श्रद्धा कोणत्या प्रकारची यावर हें अवलंबून राहील. सत्त्व म्हणजे स्वभाव, आत्मभाव. यालाच अनुसरून मनुष्याच्या श्रद्धेचा, निष्ठेचा, किंवा बुद्धीचा निश्चय असतो. श्रद्धा म्हणजे संप्रत्यय, अमक्याच मार्गानें इष्ट प्राप्ति होईल असा आत्मनिश्चय, आणि त्याप्रमाणें वागण्याची सिद्धता.

**यजन्ते सात्त्विका देवान् यक्षरक्षांसि राजसाः ।**
**भूतान् प्रेतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ॥४॥**

सात्त्विक बुद्धीचे लोक देवांची पूजा (भक्ति) करतात, राजसस्वभावाचे यक्षरक्षोगणांना, आणि तामस स्वभावाचे भूतांना आणि प्रेतगणाना पुजतात. ४

**अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः ।**
**दम्भाहंकारसंयुक्ता कामरागबलान्विताः ॥५॥**
**कर्षयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ।**
**मां चैवान्तःशरीरस्थं तान् विद्ध्याऽऽसुरनिश्चयान् ॥६॥**

जे ढोंगी अहंमन्य लोक भोगेच्छेच्या आणि विषयासक्ततेच्या भरानें वागून, आपल्या शरीरातील भौतिक शक्तींना पीडा देऊन, अविचारानें सर्वभूतांतर्यामी अशा मलाहि शिणवून, शास्त्रविधीला विरुद्ध असलेल्या उग्र मार्गांनीं तपाचर्या करतात, त्यांची निष्ठा (श्रद्धा) आसुरी आहे, हें पक्कें समज. ५,६

**आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ।**
**यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥७॥**

या सर्वांचे (सात्त्विक, राजस, तामस स्वभावाच्या लोकांचे) तीन प्रकारचे आवडते आहार, तसेंच यज्ञ, तपें, दानेंहि तीनप्रकारचीं असतात; त्यांचे हे वेगळाले प्रकार ऐक. ७

"विकाराश्च गुणाश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान्" अशा ह्या प्रकृतीच्या विकारानीं आणि त्रिगुणांनींच हा सर्व संसार झाला आहे. सर्व भावात आणि कर्मात त्रिगुणभेद आहेत.

**आयुःसत्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।**
**रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः॥८॥**
**कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ।**
**आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥९॥**
**यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् ।**
**उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥१०॥**

आयुष्य, उत्साह, शक्ति, आरोग्य, शारीरस्वास्थ्य आणि चित्ताची प्रसन्नता वाढविणारे असे, रसभरित, सौम्य, स्थायी गुणांचे, रुचकर ( मधुर ) आहार सात्त्विक जनांना आवडतात. ८ तिखट, आंबट खारट, जळजळीत, चटकदार, निःस्नेह, झणझणित असे, शरीराला पीडा आणि मनाला क्लेश देणारे आणि रोग उत्पन्न करणारे आहार राजसांना आवडतात. ९ प्रहरउलटून गेलेलें ( चव गेलेलें ), नीरस ( निर्वीर्य ), घाणेरडें, फारवेळ ठेवलेलें ( शिळें ), उष्टे, अपवित्र असें जेवण तामसी प्रकृतीच्या माणसांना आवडतें. १०

**अफलाकाङ्क्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।**
**यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥११॥**
**अभिसंधाय तु फलं दम्भार्थमपि चैव यत् ।**
**इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥१२॥**
**विधिहीनमसृष्टान्नं मन्त्रहीनमदक्षिणम् ।**
**श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥१३॥**

'फलाची इच्छा न धरितां, शास्त्रोक्त विधीनें, आणि केवळ कर्तव्य म्हणूनच एकाग्र चित्तानें केलेला यज्ञ तो सात्त्विक म्हणावा. ११ फलेच्छेच्या अभिसंधानानें ( हेतुपूर्वक, आसक्तीनें ), अथवा केवळ बडेजाव मिरविण्याच्या हेतूनें जो यज्ञसंरंभ, हे भरत श्रेष्ठा ! त्याला राजस यज्ञ जाण. १२ शास्त्रविधि सोडून केलेला, ज्यांत अन्नदान मन्त्रोच्चार किंवा दाक्षिणादान नाही असा, श्रद्धायुक्त बुद्धि नसतांना केलेला यज्ञ, तो तामस यज्ञ म्हणावयाचा. १३

यजन, पूजन, उपासना प्रत्येकाच्या स्वभावास अनुसरूनच केलीं जातात. जशी श्रद्धा तसा देव, आणि तशीच त्या देवाची किंवा दैवताची ( ध्येयाची ) आराधना. यजन पूजन देवाचें ( मूर्तीचें ) असो, की संकल्पित ध्येयाचें असो, त्या " राध्यदेवते " प्रमाणेंच मनाची बुद्धीची आणि कर्माचीहि घडण होऊं लागते. त्या मूर्तीला आपलें मन आणि बुद्धि जसें रूप देतात, तशी ती बनते, आणि आपल्या मनास आणि बुद्धीस उलट त्याचप्रमाणें बनविते. अशी ही संसारांत " परस्पर भावना " आहे. सात्त्विक यजनांत श्रद्धा अनासक्ति आणि अनहंकार असतात, राजस यजनात श्रद्धा असते, पण फलाकांक्षा आणि अहंभावहि असतो, आणि तामसांत श्रद्धा नसतेच, उलट मूढता प्रमाद आणि उन्मत्तपणा असतो.

**देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।**
**ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥१४॥**
**अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।**
**स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥१५॥**
**मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।**
**भावसंशुद्धिरित्येतत् तपो मानसमुच्यते ॥१६॥**

देव ब्राह्मण गुरुजन ज्ञानीपुरुष यांचा सन्मान, अंतर्बहिः शुचिता, स्वभावाची सरलता, विद्याध्ययन, आणि कोणासही पीडा न देण्याचें व्रत, याला शारीर तपश्चर्या म्हणतात. १४ दुसऱ्याला मर्मी न लागणारें, यथार्थ मधुर आणि हितकर भाषण, आणि वेदाध्ययन हें वाचिक तप म्हणावयाचें. १५ चित्ताची प्रसन्नता, शांति, मौन, मनोनिग्रह आणि शुद्धसंकल्प यांस मानस तप म्हणतात. १६

ही कायिक, वाचिक, मानसिक तपश्चर्या आत्मोद्धारासाठीं अत्यंत आवश्यक आहे.

**श्रद्धया परया तप्तं तपस्तत् त्रिविधं नरैः ।**
**अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्विकं परिचक्षते ॥१७॥**
**सत्कारमानपूजार्थं तपो दंभेन चैव यत् ।**
**क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥१८॥**
**मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः ।**
**परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥१९॥**

( वर सांगितलेलें ) त्रिविध तप ( कायिक, वाचिक, मानसिक ) दृढ श्रद्धेनें, फललालसाविरहित निरपेक्षबुद्धीनें, एकाग्रचित्तानें ( नियतांतः-करणानें ) आचरलेलें, तें सात्त्विक तप म्हणावयाचें. १७ लोकांत आदर, मान, आणि पूज्यता मिळविण्यासाठीं ढोंगीपणानें केलेल्या तपास राजस तप म्हणतात, तें अस्थिर ( दिखाऊ ) आणि फार वेळ न टिकणारें असतें. १८ मूर्ख समजुतीनें, आपल्या शरीरास आणि मनास पीडा देणारें, किंवा दुसऱ्याच्या नाशाच्या उद्देशानें केलेलें, तें तामस तप म्हणतात. १९

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥२०॥**
**यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ।**
**दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥२१॥**
**अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।**
**असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥२२॥**

आपल्यावर ज्याचे उपकार झालेले नाहींत अशा व्यक्तीला, देणें योग्य म्हणूनच, योग्य स्थळीं योग्य काळीं सत्पात्री दिलेले तें सात्त्विक दान असें म्हटलें आहे. २० उपकार फेडण्यासाठींच, किंवा पुढें फलदायी होईल या बुद्धीनें, हृदयाला पीळ पाडून दिलेलें दान तें राजस असें म्हणतात. २१ अयोग्य स्थळीं, अयोग्य काळीं, अयोग्य जनास, सत्काररहित, आणि अपमानपूर्वक दिलेलें दान तें तामस म्हणावयाचे. २२

" ये के चास्मच्छ्रेयांसो ब्राह्मणास्तेषां त्वया आसनेन प्रश्वसितव्यम्। श्रद्धया देयम्। अश्रद्धयाऽदेयम्। श्रिया देयम्। ह्रिया देयम्। भिया देयम्। संविदा देयम्।" या प्रमाणें दान करावयाचें तें श्रद्धेनें द्यावें, अश्रद्धेनें देऊं नये, आपल्या संपत्तीप्रमाणे द्यावें, विनयानें द्यावें, संकट टाळण्यासाठीं द्यावें, ज्ञानपूर्वक द्यावें; असा तैत्तिरीयोपनिषद् शिक्षावल्लींत उपदेश आहे.

**ॐतत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।**
**ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥२३॥**
**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ।**
**प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥२४॥**

ॐतत्सत् असा ब्रह्माचा त्रिविध (तीन प्रकारानीं ) निर्देश (निर्वचन, उच्चार ) शास्त्रांत केला आहे. याच त्रिविधनिर्देशानें पूर्वीं ( पुरातन काळीं ) ब्राह्मण ( मन्त्र विनियोग, कर्मकाड ), वेद ( ज्ञानकांड ), आणि यज्ञ ( समर्पण, उपासना ) यांचे विधि निर्माण केले गेले, २३ म्हणून ॐ असा उच्चार करूनच वेदवेत्त्यांची शास्त्रोपदिष्ट यज्ञदान तपःकर्मे नेहमीं होत असतात. २४

**तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपःक्रियाः ।**
**दानक्रियाश्च विविधाः क्रियन्ते मोक्षकांक्षिभिः ॥२५॥**

तत् असा ब्रह्माचा ( प्रणवाचा ) उच्चार करून, फलाभिसंधानवर्जित ( फलाविषयीं अत्यंत अनासक्त ) मुमुक्षुजन सर्व यज्ञ दान आणि तपःकर्मे करीत असतात. २५

**सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।**
**प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥२६॥**
**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।**
**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥२७॥**
**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।**
**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥२८॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रद्धात्रयविभागो नाम सप्तदशोऽध्यायः**

सत् ह्या पदाचा प्रयोग सद्भाव (अस्तित्व, असणे, प्राप्त होणें), आणि साधुभाव ( मंगल कल्याण होणें ) या अर्थीं केला जातो, तसेंच प्रशस्त ( स्तुत्य, श्रेयस्कर ) कर्माला सत् ( सत्कर्म) हा शब्द योजितात. २६ यज्ञ, तप, दान या कर्मांत स्थिरता ( स्थिरबुद्धि, श्रद्धा ) सत् ( सद्बुद्धि ) आहे असें म्हणतात, आणि यासंबंधीं कर्मांनाहि सत् ( सत्कर्म ) म्हणतात. २७ श्रद्धा नसतां केलेलें यजन दान किंवा तपश्चर्या, आणि त्यासाठीं केलेलें कर्माचरण असत् ( निष्फल, कल्याण न करणारें, अप्रशस्त ) आहे असें म्हणतात; असें यजन, दान, तप किंवा कर्म मरणोत्तर ( परलोकीं ) सद्गति देणारें होत नाहीं, आणि संसारांतहि (इहलोकींहि) ते कल्याणकारी नाहीं. २८

वेदविहित आणि शास्त्रविहित कर्में, ॐ ह्या मंत्राचा उच्चार करून आरंभावयाचीं, आणि फलाकांक्षा सोडून निःश्रेयसप्राप्तिसाठीं करावयाचीं. कर्मकांडांत सांगितलेलीं काम्यकर्में वर्ज करून, वेदशास्त्रविहित कर्में करावयाचीं तीं सत् म्हणजे शुभ, शुद्ध, निःश्रेयस देणारीं अशीं आहेत; तीं आत्मशुद्धीसाठीं अवश्य करावयास पाहिजेत. यज्ञदानतपःकर्मांत स्थिति ती स्थिरबुद्धि ( श्रद्धा ), आणि सात्त्विकश्रद्धायुक्त कर्म तेंच सत्कर्म. सात्त्विक श्रद्धा नसेल तर केवळ कर्माचरण सर्वस्वीं निष्फलच होईल, तें चित्ताला शांति आणि समाधान देणार नाहीं, आणि त्यापासून अंतीं सद्गतीहि मिळणार नाहीं. पूर्ण श्रद्धा म्हणजे श्रद्धेयाविषयीं मनांत किंचित् देखील संशय नसणें. संशय नष्ट झाल्याशिवाय बुद्धि स्थिर होत नाहीं, आणि बुद्धि स्थिर असल्याशिवाय स्वात्मोन्नति होणार नाहीं. " नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः " व्यावहारिक किंवा लौकिक ज्ञान देखील श्रद्धेशिवाय आत्मसात होत नाहीं. आत्मज्ञान तर अंतःकरणाला आणि अंतरंगाला, (शुद्ध आत्म्यापावेतों) जाऊन भिडावयास पाहिजे, तेथें मनांत संशय किंवा आशंका असून कसें चालेल ? पूर्ण शुद्ध सात्त्विक श्रद्धेशिवाय ज्ञान सर्वस्वीं निष्फल आहे.

---

# अध्याय अठरावा

## मोक्षसंन्यासयोग

अर्जुन उवाच—

**संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् ।**
**त्यागस्य च हृषीकेश पृथक् केशिनिषूदन ॥१॥**

अर्जुन म्ह०—हे महाबाहो, हृषीकेशा, केशवा ! संन्यासाचें आणि त्यागाचें तत्त्व ( खरें स्वरूप, सारभूत अर्थ ) फोड करून समजून घेण्याची माझी इच्छा आहे. १

संन्यास आणि त्याग यांत भेद कोणता ? दोहोंचीं वैशिष्ट्यें कोणचीं ? यांचे खरे अर्थ काय ? यांचें आचरण कोणी आणि कसें करावयाचें ? असा आतां शेवटीं अर्जुनाचा प्रश्न आहे.

श्रीभगवानुवाच—

**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥२॥**

श्रीभगवान् म्ह०—काम्यकर्मांचा न्यास (त्याग) तो संन्यास, असें महाज्ञानी ( मुनी ) म्हणतात, आणि सर्व कर्मफलांचा परित्याग तो त्याग, असें दूरदर्शी पण्डित म्हणतात. ३

**त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ।**
**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ॥३॥**

कर्म हें दोषास्पद म्हणून ( किंवा सदोष तेवढेंच ) सोडावें असें कांहीं विचारी ज्ञानवन्त म्हणतात, आणि दुसरे कांहीं ज्ञानी यज्ञ दान तप हीं कर्में कधींच सोडूं नयेत असें म्हणतात. २

" दोषवत् इति कर्म त्याज्यम् " म्हणजे सर्वच कर्मे दोषपूर्ण आहेत म्हणून त्यांचा परित्याग करावा असा अर्थ केला जातो, किंवा " दोषवत् कर्म त्याज्यम् इति प्राहुः " सदोष कर्मे तेवढीं सोडावीं असाहि अर्थ कोणी करतात. येथें वेगवेगळीं मतें प्रथम मांडून त्यासंबंधीं निश्चित निर्णय आतां पुढें दिला आहे.

**निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।**
**त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥४॥**
**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।**
**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥५॥**
**एतान्यपि तु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च ।**
**कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥६॥**

हे भरतोत्तमा ! ह्या त्यागासंबंधीं माझा निश्चित निर्णय ऐक. हे पराक्रमी पुरुषा ! त्याग तीन प्रकारचा ( सात्त्विक, राजस आणि तामस ) सांगितला आहे. ४ यज्ञकर्म, दानकर्म आणि तपःकर्म हीं कर्मे केव्हांहि सोडणें योग्य नाहीं; हीं कर्मे तर केलींच पाहिजेत; ( कारण ) यज्ञ दान आणि तप हीं कर्मे विचारवन्त ज्ञान्यानां अंतर्बाह्य शुद्ध करणारीं आहेत.५ परंतु हीं कर्मे देखील आसक्ति आणि फलाशा सोडूनच करावयास पाहिजेत; हे पार्था ! असें हें माझें निश्चित आणि निर्णायक मत आहे. ६

वर दोषवत् कर्म म्हटलें, तें काम्यकर्म किंवा निषिद्धकर्म. अशीं कर्मे तर करावयाचींच नाहींत. वेदविहित यज्ञदानतपःकर्मे करण्याचीं आवश्यता आहे काय ? तीं करणें योग्य आहे काय ? एवढाच काय तो येथें प्रश्न आहे. तीं केलींच पाहिजेत, मात्र त्या कर्मासंबंधीं आसक्ति नसावी आणि फललालसा नसावी, असा येथें निर्णय दिला आहे. या कर्माव्यतिरिक्त इतरहि अनेक कर्मे आणि कर्तव्यें आहेत. शरीरधारणेस, समाज धारणेस, लोकसंग्रहार्थ, लोकोपकारार्थ, आत्मोद्धारार्थ अशीं अनेक आवश्यक कर्मे आहेत, तींहि अनासक्तवृत्तीनें आणि फललालसा सोडून केलींच पाहिजेत असाच निर्णय " सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् " असें पुढें श्लो० ४८ मध्यें सांगून दिला आहे. सहज प्राप्त नियत कर्मे यांचा अर्थ ज्याच्या त्याच्या परिस्थितीप्रमाणें

होईल, सर्वांना एकाच दावणींत गोंवतां येणार नाहीं. कर्मांचा नितांत परित्याग तर शक्यच नाहीं, पण त्यागाचा अर्थहि ज्याच्या त्याच्या परिस्थितिप्रमाणें आणि अधिकाराप्रमाणेंच करावयास पाहिजे. सर्वभूतहितत्व समत्वबुद्धि आणि सर्व कर्मे ईश्वरसमर्पणबुद्ध्या करणें यासंबंधीं वारंवार सांगितलें आहे, तोच कर्मासंबंधींहि निश्चित निर्णय आहे.

**नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।**
**मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥७॥**
**दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात् त्यजेत् ।**
**स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥८॥**

सहज ( स्वाभाविक ) आणि अनिवार्य अशा कर्मांचा परित्याग करणें योग्यच नाहीं. चित्तभ्रमानें (मूर्खपणानें) अशा कर्मांचा त्याग करण्याचा प्रयत्न केल्यास तो त्याग तामस म्हणावयाचा. ७ कर्म कठीण म्हणून किंवा शरीराला कष्ट होतील या भयाने, जो कोणी नियत कर्म ( आपल्या वाट्यास आलेले ) सोडील, त्याचा तो त्याग राजस त्याग होईल, आणि त्याला खऱ्या त्यागाचें फल ( चित्त शुद्धि, किंवा शांति ) मिळणार नाहीं. ८

**कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।**
**सङ्गं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ॥९॥**
**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।**
**त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥१०॥**

नियत ( सहज, स्वाभाविक, प्राप्त ) कर्म कर्तव्यबुद्धीनें, आसक्ति आणि फलाकांक्षा सोडून केल्यास, तो सात्त्विक त्याग झाला म्हणावयाचा. ९ सात्त्विकनिष्ठेचा स्थिरबुद्धि, आणि ( ज्ञानानें ) ज्याचा संशय नष्ट झाला आहे असा त्यागी पुरुष, सुखकारक नाहींत अशा कर्मांचा तिटकारा करीत नाहीं, किंवा हितकर ( काम्य ) कर्मांत गुंतूनहि राहत नाहीं. १०

**न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।**
**यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥११॥**

देहधारी जीवास सर्वस्वीं कर्मांचा परित्याग करणें शक्य नाहीं; जो कर्मफलाची लालसा धरीत नाहीं, त्यासच त्यागी म्हणावयाचें. ११

देह आहे तोंवर कर्म आहे, तें केवळ शारीर कर्म. असें कर्म घडते, तें मुद्दाम करावें लागत नाहीं. अशा कर्माविषयीं फलाकांक्षा असणें स्वाभाविक आहे, पण त्यांत सदोष असें कांहीं नाहीं. प्रकृतिज कर्मासंबंधीं फललालसा असत नाहीं, लालसा काम्य कर्मासंबंधीं असते. मनःस्वास्थ्यासाठीं, अंतर्बहिः शुद्धतेसाठीं, आत्मोन्नतीसाठीं करावयाचीं कर्में असाच येथें कर्माचा अर्थ आहे. जिवांत जीव आहे तोंवर कोणासहि आत्मकर्तव्य टाळतां येणार नाहीं, आणि तें टाळण्याचा प्रयत्न केला तर आत्मकल्याणास, सुखास, चित्तस्वास्थ्यास, शांतीस आणि समाधानास मुकावें लागेल. कर्तव्यकर्म तर केलेंच पाहिजे, पण तें करीत असता त्या कर्माविषयीं आसक्ति असूं नये, आणि तें कर्म फलाच्या लालसेनें करूं नये, म्हणजेच चित्तास शांति लाभेल.

**अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।**
**भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥१२॥**

( कर्म फलासंबंधीं ) त्यागबुद्धि नसणारांनाच केवळ मरणानंतर अनिष्ट ( अधोगति, नरकादि ), इष्ट ( स्वर्गादि ), किंवा मिश्र ( न अनिष्ट न इष्ट, म्हणजे परत मनुष्य जन्म ) अशीं कर्मांचीं फळें भोगावीं लागतात, परंतु ( काम्य कर्मांचा त्याग ज्यांनीं केला आहे अशा ) परमार्थ संन्याशांना ह्यापैकीं कांहींहि प्राप्त होत नाहीं. १२

परमार्थसंन्यासी बंधविनिर्मुक्तच झालेला असतो. त्याच्या देहावसानानंतरच्या गतीचा विचार करण्याचें कारणच नाहीं. तो या देहींच मुक्त असल्यानें देहावसानानंतर मुक्त आहेच यात संशय नाहीं. “ इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः । निर्दोषं हि समं ब्रह्म तस्मात् ब्रह्मणि ते स्थिताः,” मरणोत्तर मुक्ति अशी अद्वैतवेदांताची कल्पना नाहीं. पूर्णप्रज्ञ तर जीवन्मुक्तच असतो, आणि तो सर्वदाच मुक्त राहणार.

**पञ्चैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।**
**सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥१३॥**
**अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।**
**विविधाश्च पृथक् चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ॥१४॥**
**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।**
**न्याय्यं वा विपरीतं वा पञ्चैते तस्य हेतवः ॥१५॥**

हे महाबाहो ! सर्व कर्मांच्या फलसिद्धीला वेदांत शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें पाच हेतु ( कार्यसिद्ध्यर्थ ) असतात, ते मी सांगतों, नीट ऐक १३. ( प्रथम ) अधिष्ठान ( शरीर ), ( द्वितीय ) कर्ता ( प्रेरक जीव ), ( तृतीय ) वेगळालीं साधनें ( मन इंद्रियादि ), (चतुर्थ) क्रियासंपादनार्थ विविध व्यापार, आणि ( पञ्चम ) दैवी ( दशेंद्रियें, मन, बुद्धि यांचें धारण-ग्रहण–संप्रेरण करणारी ) क्षमता. १४ मनुष्य शरिरानें, वाचेनें, मनानें जें जें काहीं सत्कर्म किंवा असत्कर्म करतो, त्याची सिद्धि याच पांच कारणानीं होत असते. १५

सांख्य म्हणजे विश्लेषणात्मक ज्ञान, किंवा वेदान्त तत्त्वज्ञान. कृतान्त म्हणजे कर्मासंबंधीं सिद्धांत. ज्या भावावर, स्थलावर, वस्तुवर क्रिया घडते, तें अधिष्ठान ( उदा० चित्रकलेला पट ), क्रिया करणारा ( चित्रकार ) तो कर्ता, विविध साधनें ( रंग, कुंचलें इत्यादि ) तीं करणें, विविध चेष्टा ( पट तयार करण्यापासून चित्र सिद्ध होईपावेतोंच्या क्रिया ), आणि दैव (हस्तनेत्रादि इंद्रियांचें आणि बुद्धीचें चित्रण कौशल्य). हें दैव स्वाभाविक (नैसार्गिक ईश्वरदत्त ), अभ्यासार्जित, आणि परिस्थितिनिष्ठित असें त्रिविध असतें. सर्व बाह्य साधनें आणि अभ्यासहि सारखाच असून देखील, एकास दुसऱ्यासारखें उत्तम चित्र काढणें शक्य होत नाहीं, किंबहुना त्या एकाच चिताऱ्यास सर्वच चित्रें सारखीं उत्तमोत्तम साधत नाहींत. हेंच दैव किंवा देवाचा प्रसाद. प्रयत्न करूनहि सर्वांना सारखें यश लाभत नाहीं. असें हें दैव अलौकिक आहे. सर्वांतर्यामी परमेश्वराचा ( अंतर्यामी ईश्वराचा ) हा प्रसाद आहे. तोच सर्वांतर्यामी परमात्मा व्यक्तिगुणकर्मानुसार वेगवेगळा आविर्भूत होतो, आणि

त्याच्या ( सर्वांतर्यामीच्या ) व्यक्तिगत सामर्थ्यानें व्यक्तीच्या कर्माचें निर्वर्तन होत असतें.

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।**
**पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥१६॥**

असें आहे म्हणून, जो अविवेकी मनुष्य, त्याच्या बुद्धीला सुसंस्कार झाला नसल्यामुळें, शुद्ध आत्मतत्त्वालाच कर्ता मानतो, त्याला खरें तत्त्व समजलेलेंच नाही, ( असेंच म्हणावयास पाहिजे ). १६

कोणतीहि क्रिया सिद्ध होण्यास वर सांगितलेले पांच हेतूच कारणीभूत असल्यानें, आणि यांतील कर्ता हा उपहित जीव असल्यानें, शुद्ध, निर्विकार आत्माच कर्ता आहे असें मानणें, हें अज्ञान आहे. देहाचा संबंध जीवाशीं आहे, निरुपाधिक केवल स्वतंत्र आत्म्याशीं नाहीं. शुद्ध आत्मा ईश्वरांश आहे, तो तर नित्य, विभु, तटस्थ केवल कर्मसाक्षी आहे. तो कर्मकर्ता नाहीं, आणि त्याला कर्मबंधहि नाहीं.

**यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।**
**हत्वाऽपि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते ॥१७॥**

ज्याच्या चित्तांत अहंभाव नाहीं आणि ज्याची बुद्धि कर्मफललालसेनें दूषित झालेली नाहीं, त्याच्या हातून कोणाची हत्याहि झाली, तरी त्यानें ती हत्त्या केली असें होत नाहीं, आणि त्याला त्या कर्माचा बंधहि होत नाहीं. १७

सहेतुक वध नसेल तर तो वध मानला जात नाहीं, पूर्व संकल्प किंवा पूर्व अभिप्राय नसेल तर सहज स्वाभाविक नैसर्गिक आवेगानें झालेल्या क्रियेनें कर्ता दोषार्ह मानला जात नाहीं. आपल्या हातून प्रत्यहीं अनेक जीवांची हिंसा अहेतुकपणें होत असते, ती आपण जाणून बुजून साभिनिवेश करीत नसल्यानें आणि आपणास त्यापासून कांहींहि मिळवावयाचें नसल्यामुळें, ती हिंसा आपण " केली " असें होत नाहीं, आणि त्याचें पाप आपणास लागत नाहीं.

**ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।**
**करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥१८॥**

कर्माला प्रेरणा ज्ञाता, ज्ञेय, आणि ज्ञान यांच्या संघातानें होते, आणि कर्ता, करण (साधन), आणि क्रिया संपादनार्थ व्यापार, याच्या संयोजनाने कार्यांची सिद्धि होते. १८

ज्ञात्याला ( कर्त्याला ) कोणत्याहि विषयाचें ( ज्ञेयाचें ) ज्ञान ज्ञानेंद्रियांचे द्वारां झालें म्हणजे, त्याला त्या विषयाला अनुलक्षून क्रिया करण्याची प्रेरणा होते, आणि मग तो कर्मेंद्रियांचे द्वारां ( करणांनीं ) कर्माचें संपादन करतो.

**ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।**
**प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥१९॥**

गुणसंख्यानशास्त्रांत ( सांख्य शास्त्रात ) ज्ञान, कर्म, आणि कर्ता यांचे गुणभेदानें तीन प्रकारानें वर्गीकरण केलें आहे, त्याचें यथाशास्त्र विवेचन आतां ऐक. १९

सत्त्व, रजस् आणि तमस् हे तीन गुण आणि गौण ( गुणांचे ) व्यापार यांचें विवेचन विस्तारानें सांख्य शास्त्रात केलें आहे. हा सांख्य शास्त्राचा गुणभेदसिद्धांत वेदांतशास्त्रास मान्य आहे.

**सर्वभूतेषु येनैकम् भावमव्ययमीक्षते ।**
**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥२०॥**

जें ज्ञान झाल्यानें ज्ञाता यच्चावत् सृष्ट पदार्थांत एकच नित्य असें तत्त्व पाहतो, आणि विभिन्न पदार्थांत एकच अविभिन्न आत्मतत्त्व पाहतो, तें ज्ञान सात्त्विक जाणावें. २०

**पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान् पृथग्विधान् ।**
**वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥२१॥**
**यत्तु कृत्स्नवदेकस्मिन् कार्ये सक्तमहैतुकम् ।**
**अतत्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥२२॥**

जें ज्ञान सर्व सृष्टपदार्थांत पृथक्त्वबुद्धीनें अनेक वेगळाले गुणधर्म ( किंवा आशय ) पाहतें, तें ज्ञान राजस आहे, असें समज. २१ परंतु जें ज्ञान एकाच कार्यांत ( किंवा देहांत ) सर्वच कांहीं ( जीवित सर्वस्व )

पाहतें, ज्या ज्ञानांत आसक्ति असते, अन्य कांहींच उद्दिष्ट ज्यांत नसतें, आणि जें कोणत्याहि उच्च तत्त्वावर आधारलेलें नसल्यामुळें क्षुद्रवृत्तींचें आणि कोतें असतें, त्या ज्ञानास तामस ज्ञान म्हणतात. २२

आकाशवत् एकच एक आत्मतत्त्व सर्व सृष्टजातास अंतर्बाह्य व्यापून आहे आणि या दृश्य अनेकत्वांत परमार्थतः एकत्वच आहे, असें सात्त्विक बुद्धीच्या माणसास पटतें. पण लौकिक व्यवहाराची राजस दृष्टि असणारास हें एकत्व पटणें कठीण असतें. सृष्टींतील नानात्व विवेकानें मिथ्या ( अयथार्थ ) ठरतें. विवेकी ज्ञान्याच्या चर्मचक्षूंस सृष्टींत नानात्व दिसेल, पण त्याच्या ज्ञानचक्षूंस मात्र सर्वत्र एकत्त्व दिसूं शकते. तामस वृत्तीच्या माणसाला मात्र स्वार्थापलीकडे कांहींच दिसत नाहीं. या दृश्य सृष्टीच्या मुळाशीं कांहीं महत्तत्त्व आहे, हें त्याला समजत नाहीं, कारण त्याची दृष्टि आपल्या पुरतीच आणि अत्यंत कोती असते. कार्यांत म्हणजे आपल्या या भौतिक शरीरांतच जीविताचे सर्वस्व आहे असें त्याला वाटते, आणि आपल्या शरीर भोगापेक्षा अन्य कांहींहि श्रेष्ठ भावना त्याला मान्य नसतात. " असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् । अपरस्परसंभूतं किमन्यत्काम हैतुकम् ॥" असें तामस जनांचें वर्णन अ० १६ मध्यें केलें आहे.

**नियतं सङ्गरहितं अरागद्वेषतः कृतम् ।**
**अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥२३॥**
**यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ।**
**क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥२४॥**

स्वभावपरिस्थित्यनुरूप आपल्या वाट्यास आलेलें, ज्याविषयीं चित्तांत किंचित्‌हि आसक्ति नाहीं असें, ज्याच्यासंबंधीं अंतःकरणाची ओढ किंवा तिटकाराहि नसतो असें, फलाविषयीं कामना न धरणाऱ्या ज्ञान्यानें केलेलें जें कर्म, तें सात्त्विक कर्म म्हणावयाचें. २३ फलकामनेनें, किंवा अहंकारानें प्रेरित होऊन, अत्यंत अभियोगानें ( झटून ) केलेलें जें कर्म, त्याला राजस कर्म म्हणतात. २४

नियत म्हणजे स्वभावानें, जन्मानें, परिस्थितीनें, धर्मानें, शास्त्रानें आणि

कर्तव्य बुद्धीनें अवश्य करणीय ठरलेलें कर्म. कर्माला उद्दिष्ट किंवा प्रेरणा असणारच. पण त्यांत जर लोभ नसेल, उद्दिष्टाभिनिवेश नसेल, आसक्ति नसेल, आणि तें सहजशुद्धभावप्रेरित असेल, तर तें कर्म सात्त्विकच म्हणावयाचें चित्ताची शांति ज्यानें ढळत नाहीं तें सात्त्विक, आणि ज्यानें चित्तक्षोभ होतो, हांव अधिकाधिक वाढतें, तें राजस कर्म.

**अनुबंधं क्षयं हिंसामनवेक्ष्य च पौरुषम् ।**
**मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥२५॥**

परिणामाचा, ( संभाव्य ) नाशाचा, इतरांना पीडा होईल याचा, किंवा आपणास हें झेपेल किंवा नाहीं याचाहि विचार न करितां अविवेकानें केलेलें कर्म, तें तामस कर्म असें म्हणतात. २५

क्रोधानें, द्वेषानें, किंवा अनावर भोगलालसेनें प्रेरित झालेला अविचारी मनुष्य आपल्या कृत्याचा परिणाम काय होईल, त्यापासून कोणते उत्पात होतील, दुसऱ्याचा किंवा आपलाहि कदाचित् त्यानें नाश होईल याचाहि विचार करीत नाहीं. आपल्या बलाबलाचेंहि त्याला भान राहत नाहीं, तो केवळ मोहमदिरेनें धुंद झालेला असतो.

**मुक्तसङ्गोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ।**
**सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते ॥२६॥**
**रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।**
**हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥२७॥**

विषयांचा आसङ्ग आणि अहंभाव सोडून, स्थिरचित्तानें आणि निश्चयपूर्ण तन्मयतेनें कार्य करणारा, कार्यसिद्धि झाली किंवा न झाली तरी चित्तक्षोभ होऊं न देणारा कर्ता, सात्त्विक कर्ता म्हणावयाचा. २६ विषयलंपट, फलावरच केवळ दृष्टि ठेऊन कार्य करणारा, अतिलोभी, परपीडक ( दुसऱ्यास उपसर्ग पोहचेल याचा विचार न करणारा ), अंतर्बाह्य अमंगळ, सिद्धीनें हुरळून जाणारा आणि असिद्धीनें खचून जाणारा असा कर्ता, राजस कर्ता म्हणावयाचा. २७

येथें सात्त्विक कर्माविषयीं सांगितलेल्या गुणांबरोबर चित्ताची धारणा, उत्साहपूर्वक प्रयत्न आणि अंतःकरणाची समता हे सात्त्विक कर्त्याचे गुण सांगितले आहेत. सकाम कर्म तें राजस कर्म. राजस कर्ता इष्टकामसिध्यर्थ दुसऱ्यास पीडा देण्यास किंवा हिंसाहि करण्यास मागें पुढें पाहत नाहीं. असें कर्म करतांना चित्ताची किंवा शरीराची शुचिता राखण्याचा तो विचार करीत नाहीं, आणि जयापजयानें तो हुरळून किंवा तात्काळ खचूनहि जातो. त्याचा आपल्या मनावर किंवा शरीरावर ताबा नसतो.

**अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैकृतिकोऽलसः ।**
**विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥२८॥**

कोणतेंहि कार्य तत्परतेनें न करणारा, पोरकट ( असंस्कृत बुद्धीचा ), ताठर ( घमेंडखोर ), लबाड, घातकी, आळशी, नेहमीं दुर्मुखलेला आणि चेंगट अशा कर्त्याला तामस कर्ता म्हणतात. २८

युक्त म्हणजे अंगीकृतकार्याशीं तन्मय होणारा, अयुक्त म्हणजे कार्याविषयीं मनात आत्मीयता नाहीं असा. प्राकृत म्हणजे प्रकृतीस वाटेल तसे वागणारा, निरर्गल, लहरी, हलक्या स्वभावाचा. स्तब्ध म्हणजे स्तंभाप्रमाणें ठाब्या. निकृति म्हणजे कपट, नैकृतिक म्हणजे कपटी. तामस कर्ता शरीरानें, मनानें आणि बुद्धीनेंहि आळशी असतो. ज्याला कशाविषयींहि उत्साह किंवा संतोष नाहीं तो विषादी. कोणत्याहि कार्यांत सबब काढून तें न करण्याचीच कारणें शोधीत बसणारा, आजचें कार्य उद्यावर टाकणारा किंवा लांबण लावणारा तो दीर्घसूत्री.

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु ।**
**प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ॥२९॥**

बुद्धीचे आणि चित्ताच्या धारणेचे त्रिगुणांनीं पडणारे तीन प्रकार संपूर्णतया आणि फोड करून, हे धनंजया ! आतां मी सांगतों, ऐक. २९

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।**
**बंधं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥३०॥**

**यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।**
**अयथावत् प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥३१॥**
**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसाऽऽवृता ।**
**सर्वार्थान् विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥३२॥**

पार्था ! कशाविषयीं प्रवृत्ति असावी, निवृत्ति कशापासून असावी, कर्तव्य काय, अकर्तव्य कोणतें, भय म्हणजे काय आणि तें कशाचें, अभय काय आणि तें कसें, बंध कशाचा, मोक्ष कशापासून हें सर्व यथार्थतेनें जाणणारी बुद्धि, ती सात्त्विकी बुद्धि. ३० धर्म, अधर्म, कर्तव्य, अकर्तव्य, हे ज्या बुद्धीनें चुकीचे कळतात, पार्था ! ती बुद्धि राजसबुद्धि. ३१ जी बुद्धि अज्ञानानें कलुषित झाल्यामुळें अधर्मालाच धर्म मानते, आणि जिला सर्वच काहीं विपरीत ( उलटें, खोटें ) दिसतें, पार्था ! ती तामसी बुद्धि जाणावी. ३२

**धृत्या यया धारयते मनःप्राणेंद्रियक्रियाः ।**
**योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥३३॥**
**यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन ।**
**प्रसंगेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥३४॥**
**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ।**
**न विमुञ्चति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥३५॥**

चित्तवृत्ति निरोधानें अढळ ( निष्कंप ) झालेल्या ज्या धारणेनें ( चित्तस्थैर्यानें ) मन, प्राण आणि दशेंद्रियांच्या क्रिया मनुष्य ( यथार्थ मार्गांत ) स्थिर ठेवूं शकतो, पार्था ! ती धृति सात्त्विक. ३३ हे अर्जुना ! परंतु ज्या धारणाशक्तीनें मनुष्य धर्म अर्थ काम या तीनहि पुरुषार्थांना योग्य वळण लावूं शकतो, ( पण ) जी प्रसक्तीनें ( अत्यंतासक्तीनें ) फल-लालसाहि उत्पन्न करते, पार्था ! ती धृति राजसी. ३४ पार्था ! ज्या धृतीनें मनुष्य निद्रा भय दुःख विषण्णता आणि उन्माद सोडीत नाहीं, ती दुर्बुद्ध धृति तामसी जाणावी. ३५

मेधा म्हणजे धारणाबुद्धि, "धीर्धारणावती मेधा." दुर्मेधा म्हणजे दूषित किंवा विकृत धारणा, कुधृति. तामसी धृति ती कुधारणा, किंवा विपरीत धारणा.

**सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।**
**अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति ॥३६॥**

अभ्यासानें चित्तवृत्ति जिच्यांत रमते ती मानसिक स्थिति, अथवा दुःखपरिहारानंतरची चित्ताच्या समाधानाची स्थिति ती सुखस्थिति. तें सुख, हे भरतोत्तमा ! (त्रिगुणांनीं) तीन प्रकारचे असणारें, आतां तुला सांगतों, ऐक. ३६

अभ्यासानें, म्हणजे दीर्घकाल सतत करीत राहण्यानें, एकादी मानसिक वृत्ति किंवा शारीर क्रिया सुखकर वाटूं लागते; उदाहरणार्थ, मादक पदार्थांचें सेवन किंवा उन्मार्ग गमन. यांत प्रारंभीं कदाचित् सुखहि वाटत नसले तरी, मनुष्य एकदा त्यांत गुंतला म्हणजे त्याला त्यात सुख वाटूं लागतें. केवळ वाईट संवयींविषयींच असें नसून, एकदां गोडी लागली म्हणजे बऱ्या वाईट संवयी सर्वच सुखकर वाटूं लागतात. "प्रतीकारो व्याधेः सुखमिति विपर्यस्यति जनः," दुःखाचा परिहार म्हणजेच सुख असाहि कित्येकाचा समज आहे. पण खरें सुख या दोहोंपेक्षांहि वेगळें आहे. तें चित्ताच्या प्रसन्नतेंत, समाधानांत, निरपेक्ष आनंदांत आहे. हें परम सुख अ. ६ श्लोक २० ते २३ मध्यें सांगितलें आहे. या ठिकाणीं गौण प्राकृत सुखाचाहि विचार आहे.

**यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।**
**तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तं आत्मबुद्धिप्रसादजम् ॥३७॥**

प्रारंभीं विषवत् ( कडू, कष्टद ) पण परिणामीं अमृतवत् ( गोड, हितकर ) असें, अंतःकरणाच्या आणि बुद्धीच्या प्रसन्नतेनें ( समाधानानें ) मिळणारें जें सुख तें सात्त्विक सुख, असें म्हणतात. ३७

ज्या सुखानें चित्तवृत्ति सम राहते, उचंबळत नाहीं, तें सात्त्विकसुख. इंद्रिय-निग्रह प्रारंभीं कष्टद वाटतो, परंतु परिणामी कल्याणकारी, चित्ताला शांति आणि समाधान देणारा होतो. सात्त्विक सुख बहिःसाधनावर अवलंबून नसतें, तें केवळ अव्यग्र समाधानांत असतें.

**विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।**
**परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥३८॥**

जें इंद्रियजन्य वैषयिक सुख प्रारंभीं अमृताप्रमाणें ( गोड ) वाटते, पण परिणामीं विषाप्रमाणें ( मारक ) होतें, त्याला शास्त्रांत राजस सुख म्हणतात. ३८

**यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः ।**
**निद्राऽऽलस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥३९॥**

आरंभापासून अंतापावेतों चित्ताला भुरळ पाडणारें, झोंप, आळस, उन्माद यांपासूनच मिळणारें जें सुख, त्याला तामस सुख म्हणतात. ३९

साधारणपणें संसारांतील सुखें राजसच असतात. कर्मप्रवृत्ति, कामनांची ओढ, लोभ, विषयसुखांची हांव, असंतोष, मनाची चंचलता असाच मनुष्य-स्वभाव असतो. ह्या प्रवृत्ती जोंपावेतों आपल्या मर्यादेंतच असतात, तोंपावतों त्या विशेष दुःखाला कारण होत नाहींत, पण त्यापासून खरें शाश्वत सुखहि लाभत नाहीं. पण ह्याच अनावर झाल्या, कामावर क्रोधाचें आणि द्वेषाचें आवरण चढलें, मनुष्य आपलेपणा विसरून सुखलालसेनें धुंद झाला, आणि त्यांतच उन्मत्तपणाची भर पडली, म्हणजे जें सुख म्हणून मनुष्याला वाटतें, तेंच अंतीं अत्यंत दुःखाला कारण होतें.

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।**
**सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात् त्रिभिर्गुणैः ॥४०॥**

पृथ्वीवर ( मानवादि प्राण्यांत ) अथवा स्वर्गांत देवामध्येंहि या प्रकृतीच्या त्रिगुणांनीं मोकळा सोडलेला असा एकहि प्राणी असणार नाहीं. ४०

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ।**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥४१॥**

हे वीरा ! ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चारहि वर्णांना त्यांच्या स्वभावगुणांप्रमाणें कर्में वाटून दिलीं आहेत. ४१

समाजधारणेसाठीं ज्यानें त्यानें आपापल्या स्वभावधर्माप्रमाणें समाजोपकारक कर्म करावें, म्हणून ही वाटणी पूर्वींच्या समाजनेत्यांनीं केली आहे.

**शमो दमस्तपः शौचं शांतिरार्जवमेव च ।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥४२॥**

मनोनिग्रह, इंद्रियसंयमन, तप ( कृच्छ्रादि कर्म ), अंतर्बाह्य शुचिता, शांति, स्वभावसरलता हे ब्राह्मणाचे स्वभावगुण आहेत, आणि ( याच गुणांना अनुरूप ) ज्ञान, विज्ञान, आणि आस्तिकभाव हीं ब्राह्मणवर्णाचीं ( शास्त्रविहित ) कर्में होत. ४२

येथें ब्राह्मण जातीचा विचार नाहीं. ब्राह्मण वर्णाचा आहे. वर दिलेले स्वभावगुण असल्याशिवाय, त्याचबरोबर दिलेलीं कर्तव्यें पार पाडणेंहि शक्य होणार नाहीं. हे सर्वच स्वभावगुण जन्मानें ब्राह्मण असणारात असतीलच असें नाहीं. ज्ञान म्हणजे व्युत्पन्नता आणि शास्त्रप्रवीणता; विज्ञान म्हणजे आत्मानात्मज्ञान, सम्यक् ज्ञान, विवेकवैराग्यसंपन्नता; आस्तिक्य म्हणजे वेदांविषयीं आणि परमात्म्याविषयीं श्रद्धा आणि भक्ति.

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥४३॥**

शौर्य, उत्साह ( आणि बल ), धैर्य, दक्षता, युद्धाला तोंड देण्याची तयारी, हे क्षत्रियाचे स्वभावगुण आहेत, आणि ( त्यांना अनुरूपच ) औदार्य आणि शासनशीलता हीं क्षत्रियाचीं ( क्षत्रिय वर्णाचीं ) स्वभावज कर्में आहेत. ४३

**कृषिगोरक्षवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम्**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥४४॥**

शेती, पशुपालन आणि व्यापारधंदे हीं वैश्य वर्णाचीं स्वभावज कर्में, आणि सेवा ( तीनहि वर्णांना त्यांच्या कर्मांत श्रमानें साहाय्य करणें ) हें शूद्रवर्णाचें स्वभावज कर्म आहे. ४४

वैश्यशूद्रांचे विशिष्ट स्वभावगुण सांगितले नाहींत. विश् म्हणजे सर्वसाधारण जनता. ज्यांचे विशिष्ट गुण सांगितले ते ब्राह्मण आणि क्षत्रिय; त्या व्यतिरिक्त ज्यांच्यामध्यें साधारण बुद्धि आणि कर्तृत्वशक्ति इत्यादि गुण असतील ते समाजोपयोगी कार्यें करण्यास योग्य मानले जाऊन, त्यांनीं तशीं महत्त्वाचीं

कामें करावीं म्हणून त्यांना वैश्यवर्णात घातलें गेलें. याहि पलीकडे असणारे, ज्यांना विशेष बुद्धीचीं किंवा कर्तबगारीचीं कामें करतां येणार नाहींत, त्यांना चौथ्या वर्णात घालून अंगमेहनतीनें त्यांनीं इतर तीन वर्णांस साहाय्य करावें असा वर्णधर्माचा दंडक घालून दिला आहे.

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ॥४५॥**

स्वकर्माचरणात तत्पर असणाऱ्या मनुष्यास श्रेष्ठ सिद्धि प्राप्त होते. यथायोग्य स्वकर्माचरण करणारास सिद्धि कशी प्राप्त होते, तें ऐक. ४५

कर्माचा, कर्मफलाचा आणि त्रिगुणांचा विचार आतांपावेतों केला, त्याच्या अनुषंगानें चातुर्वर्ण्यव्यवस्थेचाहि विचार येथें केला आहे. येथें वर्णांचा विचार आहे, जातींचा नाहीं. वर्ण गुणकर्मविभागशः कल्पिले गेले. वर्णाचा विचार तात्त्विक भूमिकेवरून केला गेला. जाती जन्मानें झाल्या आहेत, त्या गुण-कर्मावर आधारलेल्या नाहींत. तात्त्विक भूमिकेवरून वैश्य वर्णाचे मानलेले शेतकरी आणि पशुपाल, आधुनिक कालांत जातीनें शूद्र मानले आहेत विराट् पुरुषाचें मुख ब्राह्मण, बाहू क्षत्रिय, मांड्या वैश्य, आणि पाय शूद्र असें वर्णन आहे शरीरस्वास्थ्यास शरीरांतील सर्व भागांना ज्याप्रमाणें सारखेंच महत्त्व, त्याप्रमाणें समाजाच्या धारणास पोषणास आणि स्वास्थ्यास सर्व वर्णांचे महत्त्व सारखेंच आहे. त्यांत उच्चनीच भाव असूं शकतच नाहीं. प्रत्येक मनुष्यानें आपल्या वाट्यास आलेले कर्म कर्तव्यबुद्धीनें यथायोग्य केलें म्हणजे त्यानें त्या विराट् पुरुषाची सेवा किंवा आराधना उत्तम प्रकारें केली असेंच होतें. त्यानें आपलें कर्तव्य ईश्वरार्पण बुद्धीनें केलें, हीच त्याच्या कर्माची संसिद्धि. सर्वांतर्यामी परमात्मा संतुष्ट झाला म्हणजे सर्वांनाच ईप्सित प्राप्त होऊन सर्वच सुखी होतील. संसिद्धि म्हणजे कृतकृत्यता अथवा ध्येयप्राप्ति. जसें ध्येय आणि जसा प्रयत्न तशी सिद्धि कर्त्याला लाभते.

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥४६॥**

भूतमात्राची प्रवृत्ति ( क्रियाप्रवृत्ति ) ज्याच्या प्रेरणेनें होते, जो

( सर्वांतर्यामी सर्वसाक्षी ) भूतमात्रांत अंतर्बाह्य भरून आहे, त्याची स्वकर्माचरणानें उपासना केल्यास, मनुष्यास इष्टप्राप्ति ( ध्येयसिद्धि ) होते. ४६

मन आणि बुद्धि एकाग्र करून, तन्मयतेनें, कोणत्याहि दुसऱ्या विषयानें मन व्यग्र होऊं न देतां, इष्ट साध्यासाठीं सर्वस्व अर्पण केल्यास इष्टसिद्धि अवश्य होते. ही सिद्धि त्या सर्वांतर्यामी परमात्म्याच्याच कृपाप्रसादानें होते. अ० ७ श्लो० २१–२२ मध्यें सांगितल्याप्रमाणें ज्या दैवताचें आराधन करावें, म्हणजे जें ध्येय ठेवावें, त्या दैवताविषयींची श्रद्धा आणि त्याच्या आराधनानें मिळणारी इष्ट प्राप्तिहि, सर्वभूतांतर्यामी सर्वसाक्षी परमात्माच भक्ताला देतो. तो परमात्मा कोठें दूर नसून आपल्या सन्निधच आहे, आपणांतच आहे.

**श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात् स्वनुष्ठितात् ।**
**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥४७॥**

आपल्या स्वभावगुणाला ( आणि परिस्थितीला ) अनुरूप ( आपल्या वाट्यास आलेलें ), आपणास कमी प्रतीचें वाटत असलेलेंहि आत्मकर्तव्य, आचरणास आकर्षक दिसणाऱ्या पण केवळ दुसऱ्यालाच योग्य अशा कर्तव्यापेक्षां, अधिक श्रेयस्कर ( कल्याणकर ) असतें. आत्मभावानें ( स्वभावानें ) निश्चित केलेले कर्म ( यथायोग्य ) संपादिल्यास, कर्त्यास ( यत्किंचित्हि ) दोष लागत नाहीं. ४७

स्वभावधर्म ही शुद्ध सरल अंतःकरणाची प्रेरणा आणि अतरात्म्यानें दाखविलेला मार्ग. अविकृत आणि स्वभावज गुणांनीं निश्चित केलेलें कर्तव्य तोच स्वधर्म. क्षत्रिय वर्णाला योग्य गुण ज्याला स्वभावतः मिळालेले आहेत, त्यानें क्षत्रियाचाच आचार करणें योग्य. त्याला ब्राह्मणाचा आचार साधणार नाहीं, आणि त्याला अशा आचारापासून सिद्धीहि प्राप्त होणार नाहीं. स्वभाव, जन्मावर किंवा जातीवरच अवलंबून नसतो. जन्मानेंच कोणी ब्राह्मण किंवा क्षत्रिय वर्णाचा नसतो. संस्कारानें आणि अभ्यासानें स्वभाव बदलूहि शकतो. पण तो बदलला तरी त्यांतील जन्मजात बीज नाहींसें होत नाहीं. स्वभावानुरूप कर्म निःस्वार्थ-बुद्धीनें परमेश्वरप्रीत्यर्थ केल्यास निःश्रेयस प्राप्त होईल यांत शंका नाहीं.

**सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् ।**
**सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥४८॥**

हे कौंतेया ! स्वभावप्राप्त आत्मकर्तव्यांत कांहीं कमीपणाहि असला तरी तें सोडून दुसऱ्याच्या मागें लागूं नये, कारण प्रत्येक कर्मांत, अग्नि-भोवतीं धूमाप्रमाणें, कांहीं तरी दोष असणारच. ४८

**असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।**
**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥४९॥**

ज्याला कोणत्याहि विषयासंबंधीं आसक्ति नसेल, अंतःकरण आणि इंद्रियें ज्याच्या स्वाधीन असतील, ज्याला कोणतीहि लालसा नसेल, त्याला कर्मसंन्यासानें ( ईश्वरार्पणबुद्धीनें सर्व कर्मे करून ) नैष्कर्म्यसिद्धि ( कर्मबंधा पासून मुक्तता ) लाभेल. ४९

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाऽऽप्नोति निबोध मे ।**
**समासेनैव कौंतेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥५०॥**

(कर्मसंन्याशाला) हे कौंतेया ! ही नैष्कर्म्यसिद्धि जशी प्राप्त होते, तशीच (पुढें) त्याला ज्ञानाची परम परिणति जी ब्रह्मपदाची प्राप्ति तीहि कशी होते हें थोडक्यांत सांगतों, तें नीट समजून घे. ५०

**बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्याऽऽत्मानं नियम्य च ।**
**शब्दादीन् विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥५१॥**
**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ।**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥५२॥**
**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।**
**विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते ॥५३॥**

अत्यंत निर्मल बुद्धीनें युक्त होऊन, धारणेनें अंतःकरणाचें नियम करून, शब्द स्पर्शादि विषयांचा आणि राग द्वेषादि विकारांचा अत्यंत परित्याग करून, ५१ एकांतवासी, अल्पाहार सेवन करणारा, काया वाचा मन सर्वस्वीं स्वाधीन असलेला, ध्यानयोगांत मग्न, सतत वैराग्यशील, ५२

अहंभाव, शारीरिक दांडगेपणा, मानसिक उन्माद, इच्छा, क्रोध यांचा आणि सर्व बाह्य संबंधांचा परित्याग केलेला, ममत्वरहित, शांतचित्त पुरुष ब्रह्मत्वप्राप्तीचा अधिकारी होतो. ५३

कर्तव्यतत्परतेनें, आणि अनासक्त चित्तानें आत्मशुद्धीसाठीं विहित आणि सहज प्राप्त स्वकर्माचें यथायोग्य अनुष्ठान करून कर्मयोगी, ज्ञाननिष्ठेनें सर्व कर्मे परमेश्वरास समर्पण करून, कर्मसंन्यासी होतो, आणि ध्यानधारणादि साधनांनीं ममत्वाहंत्वाचा परमेश्वरस्वरूपीं विलय करून ब्रह्मपद प्राप्तीचा अधिकारी होतो. असा तो अपरिग्रह निराशी शांतचित्त योगी भक्तीनें परमात्म-स्वरूपाशीं तन्मय होऊन तत्स्वरूप होण्यास कसा योग्य होतो, तें आता सांगतात.

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न काङ्क्षति ।**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥५४॥**
**भक्त्या मामभिजानाति यावान् यश्चास्मि तत्त्वतः ।**
**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥५५॥**

अशा ब्रह्मत्व प्राप्त झालेल्या नितांत तृप्तांतःकरण योग्याला कशाचीहि तळमळ किंवा आशा आकांक्षा उरत नाहीं; तो भूतमात्राविषयीं समबुद्धि होतो, आणि त्याला माझी परमभक्ति ( अनन्यत्व ) प्राप्त होते. ५४ या भक्तीनें ( अनन्यत्वानें ) मी ( सर्वात्मा, सर्वसाक्षी, सर्वभूतांतरात्मा ) कोण, माझें माहात्म्य काय, याचा त्या योग्याला परमार्थतः साक्षात्कार होतो, आणि त्यानंतर त्याला माझ्या स्वरूपाचें यथार्थत्वानें ( साक्षात् अपरोक्षात् ) दर्शन होऊन, त्याला मत्सायुज्यता ( परमात्मभाव ) प्राप्त होते. ५५

हीच ब्रह्मभूत योग्याची परमोच्च गति, " परा ज्ञाननिष्ठा " श्लो. ५० मध्यें वर सांगितली आहे, आणि हीच अ. ६ श्लो. २७-२८ मध्यें वर्णिली आहे. " अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम्, " अशी ही गति अनेक जन्माच्या तपश्चर्येनंतरच मिळते. यासाठीं प्रारंभ कर्मयोगानेंच करावयाचा, आणि त्याची तयारी याच जन्मांत स्वकर्मानुष्ठानानें होऊं शकते. काळ अनंत

आहे, आत्माहि अनंत आणि अविनाशी आहे. जीव नित्य आहे, त्याच्या अवस्था बदलतात, पण त्याचा नाश कधींच होत नाहीं, म्हणून जन्ममरणाचा विचार न करतां, आत्मोद्धारार्थ जीवानें सतत प्रयत्न करीत राहावें.

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।**
**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥५६॥**

मलाच ( सर्वभूतांतरात्म्याला, परमात्म्याला ) आपलें सर्वस्व अर्पण करणारा ( भक्त ), आपली सहज प्राप्त कर्तव्ये सतत करीत राहूनहि, माझ्या कृपाप्रसादानें ( शेवटीं ) शाश्वत अढळ ब्रह्मपदाला पोहचतो. ५६

कर्माचरण परम गतीच्या किंवा निःश्रेयसप्राप्तीच्या आड येत नाहीं. सर्व कर्में परमेश्वरास समर्पण करून अनासक्त चित्तानें वागणारास सद्गति मिळेल यांत शंका नाहीं. या श्लोकापासून अर्जुनास ( आणि सामान्य मुमुक्षूस ) उद्देशूनच स्वकर्माचरणाविषयीं उपदेश आहे. श्लो. ५१ ते ५५ मध्यें कर्मयोग, ज्ञानयोग, कर्मसंन्यास, ध्यानधारणा, भक्ति, परम ज्ञाननिष्ठा, आत्मसाक्षात्कार, आणि शेवटीं सायुज्यमुक्ति असा क्रम सांगितला. सामान्य मुमुक्षूनें आत्मोद्धारार्थ कसें वागावें तें येथून पुढें सांगितलें आहे.

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥५७॥**

( विवेक वैराग्य युक्त ) अंतःकरणानें सर्व कर्में मलाच समर्पण करून, मलाच सर्वात्मभावानें आपलें सर्वस्व मानून, तूं समाहितचित्तानें ( बुद्धि-योगानें ) सतत माझेच चिंतन करीत रहा. ५७

अ. २ श्लो. ४८ ते ५३, अ. १० श्लो. १०, आणि ठिकठिकाणीं इतरत्र, बुद्धियोगाचें महत्त्व सांगितलें आहे. हाच मुख्य योग, आणि परमात्म्याशीं तादात्म्य साधावयास मानवास हेंच श्रेष्ठ साधन आहे.

**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।**
**अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि ॥५८॥**
**यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।**
**मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥५९॥**

**स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ।**
**कर्तुं नेच्छसि यन्मोहात् करिष्यस्यवशोऽपि तत् ॥६०॥**

सर्वदा माझेंच ( परमात्म्याचें ) संस्मरण अंतःकरणांत ठेऊन वागल्यास, माझ्याच कृपाप्रसादानें सर्व अरिष्टांतून पार पडशील, पण तूं जर आपलाच हेका धरून माझें ऐकणार नाहींस तर तुझी दुर्गति होईल. ५८ मी लढणारच नाहीं असें जर तूं केवळ हट्टानें मनांत धारण करशील, तर तुझा हा निश्चय विफल होणार आहे, कारण तुझा स्वभावच तुला तें करावयास भाग पाडील. ५९ जें न करण्याचें तूं केवळ मोहानें ( अज्ञानानें ) ठरविशील, अर्जुना ! तूं आपल्या स्वाभाविक कर्मानें नितरां बद्ध असल्यानें, तुला तें असहायपणें करावेंच लागेल. ६०

" स्वभावो दुरतिक्रमः, " मनुष्याचा स्वभाव ( आत्मभाव ) नितांत दुर्लंघ्य आहे. कांहीं काळ स्वभावोर्मी दाबून धरणें शक्य असलें, तरी त्या पुनः डोकें वर काढणारच. बुद्धीला योग्य संस्कार होऊन स्वभावच बदलला पाहिजे. ज्ञानानें, विवेकानें, वैराग्यानें, अभ्यासानें मनाचे आणि बुद्धीचे दोष घालवितां येतील, नाहीं असें नाहीं. पण मनुष्याची प्रवृत्ति नेहमीं त्याच्या स्वभावानेंच ठरत असते, स्वभावांत बदल झाल्याशिवाय प्रवृत्तींत बदल होत नाहीं.

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।**
**भ्रामयन् सर्व भूतानि यंत्रारूढानि मायया ॥६१॥**
**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।**
**तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥६२॥**

प्राणिमात्राच्या अंतःकरणांत, हे अर्जुना ! परमेश्वर वसत आहे. तोच सर्व सृष्टजात, आपल्या ( अतर्क्य ) योग मायेनें, जणूं कांहीं रहाटगाडग्यावर चढविल्याप्रमाणें, अधोर्ध्व फिरवीत आहे. ६१ त्यालाच अनन्यभावानें शरण जा, त्याच्याच कृपाप्रसादानें तुला परम शांति, आणि ( अंतीं ) शाश्वत गति प्राप्त होईल. ६२

सर्वात्मा, सर्वसाक्षी, सर्वांतर्यामी परमात्मा प्राणिमात्राच्या हृदयांत वास करीत आहे. कृतकर्मांचा फलदाता, आर्तांचा कनवाळू रक्षणकर्ता सदा

सन्निध आहे, हें ओळखून मनुष्यानें आपलें कर्तव्य शुद्धांतःकरणानें करीत असावे, म्हणजे त्याच्याच कृपेनें सद्गति मिळेल यांत संशय नाहीं. हीच गीतेची सर्वश्रेष्ठ शिकवण आहे, आणि हेंच सर्व अध्यात्मज्ञानाचें सार आहे.

**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।**
**विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥६३॥**

ह्याप्रमाणें तुला मी अत्यंत गूढ असें हें ज्ञान सांगितलें. या सर्वाचा पूर्णपणें विचार करून आतां तुला योग्य वाटेल तें कर. ६३.

शुद्धांतःकरणाच्या अनन्य भक्तालाच हें परम गुह्य सांगितलें आहे. सच्छास्त्र ज्ञानचक्षू उघडते, आणि साधकाची स्वतंत्र शुद्धबुद्धि जागृत करतें. सम्यक् ज्ञान झाल्यावर, असत्य काय आणि सत्य काय हें परमार्थत समजल्यावर, विवेकी कर्ता आपला मार्ग ठरविण्यास स्वतंत्र आहे. शास्त्र सत्यापावेतों नेऊन पोहचवितें, त्यापुढें ज्याचें त्यानें आपल्या बुद्धीला योग्य दिसेल तसें जावयाचें असतें. मानव आपणच स्वचरिताचा निर्माता आहे.

**सर्वगुह्यतमं भूयः श्रृणु मे परमं वचः ।**
**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥६४॥**
**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥६५॥**
**सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥६६॥**

सर्व गुह्यांत गुह्य असा माझा उपदेश पुनः एकदां सांगतों, ऐक. मला तूं अत्यंत प्रिय आहेस, म्हणून तुझ्या हिताचें हें सांगतों. ६४ आपलें अंतःकरण सर्वस्वीं मलाच अर्पण कर, मत्परायण हो, माझेंच यजन कर, मलाच विनम्रभावानें शरण ये, म्हणजे तूं मत्स्वरूपालाच अंतीं येऊन मिळशील. तूं माझा प्रिय आहेस म्हणूनच तुला हें सत्य प्रतिज्ञेनें सांगतों. ६५ इतर सर्व धर्म ( ऋणें, कर्तव्यें, बंध, संबंध ) बाजूस सारून केवळ मलाच शरण ये, मीच तुला सर्व पापापासून मुक्त करीन, मनांत व्यथित होऊं नकोस. ६६

ईश्वराला स्मरून सद्बुद्धीनें वागणारास कधींच पाप लागणार नाहीं. अंतःकरणांत परमेश्वराचें नित्य सान्निध्य लक्षांत ठेऊन, दुसऱ्या कोणत्याहि गौण दैवतास (ध्येयास) पूज्य न मानता ईश्वरपरायण होऊन त्यालाच सर्वस्व समर्पण केल्यास, संसारांत आपलें कर्तव्य करीत राहूनहि अंतीं सद्गति मिळेल, यांत यत्किंचित्हि शंका नाहीं.

**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।**
**न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥६७॥**

ज्याचें अंतःकरण तपश्चर्येनें शुद्ध झालेलें नाहीं, ज्याचें चित्तांत ईश्वराविषयीं भक्तिभाव नाहीं, जो हें श्रद्धेनें ऐकण्यास उत्सुक नाहीं, किंवा जो माझा निंदक आहे अशास हें रहस्य तूं कधींहि सांगूं नकोस. ६७

यमनियमादिकांनीं शुद्ध आणि स्थिर अंतःकरण झालेला, श्रद्धावान् आणि जिज्ञासु भक्तच ज्ञानाचा अधिकारी होऊं शकतो. श्रद्धेनें (तर्कटपणा सोडून देऊन) उपदेश ग्रहण करण्याची इच्छा ती शुश्रूषा. शुद्धबुद्धीचा सुविचाराधिष्ठित (डोळस) निश्चय ती श्रद्धा. नसेल तेथेंहि दोष पाहण्याची बुद्धि ती असूया, ही ज्ञानार्जनास अत्यंत घातुक असते. अंतर्बाह्य शुचिता, भक्ति, श्रद्धा, अनसूया यांशिवाय ज्ञानग्रहण होत नाहीं.

**य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥६८॥**
**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।**
**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥६९॥**

जो ह्या परम रहस्याचा माझ्या भक्तांना उपदेश करील, तो माझा परमभक्त होऊन, सर्व संशयापासून मुक्त होऊन, माझ्याच परम पदाला येईल. ६८ (हें गीताशास्त्र माझ्या भक्तांना सांगणारापेक्षां) मानवांत माझें अत्यंत आवडतें करणारा दुसरा कोणीहि नाहीं, आणि अशा मनुष्यापेक्षां मला जगतांत दुसरा कोणी अधिक प्रिय होणार नाहीं. ६९

आपणास यथार्थ ज्ञान प्राप्त झाल्यावर तें जिज्ञासूंना त्यांच्या उद्धारार्थ देणें हें महत्पुण्य कर्म आहे. सत्याचा आणि सद्भावनांचा प्रचार आणि प्रसार जगताच्या कल्याणास उपकारक होतो.

**अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।**
**ज्ञानयज्ञेन तेनाहं इष्टः स्यामिति मे मतिः ॥७०॥**
**श्रद्धावाननसूयश्च श्रृणुयादपि यो नरः ।**
**सोऽपि मुक्तः शुभान् लोकान् प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम्॥७१॥**

ह्या सद्धर्म सांगणाऱ्या आपल्या संवादरूपी प्रबंधाचें जो अध्ययन करील त्यानें ज्ञानयज्ञानें माझें यजन केलें असें मी समजेन. ७० श्रद्धेनें आणि निर्दोष अंतःकरणाने जो ह्याचें श्रवणहि करील, त्याला कर्मबंधापासून मुक्त होऊन, पुण्यवंतांना मिळणारी गति प्राप्त होईल. ७१

ही ह्या ग्रंथाच्या पठनाची आणि श्रवणाची फलश्रुति सांगितली.

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।**
**कच्चिदज्ञानसंमोहः प्रणष्टस्ते धनंजय ॥७२॥**

हे धनंजया ! आतांपावेतों मी सांगितलेलें हें अत्यंत गूढ असें ज्ञान तूं एकाग्रचित्तानें ( तत्परतेनें ) ऐकलेस ना ? अज्ञानानें ( मोहांधकारानें ) झालेला तुझ्या बुद्धीचा विपर्यय ( गैरसमज ) आतां नाहींसा झाला ना ? ७२

अर्जुन उवाच —

**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाऽच्युत ।**
**स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥७३॥**

अर्जुन म्ह.–हे अच्युता ! तुझ्या कृपाप्रसादानें माझें सर्व अज्ञान नाहींसें होऊन मला सद्विवेक प्राप्त झाला आहे. माझ्या चित्तांतील सर्व संशय नाहींसे झाले, आतां मी तुझ्या उपदेशाप्रमाणें वागेन. ७३

स्वजनांच्या संभाव्य नाशाच्या भयानें .क्षिप्तचित्त झालेला अर्जुन आपल्या स्वभावास अननुरूप अशी भैक्ष्यवृत्तीहि पत्करावयास तयार झाला होता. परंतु हें केवळ स्मशानवैराग्य होतें. तो त्याचा स्वभाव ( आत्मभाव ) नव्हता. प्रवृत्तिपर मनुष्याचा स्वभाव विवेकानें बदलून, टिकाऊ वैराग्य त्याच्या अंगीं बाणलें, तरच त्याला कर्मसंन्यासाच्या गोष्टी बोलणें योग्य होईल. पण त्यानें क्षणिक वैराग्याच्या

आवेगांत स्वधर्माचा आणि स्वकर्माचा परित्याग केला तर पश्चात्तापाचाच प्रसंग उद्भवेल. प्रवृत्ति-निवृत्ति, कार्याकार्य, कर्तव्याकर्तव्य, हेयाहेय, यांच्या तात्त्विक विवेचनानें अज्ञानांधकार दूर झाल्यावरच मनुष्यास आपलें खरें कर्तव्य कोणतें हें कळूं शकेल. कर्म, ज्ञान, भक्ति, मुक्ति यांचें सम्यक् ज्ञान आतां अर्जुनास झालें होतें, आणि तो आत्मकर्तव्याविषयीं निर्णय घेण्यास अधिकारी झाला होता, म्हणून त्याला "यथेच्छसि तथा कुरु" असें श्रीकृष्णांनीं सांगितलें. त्याच्यावर त्यांनीं आपलें मत लादलें नाहीं. सर्व मौलिक तत्त्वांची फोड करून त्याला ज्ञानदृष्टि आणि दिव्यदृष्टि दिली. आतां तो आत्मकल्याणाच्या मार्गानें जाण्यास मोकळा होता. त्याच्या चित्तांत कोणताहि संशय किंवा गैरसमज आतां राहिलेला नव्हता.

संजय उवाच—

**इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।**
**संवादमिदमश्रौषमद्भुतं रोमहर्षकम् ॥७४॥**

**व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतत् गुह्यमहं परम् ।**
**योगं योगेश्वरात्कृष्णात् साक्षात् कथयतः स्वयम् ॥७५॥**

संजय म्ह०—ह्याप्रमाणें मीं भगवान् श्रीकृष्णाचा आणि अर्जुनाचा अत्यंत विस्मयजनक आणि रोमांचकारी संवाद श्रवण केला. ७४ श्री योगेश्वर कृष्णांनीं स्वतः सांगितलेलें हें परम गुह्य योगशास्त्र मी व्यासांच्या कृपाप्रसादानें प्रत्यक्ष ऐकिलें. ७५

**राजन् संस्मृत्य संस्मृत्य संवादमिदमद्भुतम् ।**
**केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥७६॥**
**तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।**
**विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥७७॥**

हे राजा धृतराष्ट्रा ! हा विस्मयजनक पुण्यपावन कृष्णार्जुनसंवाद पुनः पुनः आठवून मला आनंदाचें भरतें येत आहे, ७६ आणि तें आश्चर्यकारक श्रीहरीचें विश्वरूप पुनः पुनः आठवून मी विस्मित होत आहें, आणि मी पुनः पुनः ( भावोद्रेकानें ) रोमांचित होत आहे. ७७

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥७८॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे मोक्षसंन्यासयोगो नाम अष्टादशोऽध्यायः**

ज्यांच्या अंतःकरणांत श्रीयोगेश्वर कृष्णाचें आणि धनुर्धर पार्थाचें अनुचिंतन सतत राहील, त्यांना वैभव, यश, परम कल्याण, आणि शाश्वत सदाचार लाभेल, अशी माझी दृढबुद्धि ( पूर्णश्रद्धा ) आहे. ७८

महायोगेश्वर श्रीहरीच्या विश्वरूप दर्शनाचा येथें शेवटीं वैशिष्ट्यानें उल्लेख केला आहे. विश्वांत विश्वेश्वर पाहणें हें ज्ञानाचें, भक्तीचें, आणि संसारांतून मुक्त होण्याचें अमोघ साधन आहे. योगेश्वर श्रीकृष्णांनीं अर्जुनाला केलेला हा उपदेश विवेकी मनुष्यास ज्ञानदृष्टि देऊन त्याला आत्मोद्धाराचा मार्ग दाखवील, आणि अर्जुनाचा उत्साह, निर्भयता, आणि कर्तव्यशीलता लक्षांत ठेऊन त्याप्रमाणें वागल्यास, त्याला अभ्युदय आणि निश्रेयस दोन्ही लाभतील. कर्तव्य बुद्धीनें, लोभ किंवा द्रोह मनान न ठेवतां, ईश्वरार्पणबुद्धीनें स्वकर्माचरण करीत राहिल्यास येथें संसारांत सुख, शांति, समाधान, आणि अंतीं सद्गति मिळेल, हा सामान्य मानवास श्रीमद्भगवद्गीतेचा अत्यंत कळकळीचा आणि प्रेमाचा संदेश आहे

**॥ ॐ तत्सत् ब्रह्मार्पणमस्तु ॥**



# शुद्धिपत्र

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५ | ४ | कौतेय | कौतेयः |
| ५ | १३ | ( अर्जुन ) | अर्जुन |
| ९ | १२ | न हन्य | न हन्यते |
| १३ | ५ | असेही | असेंहि |
| १६ | १७ | व्यथयन्तेते | व्यथयन्त्येते |
| १९ | ५ | कीर्तिवताला | कीर्तिवंताला |
| २५ | ६ | यभेवैष | यमेवैष |
| २६ | ३ | सर्व संकल्पसं न्यासी | सर्वसंकल्पसंन्यासी |
| ४५ | २६ | अकर्मांचा | अकर्मांची |
| ५१ | १२ | मिळालें | मिळाले |
| ५८ | २४ | तूं, | |
| ६० | २० | संशया | संशयी |
| ६१ | ८ | मश्चित | मच्चित्तः |
| ७० | १८ | योग्यापेक्ष, | योग्यापेक्षां |
| ७७ | १ | सुखमुक्तमम् | सुखमुत्तमम् |
| ७९ | १ | अम्यासा– | अभ्यासा– |
| ८४ | ११ | यज्ञात्वा | यज्ज्ञात्वा |
| ८४ | ११ | भूयोन्यज्ञातव्य | भूयोऽन्यज्ज्ञातव्य |
| ८५ | २१ | प्रकृति, | प्रकृति. |
| ८७ | २६ | आधारभत | आधारभूत |
| ८८ | २० | माययापहृत | माययापहृत |
| ९० | ७ | हृतज्ञानाः | हृतज्ञानाः |
| ९४ | १९ | मत्भाव | मद्भावं |
| ९८ | ९ | मना | मनो |
| ९९ | २३ | अव्यताव्द्यक्तयः | अव्यक्तद्व्यक्तायः |
| १०७ | १६ | उत्पत्ति लयाच्या | उत्पत्ति–लयाच्या |
| १०८ | १७ | सत्तत्व | सत्तत्त्व |
| ११४ | २५ | सवच | सर्वच |
| ११५ | २२ | भक्ताच | भक्तीच |

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ११७ | २० | ग्रजायेय | प्रजायेय |
| ११८ | ६ | मश्चित्ता | मच्चित्ता |
| १२४ | ६ | आह | आहे |
| १२७ | १० | यच्चन्यद् | यच्चान्यद् |
| १३७ | १० | बेत्ताच | वेत्ताच |
| १४१ | १४ | नाईं | नाहीं. |
| १४२ | १० | द्रष्टुंच तत्त्वन | द्रष्टुं च तत्त्वेन |
| १४२ | २० | विश्व. | विश्व– |
| १४३ | २१ | सश्चितानंद | सच्चिदानंद |
| १४५ | २ | अहानश | अहर्निश |
| १४७ | ७ | मश्चित्त | मच्चित्त |
| १५० | १ | वणन | वर्णन |
| १५० | ३ | सङ्गर्विवर्जित | सङ्गविवर्जित |
| १५५ | १३ | उत्पत्तीच | उत्पत्तीचे |
| १५५ | २१ | शातं | शांतं |
| १५८ | २१ | ( प्रत्यगात्म ) | ( प्रत्यगात्मा ) |
| १६० | ४ | तश्चिंतन | तच्चिंतन |
| १६० | २० | अधुनिक | आधुनिक |
| १६८ | २६ | उद्भत | उद्भूत. |
| १७० | १३ | सात्त्विकवर्त्तीचे | सात्त्विकवृत्तीचे |
| १७२ | १३ | ते | तो |
| १७५ | २० | संय | सूर्य |
| १७५ | २१ | पाहचल्यावर | पोहचल्यावर |
| १७९ | २३ | परमेश्वराच | परमेश्वराची |
| १८५ | १४ | खोटे, | खोटे– |
| १८९ | २७ | हे कौंतया ! | हे कौंतेया ! |
| १९० | ३ | धरणाला | धारणाला |
| १९० | १६ | मार्गे | मार्ग |